# छत्रपति संभाजीमहाराज संस्कृतसाहित्य

: संपादन :

प्रा. रामकृष्ण आनंदराव कदम





## प्रकाशकीय

प्रा. रामकृष्ण आनंदराव कदम यांनी संपादित केलेला "छत्रपति संभाजीमहाराज संस्कृतसाहित्य" हा ऐतिहासिक संदर्भ ग्रंथ प्रकाशित करताना मराठीदेशा फाउंडेशनला पराकोटीचा आनंद होत आहे.

सदरील ग्रंथामध्ये छत्रपति संभाजी महाराज विरचित संस्कृत साहित्य आणि त्याचं मराठी भाषांतर उपलब्ध करून देण्यात आलेलं आहे. तसेच समकालीन आणि उत्तरकालीन संस्कृत साहित्यात संभाजी महाराजांच्या उमटलेल्या प्रतिमेचेही मराठी भाषांतर देण्यात आलं आहे. अशा पद्धतीचा हा एकमेवाद्वितीय ग्रंथ असावा. इतिहासाचा मुळातून अभ्यास करू पाहणाऱ्या सर्वांना हा ग्रंथ निर्विवाद एक महत्वाचा दस्तऐवज ठरणार आहे.

छत्रपती संभाजी महाराज विरचित बुधभूषण या संस्कृत ग्रंथाचंही त्यांनी याआधी संपादन केलं आहे. अत्यंत परिपूर्ण पद्धतीने सरांनी "बुधभूषण" या ग्रंथाचं संपादन केलं आहे. "छत्रपति संभाजीमहाराज संस्कृतसाहित्य" हाही ग्रंथ अगदी त्याच तोलामोलाचा झाला आहे हे सजग वाचकांच्या लक्षात आल्यावाचून राहणार नाही. मराठी वाचकांना या

संस्कृत साहित्याचं परिपूर्ण आकलन व्हावं यासाठी अन्वय, शब्दार्थ, पाठभेद, शोध, टीपा आणि सविस्तर स्पष्टीकरणे यांची त्यांनी यथायोग्य ठिकाणी पेरणी केली आहे. संस्कृत भाषेमुळे वरकरणी क्लिष्ट वाटणारा हा ग्रंथ अजिबात क्लिष्ट राहत नाही.

प्रा. रामकृष्ण आनंदराव कदम सरांच्या लेखणीतून अवतरलेला हा काही पहिलाच ग्रंथ नाही. "भारतीय राजवंश एक सत्यशोधन, क्षत्रियकुलावतंस छत्रपती श्रीशिवाजी महाराज, श्रीराजा शिवछत्रपती: जन्मतिथी– वाद व सत्यशोधन, औरंगजेब: कुळकथा" अशा एक ना अनेक ग्रंथातून त्यांनी आजवर संदर्भासहित इतिहास मांडला आहे. "भारतीय राजवंश एक सत्यशोधन" या त्यांच्या संशोधन ग्रंथाने तर अनेक इतिहासकारांच्या अनैतेहासिक मांडणीला मुळापासून हादरा दिला. तब्बल ३२ इतिहास संशोधकांचे अभिप्राय "भारतीय राजवंश एक सत्यशोधन" या ग्रंथासाठी त्यांनी मिळवले आहेत, ग्रंथात ते छापूनही आले आहेत.

प्रा. रामकृष्ण आनंदराव कदम सरांनी वयाची सत्तरी केंव्हाच पार केली आहे. पण इतिहासाबद्दल बोलताना ते आजही अत्यंत स्पष्ट, ठळक आणि चपखल बोलतात. छत्रपती संभाजी महाराज आणि त्यांचं संस्कृत साहित्य हा तर सरांच्या अगदी जिव्हाळ्याचा विषय. ते स्वतः भाषातज्ञ असल्यामुळे छत्रपती संभाजी महाराजांची ही सुविद्य बाजू त्यांना जास्त भावते. आजवर छत्रपती संभाजी महाराजांचं शस्त्रधारी रुपडं महाराष्ट्रानं अनुभवलं पण सरांच्या या ग्रंथामुळे त्याच छत्रपति संभाजी महाराजांचं सनय राजनीतीधुरंधर रूप महाराष्ट्राला अनुभवायला मिळेल एवढं नक्की.

**मराठीदेशा फाउंडेशन**

॥ मराठीदेशा ॥
FOUNDATION
www.marathidesha.org

---

**तैलचित्र चित्रकार : दिनेश काची**
**सौजन्य: विघ्नहर्ता ग्रंथालय, हडपसर, पुणे.**

## * अनुक्रम : विषय व साधने

*** अनुक्रम : २ :/पूरके : २९ : चौकटींतील नोंदी :**

## ❋ प्रास्ताविक :

: पणजे मालोजीराजे भोसले यांचे पणतू,

: आजे शाहाजीराजे भोसले यांचे नातू,

: पिताजी हिंदवी स्वराज्य संस्थापक छत्रपती–

श्री शिवाजी महाराज यांचे सुविद्य ज्येष्ठ पुत्र–

छत्रपती श्रीसंभाजी महाराज हे जसे प्रजाहितदक्ष, प्रजेचे कनवाळू, 'राजाभिषेक' प्राप्त राजे, संस्कृत भाषेचे व भारतीय राजपरंपरेने प्राप्त 'भारतीय राजनीतीचे सर्वंकष उद्‌गाते 'बुधभूषण' नामक, राजनीती ग्रंथाचे लेखक, संस्कृत भाषेचे उद्‌गाते भाष्यकार, छत्रपती श्रीशिवराय व महाराज्ञी सईबाईसाहेब यांचे सुविद्य व संस्कृत भाषानिपुण छत्रपती संभाजी महाराज यांची वर्णने संस्कृतमध्ये जी उपलब्ध आहेत, त्यांचे अल्पसे दर्शन घडविण्याचा प्रस्तुत संकलनात्मक अल्पसा, यथासाध्य प्रयत्न केला आहे. त्यांच्या 'बुधभूषण'ग्रंथात प्रारंभी ते म्हणालेत,

❋ (श्रीगणेश, श्रीनृसिंह यांना... ) यानंतर, श्रीगणेश, श्रीशंकर, श्रीपार्वती (सर्व देवतामयी), 'भोसले वंशज – स्तुती, शाहाजी भोसले (१–७, १०८), श्रीशिवराय–गौरव (१–८ व १–१४) वर्णनानंतर ते श्रीशम्भुराजे आत्मगौरव शब्दांकित करतात; त्यातील विनम्रता विश्वाधिपती इन्द्रालाही आनंदवील. श्लो. १–१५ मध्ये छ. शम्भुराजे स्वत:विषयी म्हणतात,

**''तस्यात्मज: शंभुरिति प्रसिद्ध:। समस्त सामन्त शिरोवसन्त:। (शिरोवतंस:।)**

**य: काव्य– साहित्य–पुराण–गीत– कोदण्डविद्यार्णव–पारगामी।''**

टीप – 'भगवद्‌गीता' (१६–३५), मध्ये, श्रीविष्णू (जगाच्या इतिहासातील, 'पहिले चतुर राजनीति–मुत्सद्दी 'दंडनीति–प्रणेते', सुदर्शन चक्रधारी भगवान श्रीकृष्णांनी स्वत:ला सहा ऋतूंतील प्रथम/पहिला ऋतू मधु (=चैत्र), माधव (=वैशाख), या दोन महिन्यांतील प्रत्यक्ष 'वसंतऋतू तो मीच (श्रीकृष्ण) होय!'' – असे म्हटले आहे. आणि हेच सर्वश्रेष्ठ प्रजानुरागी आणि चिरंतन व शाश्वतवचन राजनीति पारंगत छत्रपती श्रीसंभाजीमहाराज यांनीही स्वत:विषयी उच्चारलेले आहे:–

**''समस्त सामन्त शिरोवसन्त:।''**

❋ ❋

# १. 'समयनय' : – गागाभट्ट :

(१) **''सिंहासनच्छत्रधराधिराज–राजाधिराज–एकशरण्यभूत: ।**
**शंभु: स्वयंभु: प्रभुरस्तु तुष्ट: स्फुरत्प्रतापोज्ज्वलदिग्विभाग: ।।२।।''**
: (प्रभु = क्षत्रियनृपती)
= (''सिंहासनाधिष्ठित व राजछत्र धारण करणारे, श्रेष्ठ राजे आणि सम्राट यांचे एकमेव आश्रयस्थान असलेले, ज्यांच्या तळपणाऱ्या पराक्रमाने दिशा उजळून गेल्या आहेत, असे स्वयंभू राजे संभाजी (माझ्या 'समयनय' या ग्रंथलेखनपूर्तीने) संतुष्ट होवोत !'')

(२) **''...गागाभिधविबुधेन ...निबद्ध:'समयनय:' सुखमेतु शंभुराज: ।।'' (२६७)**
= (''बुद्धिमान गागाभट्टाने (इतर ग्रंथांचे अवलोकन करून श्रीप्रभु रामचंद्रांच्या कृपेने) 'समयनय' हा ग्रंथ रचिला आहे; त्यायोगें श्रीशंभुराजे आनंदी होवोत, सुख पावोत.'')

(३) **''शाके दस्र–वियत्–रस–क्षिति–मिते (?) रौद्राभिधे वत्सरे । (धरा–अमिते) (=२) (०) (६) (१) = १६०२ शालिवाहन शक'') : (अंकवाचन) .... गागाख्यसूरि: कृती ।**
**श्रीमद्भोसलवंशभूषणमणे: शंभो सितच्छत्रप्रस्था –**
**स्वानंदाय सदा भवेदशिथिला कीर्त्यै प्रसादाय च ।।'' ।।२६८।।**
= (''शके १६०२ मध्ये, रौद्रनामक संवत्सरात, गागाभट्टलिखित 'समयनय' हा ग्रंथ; श्वेतछत्र (राजछत्र) धारण करणाऱ्या (छत्रपती), भोसले घराण्याला ललामभूत अशा संभाजी महाराजांच्या आनंदासाठी, कृपेसाठी कारणीभूत होवो, व त्यांना चिरंतनकीर्ती प्राप्त होवो.'')

* *

## २. टिप्पणी :

■ टिप्पणी : (१) : (बु.भू./ १.१५) :

**'समस्तसामन्तशिरोवसंत: ।' (अस्मि अहम् ।)**

**– छ. संभाजी महाराज –**

/१/ – जगाच्या इतिहासातील पहिले चतुर राजनीतिमुत्सद्दी/
दंडनीतिप्रणेता, सुदर्शन चक्रधारी भगवान श्रीकृष्ण गीतेत
स्वत:विषयी म्हणालेत :–

–**''ऋतूनां कुसुमाकर: अस्मि अहम् ।''** : (गीता. १०.३५)

= (''सहा ऋतूंमधील पहिला मधु (चैत्र) व माधव (वैशाख) या दोन महिन्यांतील) प्रत्यक्ष 'वसंतऋतू' तो मीच (श्रीकृष्ण) होय.'')

– आणि, हेच सर्वश्रेष्ठ प्रजानुरागी नृपति–लक्षण/नृपतिभूषण व चिरंतन शाश्वत वचन छत्रपती श्रीसंभाजी महाराज या नृपतींनी, राजनीतिपारंगत विशारदांनेही स्वत:विषयी उच्चारले आहे की,–

''सर्व सामंत (मांडलिक राजे) यांच्यांमधील किंवा यांच्या साठी सर्व ऋतूंमध्ये श्रेष्ठ 'वसंत ऋतू' (नवनवीन पल्लवानी व सर्वविध रंगछटांनी शोभिवंत, नित्यनवचैतन्याने रसरसलेला व उत्साहाने ओसंडलेला 'वसंत ऋतू') तो मीच आहे !''

येथे छ. संभाजींची काव्यप्रतिभा श्रीकृष्णांच्या काव्यप्रतिभेची अनुगामिनी शोभते ! हे या छत्रपतींचे अनुपम अद्विितीयत्व, वेगळेपण उठून दिसते.

– तशात, 'वसंत' या उल्लेखातच निहित असणारी 'कंदर्प'/ 'मदन' ही देखील भावगर्भ अर्थछटा मंत्रमुग्ध करणारी आहे, 'मनमोहन' श्रीकृष्णांजशी ! जी सर्व चराचरांस प्राणिमात्र जीवसृष्टीस युगांनुयुगे 'मोहिते' ती पुढीलप्रमाणे :–

/२/ – छत्रपती श्रीसंभाजी महाराज येथे स्वत:विषयी म्हणालेत की,–

– ''**मी 'समस्त सामन्त शिरोवसंत ।'** आहे.

(= समस्त सामंतामधील, सर्व सामंतासाठी श्रेष्ठ असा 'वसंत ऋतू' तो मीच आहे.'')

२/ –**'वसंत:'** । (Vasanta / the spring (season), vernal season. [comprising the two manths चैत्र (मधु / Chaitra / Madhu)

and वैशाख (Vaishakha / माधव / Madhava / the first and second months of the Bharateeya Calendar). As –

: (**'वैशाखे माधवो राधो !'** अमरकोश.)

३/ – **'मधुमाधवौ वसंत: ।'** (Susr.)

– **'सर्वं प्रिये चारुतरं वसंते ।''** (Rs. 6)

: (वसंतात सर्व काही सुंदरतर व प्रियही असते, सौंदर्यसंपन्न असते.)

– **'विहरति हरिरिह सरसवसंते ।'** : (गीतगोविंद : १.२)

४/ 'वसंत' या अर्थाचा पर्यायी शब्द आहे – 'कंदर्प' / 'मदन' आणि –

: 'अमरकोश' या ग्रंथात – 'कंदर्प' / 'मदन' या शब्दाचे असे एकूण १९ पर्यायी शब्द (अर्थ) दिले आहेत; की जे 'वसंत' या शब्दाचेही पर्याय ठरतात. (वसंत व मदन दोघेही 'पीयूष' (अमृत) चा वर्षाव करणारे आहेत.

: (cupid/ the God of love) तसेच, –

– मन्मथ, कंदर्प, दर्पक, अनंग, काम, कामदेव, मदन, मार, पंचशर, पंचबाण, पुष्पधन्वा, पंचधन्वा, स्मर, मनसिज, रतिपती, मकरध्वज, आत्मभू, प्रद्युम्न, शंबरारी, मीनकेतन, झषकेतन, कुसुमेषु अनन्यत्र: ।, इत्यादी १९ नांवे 'अमरकोश' ग्रंथात उपलब्ध होतात. : ('अमरकोश १ – स्वर्गवर्ग – २६ व २७)

५/ सातवाहन नृपती (इ.स.पू. २५० सुमारे/महाराष्ट्र, पैठण राजधानी) 'दक्षिणापथपती', 'राजराज गौतमीपुत्र श्रीसातकर्णी' हा स्वत:स आपल्या शिलालेखात, **'खतियदपमानमदनस् ।'** (=''मी दर्प आणि मानयुक्त पंचशरधनुर्धर क्षत्रिययोद्धा मदनच (जसा) क्षत्रिय (नृपती) आहे.'' – असे म्हणवितो.

– या दृष्टीने भोसले नृपती हे सातवाहनांचे वारसदार वंशजच ठरतात.

६/ कंदर्प (मदन) हा जन्मल्याबरोबर मोठ्याने आव्हान देत गरजला होता की, ''कं दर्पयामि ?' (='मी आता कोणाच्या दर्पाचे/ घमेंडीचे दमन/ मर्दन करू ? – ते मला सांगा.'') असा अर्थ घेता पुढील अर्थही ध्यानात घ्यावा लागतो –

– ''मी कोणाचे ठायीं 'मद' (=दर्प) निर्माण करू ?''

– ''कं दर्पयामि इति मदाज्जातमात्रौ जगाद च ।

तेन 'कंदर्प' नामानं तं चकार चतुर्मुख: ।।''

■ (भारतीय राजवंश : एकसत्य संशोधन), खं. १ /१९९८/ – प्रा. रा. आ. कदम/ पृ. ९५–१०० आणि ११६)

## ३. संभाजींचा जन्म.

**(१) सिद्धान्तविजय ग्रंथातील नोंद.**

**– डोंगरे, महादेव गणेश, १९०६, (कोल्हापूर.)**

१) **''शिवात्सुपुत्रोऽजनि शंभुवर्मा,**

**शिवोऽपरो नृषुनिलिंपसेवक: ।।**

: ('पण ते देवभक्त नव्हते.')

**भागीरथीमान् गिरिजापतिश्च,**

**बालेन्दुधृङ्नागविभूषितो हि ।।''५ ।।**

: (पृ. ११३, अध्याय ५ वा, श्लोक ५ वा)

= (''छ. श्रीशिवाजी महाराजांना शंभुवर्मा संभाजी नामक (त्रि)लोकांमध्ये पुत्र झाले. ते – (त्रिलोकांमध्ये) भागीरथी (गंगानदी), बालचंद्र (म्हणजे शुक्लपक्षातील चंद्रकोर), आणि आपल्या सर्वांगांवर सर्प धारण करणारे जणू की दुसरे 'भवानी–पती' 'गिरिजा (पार्वती) पती' गति श्रीशंकरच आहेत, असे वाटत असे !'') ।।५।।

२) **''तत्पुत्र: शाहुराज: ।''**

= ''त्यांना (संभाजींना) शाहू नामक एक पुत्र झाले.''

: (पृ. ११३, अध्याय ५ वा, श्लो. ६)

३) **''तथाक्षितिधरो जातोनु शाहसूनु:शिवाभिध: ।।**
**'शंभु-रामौ'च तत्पुत्रौ (शिवराजस्य)**
**शौर्यौदार्यगुणान्वितौ''** **।।२२।।** : (अ. ५/पृ. १२४)

= (त्याप्रमाणे भूमिप शाहसूनु शिवनामाभिधानी जन्मले. त्यांचे दोन पुत्र,
– श्रीशंभु राजे व राजाराम महाराज. ते दोघेही शौर्य व औदार्य इत्यादी गुणांनी युक्त होते.'') ।।२२।।

४) **''सम्राट् शंभुसुतो जात:**
**'शाहु'नामा नराधिप:''** **।।२४ ।।**

= (''शिवाजींचे ज्येष्ठ पुत्र संभाजी, त्यांचे पुत्र श्रीशाहूराज, हे एक सार्वभौम राजे होते.'') ।।२४ ।।
: (पृ. १२५/अ. ५/श्लो. १२४)

* *

## (२) 'शिवदिग्विजय' –

**– ग्रंथ, पृ. २०५, आ.१, (इ.स. १८९५. बडोदे).**

१) : (छ. संभाजींची श्लेषपूर्ण गूढ अर्थदर्शी जन्मतिथी.) :

**''शाके 'पत्रि-शशांक-सप्त-नवके' श्रीहेमलंब्यब्दके।**
**स्वातौ ज्येष्ठकनाम्निजनितो राज्ञ: शिवाजिस्त्रिय: ।।**
**द्वादश्यां शुभलोचनो नरपति: संभाभिदो वासरे –**
**भौमे, पक्षसिते, यदीय यशसा व्याप्ता: समस्ता दिशा: ।।''**

= ''शके ५,१,७,९ म्हणजे १५७९ शकामध्ये, हेमलंबी नामक अब्दात म्हणजे या नांवाच्या संवत्सरवर्षात, स्वाती नक्षत्र असताना, ज्येष्ठ नांवाच्या महिन्यात, शिवाजी राजांनी आपली स्त्री (पत्नी–सईबाईसाहेब) यांचे पोटीं 'शंभु' नामक पुत्रास जन्म दिला. त्या दिवशी द्वादशी तिथी होती. या दिवशीं 'भौम' म्हणजे मंगळवार पण येथे बृहस्पतीचा भूमीचे पृथ्वीचे दूध पिणारे अपत्य, म्हणून 'भौम'चा वार तोच 'गुरुवासर' होय, या दिवशी, शुक्ल पक्षात, ज्यांच्या यशाने समस्त (सर्व) दिशा व्यापून गेल्या आहेत अशा, सुंदर शुभ डोळ्यांनी शोभायमान अशा संभाजी राजांचा जन्म झाला.''

* *

* (टीप : महत्त्वाची व इतिहासाच्या अभ्यासकांनी अगत्यपूर्वक समजून घेण्यासाठी, ही टीप येथे नोंदविणे आहे.) –

(१) – वरील श्लोकांत, 'पत्रि–शशांक–सप्त–नवके' यातील 'शकाची संख्या' सुचविणाऱ्या अंकांसाठी वापरलेल्या शब्दांचा निश्चित परंपरेतील क्रम ठेवलेलाच नाही. यात 'पत्रि–शशांक' (बाण व चंद्रचे) '५ व १', हे अंक उजवीकडून डावीकडे वाचावे लागतात, संख्या १५ मिळते. पुढे, 'सप्त–नवके' यांचे '७ व ९', हे अंक डावीकडून उजवीकडे वाचून – '७९' ही संख्या मिळते; व '१५७९' या शकसंख्येचा बोध होतो.

(२) दुसरे म्हणजे असे की, यात 'ज्येष्ठ शु. १२'ला, 'भौम' म्हणजे 'मंगळवार' अशीच नोंद, १) 'शिवदिग्विजय' (पृ. २०५) व, २) 'शेडगावकर भोसले बखर' (पृ. ३७) वर केलेली आहे. त्यातील 'भौमे'चा अर्थ, मंगळवारीं' असेच समजून 'ज्येष्ठ शु. १०' ही तिथी होती, असे, 'शेडगांवकर भोसले बखर' मध्ये दिले आहे. म्हणजेच 'भौम'चा अर्थ दोन्ही बखरकारांना उमजलाच नाही. नव्हे, सन २००३ मध्ये सर्वप्रथम प्रा. रा. आ. कदम द्वारा हे तथ्य यच्चयावत् जागतिक क्षेत्राला सुस्पष्टपणे दिले आहे. तरीही आपले इतिहासज्ञ स्तब्धच आहेत.

(३) वा. सी. बेन्द्रे, डॉ. कमल गोखले, गो. स. सरदेसाई, डॉ. जे. एन. सरकार, यांपैकी कोणीही 'संभाजी–चरित्रा'त, वरील श्लोक छापलाही नाही, चर्चाही केली नाही. डॉ. स. स. शिवदे यांनीच फक्त 'संभाजी चरित्रा'त वरील श्लोक छापला आहे. पण त्यांनाही 'भौमे' या शब्दाचा उलगडा झालाच नाही. तसा उलगडा त्यांना न झाल्यानेच त्यांनी त्याची चर्चादेखील केलेली नाही. तर, काळ बलवत्तर असतो, हेच खरे.

– संपादक

# ४. संभाजी राजे : तेजस्वी शौर्याचा विद्युल्लोळ!

– केशव पंडित यांनी छ. शिवाजी महाराज यांची तसेच छ. संभाजी महाराज व छ. राजाराम महाराज यांच्या अशा तिन्ही छत्रपतींच्या कारकीर्दी पाहिल्या होत्या. छ. शिवाजी महाराज व छ. संभाजी महाराज यांना त्यांनी रामायण ऐकविले. राज्याच्या प्रशासनात ते 'दानाध्यक्ष' होते. त्यांनी छ. राजारामांच्या कारकीर्दीत 'राजाराम चरित' हा संस्कृत काव्यग्रंथ लिहिला. त्या छ. राजारामांचे चरित्र त्यांनी वर्णिले आहे. तसेच छ. संभाजी राजांच्या व्यक्तिमत्त्वाविषयी पुढील श्लोकांत उल्लेख केला आहे. :–

– ''**महाराजेन पिश्रास्य घातुकेन महीभृताम् ।**
**श्रीशिवछत्रपतिना सिंहासन निषेदुष्णा ।।३.५।।**
**संभाजीकेन च भ्राता ज्वलज्ज्वलन तेजसा ।**
**विलुंठितेषु सर्वेषु पौरजानपदेषु च ।।३.६।।**''

: ('राजाराम चरितम्'/सर्ग ३ रा)

= (सिंहासन लालसेने तिव्रइच्छेने महीपालांचा (राजांचा) पाडाव करणारे त्यांचे पिता श्रीशिवछत्रपती आणि ज्वलज्ज्वलन तेजाप्रमाणे चमकणारे भाऊ छत्रपति संभाजी महाराज यांच्यांप्रमाणे असलेले छत्रपति राजाराम महाराज....)

– अशा प्रकारें तेजोनिधी भास्कराप्रमाणे/सूर्याप्रमाणे चमकणारे त्या संभाजी महाराजांचे अद्वितीय शौर्य व कार्यकर्तृत्व होते.

* *

* छत्रपति संभाजींची विद्वत्तेच्या क्षेत्रातील महानता महाराष्ट्राला अभिमानास्पद अशीच होती. ज्या गागाभट्ट यांनी छ. शिवाजी महाराजांचा राज्याभिषेक समारंभ संपन्न केला, संभाजी राजांचा युवराज्याभिषेक समारंभ संपन्न केला व जे महाराष्ट्राच्या इतिहासात चिरंतन झाले त्यांनीच 'समयनय' हा ज्योतिषशास्त्र व धर्मशास्त्र यांविषयी ग्रंथ इ.स. १६८० मध्ये लिहिला आहे. त्या ग्रंथात त्या अद्वितीय विद्वान पंडितांनी दोन वेळा अत्यंत आदरपूर्वक उल्लेख केला आहे. एवढेच नव्हे तर, हा ग्रंथ त्या थोर विद्वानांनी छ. संभाजी महाराजांसाठीच लिहिला असा उल्लेख शेवटच्या श्लोकात केला आहे व हा ग्रंथ त्यांनी संभाजी राजांनाच अर्पण केला आहे. ते श्लोक पुढीलप्रमाणे आहेत :–

**(१) ''सिंहासनच्छत्रधराधिराजराजाधिराजैकशरण्यभूत: ।**

**शम्भु: स्वयंभु: प्रभुरस्तु तुष्ट: स्फरत्प्रतापोज्ज्वलदिग्विभाग: ।।२।।**

= (''सिंहासनाधिष्ठित व छत्र धारण करणारे, (संभाजी महाराज), श्रेष्ठ राजे आणि सम्राट यांचे एकमेव आश्रयस्थान असलेले (छ. संभाजी महाराज), आणि ज्यांच्या तेजस्वीपणाने तळपणाऱ्या पराक्रमाने सर्व दिशा उजळून गेल्या आहेत असे स्वयंभू शंभुराजे (छ. संभाजी महाराज) (माझ्या 'समयनय' या ग्रंथ–कृतीने) संतुष्ट होवोत.'') : ('समयनय'/इ.स. २०००/पृ.१)

: ९.१ : संभाजी राजे रायगडावर आले. त्यानंतर –

**१.** राजाराम यांची व्यवस्था : रायगडावर राजाराम यांच्या व्यवस्थेखाली संभाजी महाराजांनी– येसाजी दाभाडे यांस नेमले.

: राजारामांशी संभाजी राजांचे वर्तन प्रेमळपणाचे अतिशय ममतेचे होते. त्यांनी राजारामांचे तीन विवाह लावून दिले.

१. ताराबाई : हंबीरराव मोहिते यांची कन्या.

२. राजसबाई : घाटगे–कन्या (कागलकर).

३. अंबिकाबाई : (अहिल्याबाई).

**२.** (म. रा. चिटणीस – बखर) :

– संभाजी महाराज महाडास येऊन ताबडतोब पाचाडास येऊन, सरदार लोकांसह रायगड किल्ल्यावर चढले. दिंडी दरवाजानेच महाराज किल्ल्यात गेले. सरनौबत, येसाजी कंक यांसी भेटले.

– कानोजी भांडवलकर हवालदार सदरेत होते, त्यांस आधी कैद केले.

**(२) ''श्रीमद्‌भोसलवंशभूषणमणे: शंभो सितप्रस्था**

**स्वानंदाय सदा भवेदशिथिला कीर्त्यै प्रसादाय च ।।'' ।।२६८।।**

= (शके १६०२ मध्ये, रौद्र संवत्सरात, विश्वामित्रगोत्ररूपी कमळाला सूर्याप्रमाणे असणाऱ्या मी (गागाभट्ट यांनी) रचिलेला 'समयनय' हा ग्रंथ–

: ''श्वेतछत्र धारण करणाऱ्या, भोसले राजकुलास ललामभूत, भूषणावह अशा, छत्रपती श्रीसंभाजी महाराजांच्या आनंदासाठी, कृपेसाठी कारणीभूत होवो व त्यायोगें त्यांच चिरंतन कीर्ती प्राप्त होवो.!'')

: ('समयनय'/पृ. ४६/संपा. डॉ. प्रमोद गणेश लाळे, व अत्य तीन विद्वान./प्रका. भारतीय इतिहास संकलन समिती, महाराष्ट्र : पुणे– ३०/स. २०००)

* *

साळमंजुळमंजरीसमास्वादनमत्तकोकिळकल
कंठसमानध्वसंयोगिहृदयाह्लादकमुक्तिमानिनीमा
नध्वंसकानिवासितसमस्तदुर्वासिनाबीजहार्धनिवा
त्मकबीजजीवातुकावाङ्मनसगोचरनानापुष्पजा
तिपविणमणात्रातपरत्रागमधुकरात्सामंडपांतर्ग
तपुष्पंधयझांकारारावरावितवंदनादिमाननिंदि
तनंदनोद्यानपाटितचैत्ररथपद्माणाजकूजनप्राणक
कसारिकाशब्दसानसक्रोकारकृतकोदिशीकमहोम
हापातकिसंघातसमाश्वासनपूर्वकसमाधानत्राणाम
होद्यानमाळामनोज्ञसप्तद्वीपजायनाजायमानान्यत
मद्वीपदेदीप्यमानसमुद्रांतनिष्क्रांतरत्नानुविद्धानंत
परिखापरिक्रांतसुवर्णहर्म्यावृतगोपुरप्रांतेशांती
कृतसंसारपरिभ्रमणश्रांतसमावेशितशांतदांतनि
जांतर्युतचक्रकूजनघोषितकृतांतानर्घ्यमौक्तिकमाळि
काजाळलंबितवितानसंतानशोभायमानमहोत्तरा
स्तरणानुषक्तदेवयानोचितबहुविधविमानवेदिका
विभ्राजमानबहळागरुगुग्गुळाद्यष्टांगधूपधमधमा
यमानवनकप्राकारहर्म्यानुकारसंसारसारलंप
पाविबुधमंडळीमंडितांजळियोगानुध्येयद्वारस्थीकृ
तांगणांगजनगोपवतर्जनीतर्जनमात्रविधेयीकृतवि
ष्णुविरिंचिप्रमुखदेवाधिदेवसर्वदेवतासार्वभौम
धामधामीभूतमंजुमणिमंदिरांतर्गतयवांकुरना
जितब्रह्मादिपंचमंचकात्मकत्रिदशोपासितमकरं
दसंदोहामोदितादर्शास्तरणोपधानहंसगुलिदलिम
समासक्तपर्यंकांचितकमनीयकामेश्वरांकस्थित
सस्मेरमुखाकृतिनिनाकृतषडुन्मिषिताचक्रारविंद
द्युतिनिसर्गकज्जळितलोचनलावण्यविनिंदित
नीलोत्पलरुचिररुचिविजितपरिपक्वदाडिमी
बीजवर्णविद्रुमदंतोद्योतनिपतनसंप्राप्तपद्मरागा
रुणावसनकंचुकीरचनसमुद्गीर्णलौहित्यसंव
ळितांगारुणिममहिमलोहिततमलोहितमणि
माळानिलोहितमुक्ताहीरकेंद्रनीळहारानुप्रकटि

त्तनिजप्रवाहोत्तंहितजाह्नवीकलिंदजासलिलक
ल्लोलप्रसरप्रकाश्यमानस्वरूपवत्सरस्वत्युपसे
व्यमानकामयमानकामेशप्राणवल्लभमुखाम्भोजदी
धितस्मृतपाननिपातितपीयूषबिंदूयमाननासा
मौक्तिकसंभ्राजमानवैजातिकसंध्यारागानुरंजि
तजलदज्वालज्वालितारुणोदयकालीनतरणि
मंडलायमानारुणवसनाच्छादितपद्मरागम
यत्रिकोणमंडनमंडनायमानतारुण्यसमयोपची
यमानराजराजेश्वरतरुणिमतपःफलायमाना
नुपमानकुचकुड्मलकोच्छ्रायनमन्मध्यलतिका
लंगरूपनीरुविधिवलितत्रिवलीवलनविद्योत
मानशृंगारबीजांकुरकोरकायमानरोमराजि
~~राजितगात्रलतालक्ष्मीनि... [illegible]~~
घल्लुहंसभूषावेषायमानसर्वांतर्यामिहंसपर
महंसोपास्यमानचरणकिंकिणीकारणका
नव्याजचतुर्वेदोद्भासितबहुविधदेहव्यापारशब्द
निःशब्दप्रकारकलितनिजाधीनानुवानध्यायमानप्र
तिपक्षक्षयिष्णुरस्थापाकनिष्ठुरदशाविधव्यवस्थापि
तदिव्यदेहावस्थविध्वस्तनखस्वरूपकुमुदसरखवि
योगासनाहितहरितलोहितपीतश्यामलवर्णाक्रां
तचलज्ज्योतोञ्ज्वलितांगुलीयकच्छलनक्षत्रसंहति
विस्मृतदेहभावानुशाव्यमानालक्तकरसमिषप
तिप्रेमप्रजालिषेकपरिपूर्यमाणनिजशासनानिय
मितनिर्द्वंद्वद्वंद्वतियोगावलीलोल्लासितललितद्व
द्वजावकामितफलप्रदानविधिविशेषिताहमहमि
कापूर्वीभूतपूर्वपंचपल्लवांचितकल्पशाखिशाख
प्रतिद्वंद्वांतर्विलुलितचरणारविंदद्वंद्वनिदिध्या
साध्यासिततादात्म्यभावप्रतिदिवसप्रेमकौतूहलजु
नप्रारंभितपादुकापूजनसंप्रार्थकहुंकारपातितनह
षप्रतुलावतुलकितमहोर्मिःःलासंफाल्लितसाले
लप्रादुर्भावदर्शनमात्रहृदयानुशयशायितातापि
चातापिदुर्दीवबंधितविंध्याद्रिनिर्बंधदुर्भावलोपामुद्राप
तिप्रभावयोगज्ञानविज्ञानविज्ञातविभ्रमावच्छसितोद्दलन

ध्यानप्रबंधपठनरुद्राक्षधारणशिरःकेशानुसारणानुव
द्धार्धनारीनटेश्वराविर्भावविभूतिमात्रप्रदानदत्तपरमेश्व
र्यप्रसिद्धस्वसहजभावानुदिननिबद्धपद्मासनाबद्ध
कामकलास्तोत्रपठनयापितषड्यामश्रीमुन्नप्रार्थनाविर
तभ्रूकुटिवक्रिमचंक्रमणाक्रमसंक्रमितनेत्रशोणिमोप
शमितजगदंबापाशपाशितोकुशाकर्षणत्रासितकतिप
यदुर्दांतमहानागेंद्रान्निश्चनिपाताद्रोद्रासिविद्युद्वलिच
लनशालिलक्ष्मीमदांधप्रमादमदितोन्मत्तदुर्मंत्रिमंत्रि
तछत्रधारणासिंहासनाधिरोहणासत्यहीमताविर्भूत
बहलतरकोलाहलकिलिकिलाकलितातिक्रूरकठिनसं
ग्रामोद्योगसंभ्रमोद्भ्रांतभ्रांतग्रामसमुद्रवलयावलितपृ
थ्वीतलप्रथितप्रकरणगुरुपरिचर्याचरणसंपातशुद्धांतः
करणश्रावणशासनौकुशासनसकलजनरसनाग्र
णप्रबलपापक्षयकरणानुस्मरणतापत्रयहरणनिस्
पृजनसंभावितनवावरणभावनजनरंजितचैतन्याद
नणदुर्दैवदावपीडितपापसंघातसंघटितप्रमोदघन
घनावरणानिरतध्याननिर्धौतजन्मजरामरणठवो
दधिदुस्तरणोपायनिखिलनिगमस्मृतिशास्त्रपुराण
संमतसंपादितनितरणादरणमहाप्रलयकालकलि
ताक्षरण ---- योगिध्यायमाननामधेयजामदग्न्यगो
त्रालंकृतकङ्काटकदेशीयद्विजांतर्गतबाकरोपनाम
ककुडालकारनामक्षेत्रमंडलकुंडलायमानकुडाल
नगरोपाध्यायधौरेयद्विजाग्रगण्यनामनामदेवब्रह्मा
त्मजाश्वलायनसूत्रोपबृंहितऋग्वेदांतर्गतशाकलशा
खाध्यायिसकलमांत्रिकवर्यमहामहानुभावप्रजावित
यमनियमासनप्राणायामप्रत्याहारध्यानधारणासमाधि
ष्टांगयोगानुष्ठाननिष्ठाकनिष्ठीकृतवसिष्ठादिशिष्टमहा
त्रायस्वामिभ्यः शिववरस्वामिशंभुमहादेवयात्रासमाग
मसमागतसमस्तदिग्देशवास्तव्यजनसमाचितकर्णा
तुदसलिलकोलाहलवर्णनानुकर्षणसंयातशिवशक्तिशा
वचिकारमनःकल्पिततोयौघतरंगिततटकोटिप्रकारस
मुज्झितस्थायिव्ययप्रतापविश्वासहनिश्चंद्रसंतिदेवानुसार
संकल्पितसर्वसर्वस्वागारमांधातृसरदेशामहोदारप्रथमो
तर्पणप्रदानकृतनिर्माणप्रारंभनिर्धारविहितकोटनगा
तसंख्याककुलप्रतिष्ठापूर्वकपूर्वपूर्वजसमुद्धारपरीक्षा
निमित्तकैलासवासिपरिस्थापितपूर्वसेवनोद्योगव्यापा
रराजावर्जितजवनिजामदत्तापरिगृहीतसंपूर्णसोमा

ल्लंघितदिल्लींद्रदलपरिरक्षिताधर्मपरानुषंगसंमीलितपरा
क्रमाकलनानुरक्तदशरथाचरणाशिवचरणकमलप्रह
ष्टतातप्रेमसंभासराज्यतरणीमंडलसरणीसमनुसरणाक्रो
क्रांतपितृगानुकूलभानुसंवर्धितवैरवनरचितमरुद्विडुत्समु
दायसंरंभसमारब्धदौर्जन्यपंचसमसेवकसाहायिकशि
वयोगिभूतिभूषितभालप्रदेशाकविवर्यकविकलशाप्रोत्सा
हनसमुल्लसदरुणिमसेसक्तहृद्देशगृहीतस्वेष्टदेवतानिदे
शप्रचंडतरदोर्दंडास्फालननिगृहीतखलखंडखंडितारा
तिमुंडमंडलिकाशनिप्रचंडप्रत्यर्थिकीशावरवरिष्ठघो
षितसर्वाभीष्टनिजाज्ञाडिंडिमरवोद्घोषसंतुष्टप्रजासंघ
द्विजदेवोद्धीहिताशीःपरंपरापरिपूर्णायुःसाधितसंपू
र्णाश्वसमुदायोदंचन्मेचकाधिरोहणाछत्रधारणादवहेलि
तदिल्लीशाद्यनेकछत्रपतिभुवप्राप्तप्रकृष्टदुर्गाधिपत्यदक्षि
णाद्रवीक्षारक्षणलब्धसकलदक्षिणाविनिःसृतसिणारुदा
नाविनेदितविद्वज्जननिंदितदेवशारिवेलिजप्रचंडप्रतापा
पनतापितारवर्गगर्वरववीक्षितापिवर्गदारुदारुणस्वयशसो
मशास्सोममंडितोद्वेलडिंडीरपिंडपांडुरापारपारावारवलो
लालितेलावलयविराजमानराजाधिराजश्रीशंभुराज
छत्रपतिनाविहितंयुगव्योमरसेंदुसंचालितसमातिक्रांत
नृपश्रीशालिवाहनसाकेपोद्भवसंवत्सरस्यसितदशमींदुवा
सरसंभ्रमयराज्याभ्यासनेहूंप्रतिज्ञातचतुर्विंशतिछत्र
त्रमितशुद्धकलधौतघटितदशसहस्रसंख्याकसुवर्णा
णीयवराहार्पणाशासराज्याभिवृद्ध्यर्थाभिमतार्थसि
ध्यर्थगुरुपादुकार्पणपुरःसरंश्रीपादुकासज्जननिमि
त्तंसकलविपक्षक्षयार्थमायुरारोग्यैश्वर्यपुत्रपौत्राद्य
भिवृध्यर्थंप्रत्यब्दंस्वीयस्वामीयपुत्रपौत्रपारंपर्यक्रमे
णाचालनीयंउपरोक्तंव्यंचसुंदरीमंदिरमंडनार्थानु
दत्तसहजनिजकर्णोर्ध्वकरणपुष्पलाकुंचनोपहसितैरा
वतमहत्वमत्तमातंगवल्गुवल्गनविजितरविरथतुरं
गमालिवाजिरलालयगणपोङ्क्षेश्वसमानजातीय
पंचाश्वसांगोपांगयाप्ययानप्रतिवर्षसंबंधिवस्त्रो
ज्यसहितसपरिजनसपरिवारस्वामिवार्षिकमप्येत
दंतगतमेवबोद्धव्यमित्यलंविस्तरपत्ररचनयाशुभमस्तु

* (दानपत्रावरील नमनाचा श्लोक.) :-

नमस्तुंगशिरश्चुंबि चन्द्रचामर चारवे
त्रैलोक्यनगरारम्भ मूलस्तंभाय शम्भवे ।।

श्री शम्भो शिवजातस्य मुद्राद्यौरिव राजते
यदंक सेविनो लेखा वर्तते कस्यनोपरि ।।

।। ब्रम्हानन्दं परमसुखदं
।। द्वन्द्वातीतं गगनसदृशं तत्त्वमस्यद्विलक्ष्यं ।।
।। एकं नित्यं विमलम् अचलम् सर्वदासक्षिभूतं ।
।। भावातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि ।।

।। मतं मे श्रीशिवराजपुत्रस्य श्रीशंभुराज ।।
।। छत्रपते: यदत्रोपरि लेखितं । छ ।। श्री ।।

-''-यापुढे उपरिलिखित हे, मी छत्रपती श्रीशिवरायांचा पुत्र छत्रपती संभाजी यांची संमती आहे, स्वीकृती आहे.''

('मतं मे ...लेखितं ।' ही अक्षरे छत्रपती श्रीसंभाजी राजांच्या हस्ताक्षरातील आहेत.)

**: (मूळ संस्कृत) :**

**– ''०।।र्दस्वस्तिश्रीमद्रत्नखचित महार्हमाणिक्यमंडित हेममयमुख्यस्तंभोपशोभित सुवर्णरज्जुराजिरंजित हरिन्मणि हीरककांतिछ्टानीराजित हैरण्यराजततंतुविहित– वस्त्र–विस्तार–विस्तृत मारकत–पताका–पंक्तिपरिष्कृत समारूढ सुरव्यूहपुरोभाग– संगीतशास्त्रानुसारि गंधर्वसिद्धकिन्नरसाध्या–(अ)प्सरोगण – कण्ठमाधुर्यभंगी–संगत–समारचितगानानुकूलीकृत मनोहरतर–ललित, सत्तालजांबूनदविनिर्मित विविधजलयानजालालंकृत भूरिस्वर्णभारभासुरभूमीधर समुदाय–भासमान सुधा–सिंधु–मध्यवर्ति त्रैलोक्यचक्रवर्ति कविकुलवाग्वैखरी वर्णनीय प्रधानवस्तुप्राध्यान्यांतवर्ति प्रतिदिवस प्रोत्फुल्ल बकुल कुरबकाकीर्ण चंपकाशोककुटज कल्हार– नागपुन्नागमल्लिका मालती– केतकीजाति वेलैलावल्लिवल्लित– ताल–तमाल–हिंताल– नारीकेलक्रमुकदाडिमी जंबुनिंबु जंबीर– बीजपूरापूरित पारिजातराजिराजित लवलीलंघित माधवीमिलनमुग्धमुकुलित रसाळ मंजुळ मंजरीसमास्वादन– मत्तकोकिळकलकंठ समारब्धसंयोगि**

: (मराठी अनुवाद) :

- ''।। श्री ।। स्वस्ति।। अमूल्य जडजवाहिऱ्यांनी जडविलेल्या, मुख्यत: सुवर्णस्तंभांनी सुशोभित, सुवर्णसाखळ्यांनी अलंकृत, हिरा, पन्ना अशा तेजस्वी किरणांनी झळाळणाऱ्या, सुवर्णमणि गुंफलेल्या आणि सोन्याच्या धाग्यांनी विणलेल्या वस्त्रांच्या बिछायतींनी सजविलेल्या राजसिंहासनावर श्रीसंभाजी महाराज विराजमान झालेले आहेत. त्यांच्यासमोर (त्यांचे मांडलिक, सामंत) नृप–गण उपस्थित आहेत. समोर शास्त्रीय संगीताचे ज्ञाते आणि गायक गंधर्व, किन्नर, साध्य आणि अप्सरा इ. आपल्या मधुर सुरांमध्ये विविध रागांतील गीत–रचना सादर करीत आहेत. त्यांच्या अपूर्व अशा गायनकलेमुळे सर्वांची मने संगीतमय बनली आहेत. विविध आकार–प्रकारांच्या सुवर्ण जलयानांच्या जाळ्याने शोभिवंत अशा अमृतसागरामध्ये श्रीविष्णू शोभून दिसावेत त्याप्रमाणे उच्चतम कवि–कुलांकडून प्रशंसित, प्रधान मंडळाचे केंद्रबिंदू असे त्रैलोक्य चक्रवर्ती श्रीसंभाजी महाराज सिंहासनावर शोभून दिसत आहेत. सजविलेले (सुसज्ज, सुमंडित, शोभित) भरपूर (विपुल) सुवर्णालंकारांनी सजविलेले राजमंडळास शोभायमान असणारे, अमृताच्या सरोवरात (सागरात मध्यभागीं) विराजमान असलेल्या विष्णूप्रमाणे त्रैलोक्याचे (स्वर्ग, पृथ्वी, पाताल) चक्रवर्तीसम्राट, संभाजी राजे शोभत होते. श्रेष्ठ अशा कवि–कुल (मंडला)च्या मधुरवाणीने स्तवन (स्तुतिगौरव माहात्म्य–वर्णन) स्तुती केली जाणारे, (असे ते संभाजी राजे होते.) त्यांच्या राजप्रासादाच्या चारी बाजूंना बहरलेले उद्यान आहे. ज्यामध्ये बकुळ, कोरांटी, चाफा, अशोक, कुटज, कलहार नाग, पुन्नाग, मल्लिका, मालती, केतकी, जाई आणि वेलदोड्याच्या वेलींनी लपेटलेले ताड, तमाल, हिंताल, नारळ, सुपारी, डाळिंब, लिंब, जांभूळ, जंबीर आणि संत्र्यांची झाडे डोलत आहेत. पारिजात वृक्षांनी शोभिवंत, केळींच्या बागांनी संपन्न, माधवीलतांनी मनोरम, आम्रवृक्षांच्या आम्रमंजिरींतून मधुरसाचे आस्वादन करणाऱ्या मधुमत्त कोकिळांच्या मधुर आवाजाने प्रेमीजनांची हृदये प्रिय मिलनासाठी उत्कंठित होत आहेत. मानिनींचा मान (मनमोही वातावरणामुळे) नाहीसा होत आहे. सर्व दुर्वासनांची (दुष्ट विचारांची) बीजे नष्ट होत आहेत. अर्धरेखात्मक बीजाचे आधारभूत, वाणी आणि मनालाही अपरिचित अशा अनेकविध फुलांवर गुणगुणत भ्रमर मधुपान करीत आहेत. द्राक्षबागेत गुंजारव

: (मूळ संस्कृत) :

हृदयाह्लादकमुक्ति-मानिनीमानध्वंसकनिर्वासित
समस्तदुर्वासनाबीजहा-(अ)र्धरेखात्मकबीज
जीवातुकावाङ्मनसगोचर नानापुष्पजाति परिभ्रमण-
प्राप्तपरभागमधूकद्राक्षामंडपांतर्गत-
पुष्पंधयझांकारारावरावितचंदनादिमाननिंदित
नंदनोद्यानपाटितचैत्ररथप्रमाण-भक्तजनप्राण-
शृकसारिकाशब्दसारस- क्रेंकारकृतकांदिशीक
महामहापातकिसंघात समाश्वासनपूर्वक समाधानत्राण,
महोद्यानमालामनोज्ञ सप्तदीपभावनाभाव्यमानान्य तम-
द्वीपदेदीप्यमान समुद्रान्तर्निष्क्रांतरत्नानु विद्धानंत
परिखापरिक्रांत सुरव्यूहव्यापृत गोपुरप्रांतशांतीकृत
संसारपरिभ्रमण श्रांतसमावेशित शांतदांतनिजांतर्गत-
भक्तजनभीषित कृतांतानर्घ्य मौक्तिकमालिकाजाल
लंबितवितान-संतान शोभायमान मृदुत्तरास्तरणानुषक्त
देवयानोचित बहुविधविमानवेदिका विभ्राजमान
बहळागरुगुग्गुळाद्यष्टांगधूप घमघमायमान- कनकप्राकार
हृदयानुकार संसारसारसंपूर्णविबुधमंडली मंडितांजलि
योगानुध्येयद्वा:स्थीकृतांगनाजनगौरव तर्जनीतर्जनमात्र
विधेयीकृत, विष्णुविरिंचिप्रमुख देवाधिदेव
सर्वदेवतासार्वभौमधामधामीभूत मंजुमणिमंदिरांतर्गत
यवांकुरराजित ब्रह्मादि पंचमंचकात्मक त्रिदशोपासित
मकरंदसंदोहामोदिता- दभ्रास्तरणोपधानहंस- गुलिदलिम
समासक्त पर्यंकांचित कमनीय कामेश्वरांकितस्थित
सस्मेरमुखाकृति- निराकृतेषदुन्मिषितारक्तारविंदद्युति
निसर्गकज्जलित लोचनलावण्यविनिंदित

: **(मराठी अनुवाद)** :

करणाऱ्या भ्रमरावलींमुळे संपूर्ण उद्यान संगीतमय बनले आहे. या उद्यानाच्या सौंदर्यापुढे स्वर्गातील इंद्रदेवाचे नंदनवन आणि कुबेराचे चैत्ररथ उद्यानसुद्धा फिकी पडतील. जे भक्तजनांचे प्राण आहेत, पोपट, मैना यांच्या मधुर स्वरांनी आणि बगळ्यांच्या थव्यांच्या कलकलाटांनी घाबरून पळून जाणाऱ्या चोर–अपराध्यांना लपण्यासाठी सुरक्षित जागा मिळेल अशी ही उद्याने म्हणजे महाउद्यानांची जणू मालिकाच आहे. पृथ्वीतलावरील सात द्वीपखंडांमधील एका अद्वितीय द्वीपखंडावर असणारा हा राजमहाल समुद्रातून काढलेल्या हिरे–मोत्यांनी जडवलेला आहे. अशा हिरेजडित महालामुळे दशदिशा तेजोमय बनलेल्या आहेत. राजप्रासादाच्या सभोवार खोल खंदक खणलेला आहे. राजनगरात प्रवेश करण्यासाठी नगरद्वार आहे. हे नगरद्वार नृपगण व राजकीय अधिकाऱ्यांनी नेहमीच गजबजलेले आहे. जीवन व्यवहाराच्या धावपळीत शिणलेली मने येथे येऊन निर्वेध आश्रय प्राप्त करतात. आणि मरणाच्या भीतीतून मुक्त होतात. येथील प्रासादांचे छत अमूल्य अशा हिऱ्या मोत्यांच्या माळांनी सुशोभित आहेत. ज्याप्रमाणे देवांच्या वाहनांवरती रेशीमवस्त्राच्छादित सुसज्जित आसन–व्यवस्था असते, त्याप्रमाणे येथे ठिकठिकाणी  चौथऱ्यांवर मुलायम गालिच्यांची बैठकव्यवस्था केलेली आहे. येथे सर्वत्र अगरू, धूप, गुग्गुळादि सुगंधी द्रव्यांचा घमघमाट दरवळत असतो. देवता–गणांनी व्यापलेल्या, गोपुरांमुळे ज्यांच्या संसार–परिभ्रमणाच्या वेदना शमल्या आहेत, अशा साधकांना ज्यांनी आश्रय दिला आहे, ज्यांचा अंतरात्मा शांत झाला आहे, ज्यांच्या राज्यातील भक्तजनांनी कृतांतालाही नमविले आहे, मौल्यवान मोत्यांच्या माळांनी गुंफलेल्या मृदू आस्तरणांनी ज्यांच्या राज्यातील देवालये सजली आहेत, येथील गृहमंदिरे नाना प्रकारच्या गच्च्या आणि ओटे यांनी सजलेली आहेत. यांमध्ये सुवर्णाचे प्राकार आहेत. मनोवांछित गृहस्थ जीवनाचे सुख उपभोगणारे विद्वज्जन येथील मंदिरांमध्ये ब्रह्मा, विष्णू इ. देवांच्या समोर हात जोडून विनम्र होतात. मंदिराच्या प्रवेशद्वारावर स्वागतशीला परिचारिका हात बांधून सेवेसाठी उभ्या असतात आणि केवळ संकेतावर कर्तव्यपूर्तीमध्ये रत होतात. देवांच्या अस्तित्वामुळे येथील प्रत्येक निवासस्थानास ऐश्वर्य आणि सार्वभौमत्वामुळे वैभव प्राप्त झालेले आहे. सुंदर रत्नखचित मंदिरांच्या अंतर्भागात पेरलेल्या यवांकुरांमुळे शोभणारे, पांचूंच्या मंचकावर आरूढ झालेल्या, ब्रह्मा आदि

: **(मूळ संस्कृत)** :

नीलोत्पलरुचिररुचि- **विजित** परिपक्वदाडिमीबीज-
**वर्णवैभव**- दंतोद्योतनिपतनसंप्राप्त- **परभागारुण**
वसनकंचुकीरचनसमुद्गीर्ण **लौहित्य संवलितांगारुणिम**-
महिमलोहिततमलोहित-मणिमालातिरोहित
मुक्ताहीरकेंद्रनीलहारानु **प्रकटित निज** प्रवाहांतर्हित-
जाह्नवीकलिंदजासलिलकल्लोल,**प्रत्यक्ष**-
**प्रकाश**यमानस्वरूपवत्सरस्वत्युपसेव्यमान-
**कामयमानकामेशप्रारब्ध**- मुखामृतदीधित्यमृतपान
निपतितपीयूषबिंदूयमान नासामौक्तिकसंभ्राजमान वैभातिक
संध्यारागानुरंजित जलदजालजालित- **(अ)रुणोदयकालीन**-
**तरणिमंडलायमानारुण- वसना छादित**-
पद्मरागमयशिरोमंडन- **मंडनायमान**- तारुण्यसमयोपचीयमान
**राजराजेश्वर तरुणिमतप: फलायमाना-नुपमानकुचकुड्मलो**-
छ्रायनमन्मध्यलतिका-**भंग**- भयभीरुविधिवलित-
त्रिवलीवलनविद्योतमान- शृंगारबीजांकुर- कोरकायमान-
**रोम-राजि-राजित- राजराजेश्वरीनिरंतर** सन्निधिसुखजिघृक्षु
हंसभूषावेषायमान सर्वांतर्यामिहंस परमहंसोपास्यमानचरण-
किंकिणिकारणत्कार व्याजचतुर्वेदोद्भासित **बहुविध**
देहव्यापार**शब्द नि:शब्दप्रकारकलित** निजाधारानुवारध्यायमान
**प्रतिपक्षक्षयिष्णुक्षयापा करिष्णु** दशविधव्यवस्थापित
दिव्यदेहावस्थ **विधृत नखस्वरूप** कुमुदसखवियोगासहिष्णु
हरितलोहितपीत**श्यामल** वर्णाक्रांतरत्नजातो ज्जृंभितांगुलीयक
**छळन**क्षत्रसंहति विस्मृतदेहभावानुभाव्यमाना- **(अ)लक्तक**
**रसमिषपति**- प्रेमपूराभिषेकपरिपूर्यमाण निजभावनानियमित

: **(मराठी अनुवाद)** :

देवतांनी ज्यांचा आश्रय केला आहे, अत्तरांमुळे सुगंधित झालेल्या, विपुल पलंगपोसांनी आच्छादलेली आसने जेथे आहेत, सुंदर रत्नजडित गृहमंदिरांच्या आसपासचा परिसर युवांकुरांनी नयनरम्य बनलेला आहे. पांचूच्या हिऱ्यांनी अलंकृत सिंहासनावर तेहतीस कोटी देव प्रतिष्ठापित झालेले आहेत. अत्तरांनी सुगंधित अशा मुलायम पलंगपोसांनी आच्छादिलेल्या आसनांवर फुलांच्या परागांनी सुगंधित बिछायती आहेत. – राजहंसांच्या मृदुल मुलायम परांचे (पिसांचे) रेशीमस्पर्शी बिछाने आहेत. (त्यांवर) कमनीय कामेश्वर त्या मदनाच्या अंकावर रतितुल्य सुंदर कामधुंद सुंदर रमणी आहेत; त्या रमणी उमलत्या रक्तारुण कमळकळीच्या सौंदर्यावर मात करणाऱ्या आहेत. मुळात अंजनसंस्कारित न केलेले मात्र काजळ कोरल्यासारखे, सुश्यामल मनोवेधी दिसणारे त्यांच्या नेत्रांचे सौंदर्य नीलकमलाच्या सौंदर्याला मागे टाकणारे आहे. त्यांच्या दंतपंक्तींचे तेज पिकलेल्या डाळिंबाच्या सतेज तरल रंगवैभवाला लज्जित करणारे आहे. अधरद्वयाच्या गुलाबी रंगाने त्यांनी परिधान केलेल्या शरीराच्या वरच्या भागातील वस्त्रांवर तांबूस, गडद लालबुंद उधळण केलेली आहे. ज्यांच्या (कामदेव सदृश प्रियकर पतींच्या) पिळदार शरीरावर रक्तवर्णी रंगाची उधळण शोभून दिसत आहे. त्यांच्या गळ्यांतील माणकांच्या माळांच्या आड हिरे, मोती आणि नीलकांत मण्यांचे हार दडलेले असूनही नयनरम्य तेज प्रकट करीत आहेत. ते गंगेने आपल्या प्रवाहात सामील करून घेतलेल्या यमुनाजलाच्या लाटांप्रमाणे दिसत आहेत. प्रकाशमान रूपवती सरस्वती ज्यांच्या सेवेला हजर आहे, श्रीशंकराच्या मुखावर विराजमान असलेल्या चंद्राच्या किरणांचे अमृत–पान ज्यांनी केले आहे, अमृत–बिंदूप्रमाणे असलेल्या नाकातील नथीतील मोत्याच्या (मौक्तिकाच्या) प्रात:कालीन उजळत्या तेजोमयी संध्येप्रमाणे भासणाऱ्या छटेने प्रकाशित मेघांच्या जाळ्यांतून बाहेर आलेल्या अरुणोदयकालीन सूर्यमंडलाप्रमाणे लाल वस्त्राने आच्छादित, माणकांच्या रंगाचे शिरोभूषण धारण केलेले, तारुण्यकाळात केलेल्या राजराजेश्वराच्या उत्कट तपश्चर्येचे फळ म्हणून प्राप्त झालेले अनुपम उन्नत विस्तृत वक्षस्थळ (रुंद भरदार छाती) संकोचाने मध्यभागीं

: (मूळ संस्कृत) :

**निर्द्वन्द्व**– द्वन्दतिरोमावली
लोल्लासितललितद्वन्द्वभावकामितफल–
**प्रदानविधिविशेषित**–अहमकमिकापूर्वाभूतपूर्व **पंचपल्लवांचित**
**कल्पशाखिशाख** प्रतिद्वन्द्वान्तर्भाव–
ललितचरणारविंदद्वन्द्वनिदिध्यासाध्यासित, **तादात्म्यभाव**
**प्रतिदिवसप्रेम**– कौतूहलभरप्रारंभित पादुकापूजनसंप्राप्तैक–
हुंकारपातितनहुष **प्रभुभाव**– **चुलकित** महोर्मिमाला– **संफालित**
**सलिल प्रादुर्भाव** दर्शनमात्रहृदयानुशयशायितातापि–**वातापि**–
दुर्दावबंधित– **विंध्याद्रि–निर्बंध**– **दुर्भाव** लोपामुद्रापति– **प्रभाव**
**योगज्ञानविज्ञानविज्ञात** विश्वभावभसितोद्धूलनध्यान–
**प्रबंधपठनरुद्राक्ष धारण शिरः– केशानुसारणानुबद्धा–**
**अर्धनारीनटेश्वराविर्भाव**– विभूतिमात्रप्रदानदत्त– **परमैश्वर्य**–
**प्रसिद्धशुद्धसहजभावानु दिन–निबद्ध– पद्मासनारब्ध**
**कामकलास्तोत्र**–पठनयापितषड्याम शंभुनृपप्रार्थनाविर्भूत–
भृकुटिविक्रिम– **चंक्रमणक्रमसंक्रमित– नेत्रशोणिमोपशामित –**
**जगदंबापाशपाशितो(तां) कुशाकर्षणत्रासित कतिपय**
दुर्दान्तमहाराष्ट्रो– **न्मिश्रनिरभ्राभ्रोद्भासि** विद्युद्वलिवलनशालि
**लक्ष्मीमदांध** ‘**प्रमादमदिरोन्मत्त** दुर्मन्त्रिमंत्रित– **छत्रधारण**
सिंहासनाधिरोहण– प्रत्यूहीभूताविर्भूत–बहळतरकोलाहल
**किलिकिलाकलिताति** क्रूरकठिन **संग्रामोद्योग** संभ्रमोद्भ्रांतभ्रांत–
ग्रामसमुद्रवलयावलित पृथ्वीतल–**प्रथितप्रकरण**–
गुरुपरिचर्याचरणसंयात– **शुद्धांतःकरण शरणशरणैकशरण**–
**सकलजनरसनाभरण**– **प्रबलपापक्षयकरणा– (अ)नुस्मरण–**

: (मराठी अनुवाद) :

लवल्यामुळे होणाऱ्या भयभीरुविधिवलित त्रिवलीमुळे व्यक्त होणाऱ्या शृंगाराच्या बीजांकुराच्या कळीप्रमाणे असलेले, शरीरावर व्यक्त होणाऱ्या रोमराजींमुळे शोभणाऱ्या राजराजेश्वरीच्या निरंतर सान्निध्यसुखाची आस बाळगणारे, हंसासारखी स्वच्छ पांढरी शुभ्र वेषभूषा असणारे, सर्वांतर्यामीं वास करणाऱ्या परमहंस परमेश्वराच्या चरणांची सेवा करणारे, घंटिकानादाच्या द्वारे ज्यांच्याकडे चारी वेदांची सेवा होत आहे, शरीराच्या निरनिराळ्या सशब्द आणि निःशब्द व्यापारांद्वारें सृष्टीला आधारभूत असलेल्या परमात्म्याचे ध्यान करणारे, शत्रूकडून होणाऱ्या हानीचे निवारण करणारे, दहा प्रकारची व्यवस्था असलेल्या दिव्य देहात वास करणारे ! ज्यांनी (व्याघ्र) नखे धारण केली आहेत, ज्यांना चंद्राचा वियोग सहन होत नाही, ज्यांच्या हातांच्या बोटांत- हिरव्या, लाल, पिवळ्या, श्यामल वर्णांच्या रत्नजडित आंगठ्या आहेत, नक्षत्रांची अवकृपा करणाऱ्या; देहभान हरपल्यामुळे त्यांच्या अनुभवाला येणाऱ्या अलंकृत रसाप्रमाणे (लाल रक्ताच्या सड्याने) त्यांचे पारिपत्य करणारे (संभाजी), प्रेमाचा वर्षाव करून आपली भावना व्यक्त करण्याचे व्रत घेतलेले, अनेकांशी एकाच वेळी युद्ध केलेले, द्वन्द्व युद्ध, लपंडावाचे युद्ध इत्यादी प्रकारांचा आश्रय करणारे, - लाडिक कोपाच्या द्वारें अपेक्षित फल देण्याचे कसब माहीत असणारे, अहमहमिकापूर्वक अभूतपूर्व पंचपल्लवांनी युक्त असणाऱ्या कल्पवृक्षांच्या उत्तुंग फांद्यांशी स्पर्धा करणाऱ्या देवतेच्या चरणकमलांचा ध्यास घेऊन, तिच्याशी तादात्म्य पावून, प्रत्यही तिची भक्ती करण्याची ज्यांची प्रवृत्ती आहे, पादुकापूजनामुळे प्राप्त झालेल्या हुंकारामुळे ज्यांनी नहुषराजाचा प्रभाव लपविला आहे, मोठ्या लाटांनी ज्यांच्या राज्यात समुद्राचे पाणी उफाळत आहे, पाहताक्षणीं प्रथमदर्शनींच हृदयात प्रवेश करणारे, आतापि आणि वातापि यांनी लावलेल्या वणव्यांमुळे विंध्याद्रीवर ओढवलेल्या आपत्तीमुळे क्रुद्ध झालेल्या लोपामुद्रेच्या पतीचा (अगस्त्य ऋषीचा) प्रभाव आणि त्यांच्या योगसामर्थ्याचे ज्ञानविज्ञान ज्यांना ज्ञात झाले आहे, भस्मयुक्त चर्या, ध्यान-स्तोत्रपठण, (रु)द्राक्ष धारण आणि डोक्यावर धारण केलेला केशसंभार यांच्या योगें ज्यांनी अर्धनारी-नटेश्वराचे रूप धारण केले आहे,

: (मूळ संस्कृत) :

तापत्रयहरण- नित्यपूजनसंभारित नवावरण-
भावभजनभंजित- चैतन्यावरण- दुर्दैवदाववपीडित-
पापसंघात-संघटित- प्रमोदघनघनावरण
निरतध्याननिर्धौत जन्मजरामरणभवोदधि- दुस्तरणोपाय-
निखिलनिगम स्मृति शास्त्र-पुराणसंमत-
संपादिततरितरणादरण- महाप्रलय कालाकलिताक्षरण...
योगिधन्ना(न्या)यमान -नामधेयजामदग्न्य- गोत्रालंकृत
कऱ्हाटक देशीय द्विजांतर्गत बाकरोपनामक- कुलालंकार
रामक्षेत्रमंडल कुंडलायमान कुडाल नगरोपाध्यायधौरेय
द्विजाग्रगण्यनाम नामदेव भट्टात्मज- आश्वलायन
सूत्रोपबृंहित ऋग्वेदांतर्गत शाकलशाखाध्यायि सकल
मांत्रिकवर्य महामहानुभावभावित-यमनियमासन
प्राणायामप्रत्याहर ध्यानधारणा- समाध्यष्टांगयोगानुष्ठान-
निष्ठाकनिष्ठीकृत- वसिष्ठादिशिष्ट महाशयस्वामिभ्य: ।

**

: **(मराठी अनुवाद)** :

केवळ विभूती प्रदान करण्याने ज्यांनी परमऐश्वर्य प्रदान केले आहे, प्रसिद्ध शुद्ध सहज भावामध्ये जे प्रत्यही मग्न आहेत, पद्मासन आणि कामकलास्तोत्र–पठण यांत जे रोज सहा प्रहर खर्च करीत आहेत, (मी) शंभुराजांनी केलेल्या प्रार्थनेला अनुसरून जिच्या भुवया वक्र झाल्या आहेत, जी सर्वत्र संचार करीत आहे, जिच्या नेत्रांतील लालीमुळे शत्रू भयभीत झाले आहेत, जगदंबेच्या पाशांनी बंधित अशा अंकुशांच्या ओढण्यामुळे त्रासलेल्या काही अनावर गर्वोन्नत 'महाराष्ट्र' जनांच्या वृत्तीमध्ये चमकणाऱ्या विजेप्रमाणे चंचल, ऐश्वर्यामुळे मदांध झालेले राजद्रोहाच्या प्रमादस्वरूपमदिरेने उन्मत्त झालेले दुष्टमंत्री यांचा सल्ला मानणारे, (आमच्या शंभुराजांच्या) छत्रधारणाला आणि सिंहासनावर बसण्याला अडथळा आणणारे, प्रचंड कोलाहल करणारे, अति क्रूर व भयंकर संग्रामाला प्रवृत्त झालेल्या, संभ्रमांनी भ्रांतचित्त झालेले गांवांत दहशत माजविणारे, समुद्रवलयांकित पृथ्वीतलावर प्रसिद्ध असलेले, गुरुपरिचर्या केल्यामुळे ज्यांचे अंत:करण शुद्ध झाले आहे, सर्व लोकांचे आधार, सगळे लोक ज्यांची स्तुती करतात, असे महापातकांचा क्षय करणारे, ईश्वराचे स्मरण करून, संसारतापत्रयाचे निवारण (हरण)करणारे, नित्य दैवतांचे पूजन पूजाअर्चा करणारे, भक्तांना आधार देणारे, भावभक्तीमुळे ज्यांनी चैतन्यावरील आवरण दूर केले आहे, दुर्दैवाच्या वणव्याने पीडलेल्यांच्या पापांचा परिहार करणारे, प्रमोदाचे पांघरूण भक्तांवर घालणारे, एकनिष्ठ ध्यानामुळे शुद्ध झालेले, जन्म, जरा, मरण, संसारसागर पार करणे यांसाठी उपाय सांगणारे वेद, स्मृती, शास्त्र,

...पुराण यांनी पुराणसंमत सांगितलेल्या मार्गाने जाऊन संसार तरून गेलेले, महाप्रलयाचे निवारण शोभणारे, असे योगी धन्यमान नामधारक जामदग्न्य गोत्राने अलंकृत असलेले कऱ्हाटसमदेशीय द्विजांपैकी 'बाकरे' आडनांवाचे कुलास अलंकारभूषण जसे रामक्षेत्र मंडळातील कुंडलांसमशोभित कुडाळ नगरातील उपाध्याय, धौरेयनामक तीर्थीच्या निवासी द्विजां(विद्वानांना) मध्ये अग्रगण्य नामदेव भट्टांचे चिरंजीव,

: (मराठी अनुवाद) :

आश्वलायनसूत्री, ऋग्वेद शाकलशाखाध्यायी, सर्व महामहानुभाव मांत्रिकांत श्रेष्ठ, सर्वांच्या आदराला पात्र अशा, यमनियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यानधारणा, समाधी या अष्टांग योगाच्या अनुष्ठानाने ज्यांनी वसिष्ठादी मुनींवर वरचढ केली आहे, अशा महाशय स्वामीला. (हे–दान, या दानपत्राने देण्यात आले आहे.) : (२७ ऑगस्ट १६८०)



**✻ बालराजे संभाजी : मोगलांचे मनसबदार :**

शिवाजी महाराजांनी शंभु राजांच्यासाठी मिर्झा राजासमोर व औरंगजेबाकडेही पत्राद्वारें, मोगली 'जहागीर' मागितली होती; पुरंदर गडाच्या तहाच्या वेळीं.

: मिर्झा राजे जयसिंहांस शिवाजी महाराज म्हणाले, ''इतर उमराव आणि राजे रजवाडे यांना मोगल दरबारात हजेरी लावावी लागते; ती आम्हांसाठी असू नये. आम्ही शंभू राजांना आमचे प्रतिनिधी म्हणून आपणांकडे पाठवू. त्यांच्या खर्चासाठी त्यांना पांच (?/चार) हजारी मनसब बादशाहीतून मिळावी. वेगळी जहागीरही द्यालच. मनसब न मिळाली तरीही फौज घेऊन ते नेहमी बादशहांची नोकरी करत राहणारच. ते दरबारात नियमित दख्खनच्या मोगल सुभेदाराकडे हजर राहतील.'' : (हे सर्व मान्य झाले.).

✻ ✻

**✻ ''... तोचि, 'खरा पुरुष' या संज्ञेला पात्र !'' : – (कालिदास कवी.)**

– ''नाम यस्याभिन्दति द्विषोऽपि स पुमान् पुमान् ।।''

= (''ज्याचे, जे नांव ऐकून वैरीसुद्धा माना डोलावतात, तोच 'पुरुष', 'पुरुष' या संज्ञेला पात्र आहे.)

* छत्रपती श्रीसंभाजी महाराजांच्या शब्दांत, (आत्मप्रकटनात्मक)
स्वत:चे राजव्यक्तिमत्त्व ! तथा निज ऐश्वर्याचे स्व-कृत वर्णन ! :

# : श्रीशंभुराज-स्तुत भोसले-वंशज :

## : छत्रपति श्रीसंभाजी महाराजांचे :

## संस्कृत दानपत्र-१. : प्रथमार्ध :

: (मूळ संस्कृत व मराठी अर्थ.) :

: देवतावंदन : **: (१) : शब्दानुवाद**

**।। नमस्तुंगशिरश्चुंबिचंद्रचामरचारवे ।।**

**।। त्रैलोक्यनगरारंभमूळस्तंभाय शंभवे ।। १ ।।**

: देवतावंदन : ।। श्री ।।

= ज्यांच्या उतुंग मस्तकावर चंद्र(कोर) चवरीप्रमाणे शोभायमान आहे. जे त्रैलोक्यरूपी नगर-रचनेचा भार तोलणारे आधारस्तंभ आहेत, अशा श्री शिवजींना मी (आम्ही छत्रपती संभाजी महाराज) नमन करतो. (१)

**।। ब्रह्मानंदंपरमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिम् ।।**

**।। द्वन्द्वातीतं गगनसदृशं तत्त्वमस्यादिलक्ष्यं ।। २ ।।**

= जे ब्रह्मानंदस्वरूप आहेत, परमसुखदायी आहेत, शुद्धस्वरूप आहेत, ज्ञानमूर्ति आहेत, (सुख-दु:ख च्या संबंधाने द्वंद्वतीत आहेत, आकाशाप्रमाणे निर्लेप व सर्वव्याप्त आहेत, उपनिषदातील 'तत्त्वमसि' (तत् त्वम् असि।) सारख्या महावाक्याने ज्यांचा परचय करून दिला जातो ;- (२)

**।। एकं नित्यं विमलंअचलं सर्वदा साक्षिभूतं ।।**

**।। भावातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि ।। ३ ।।**

= असे जे एकमेवाद्वितीय आहेत, अविनाशी (नित्य) आहेत, निर्मल आहेत, स्थायीरूप आहेत, सर्वांच्या बुद्धीचे साक्षी आहेत. अजन्मा आहेत, सत्त्व, रज आणि तम या तीनही गुणांच्या पार (पलीकडे/दूर) आहेत, अशा सद्गुरूंना मी (आम्ही छत्रपती संभाजी महाराज) नमन करतो. (३)

**: (शंभुराजमुद्रा) :**

**श्री'शंभो:**
**शिवजातस्य मुद्राद्यौरिव**
**राजते।। यदंक सेविनो लेखा**
**वर्तते कस्यनोपरि'**

= (''श्रीशिवराजांचे पुत्र शंभुराजे छत्रपती यांची, ही राजमुद्रा आकाशाप्रमाणे शोभत आहे. त्याच्या खाली असणारा लेख सर्वांच्या वर चंद्रकोरीप्रमाणे आहे.'')

*** छत्रपती श्रीसंभाजी महाराजांचे - : (भावानुवाद) -**

*** दानपत्र : १ : (प्रथमार्ध) : प्रा. डॉ. व्यंकटेश विश्वनाथ द्रवीड,**
**कोल्हापूर, एम.ए.,पीएच.डी.**
**: (संस्कृत-हिंदी-पाली-मराठीचे ज्ञाता.)**
**(ज. २३-७-१९२६)**

**: (२) : (भावानुवाद) :**

१ : ज्यांच्या उत्तुंग मस्तकावरील चंद्र चवरीप्रमाणे शोभत आहे, त्या त्रैलोक्यरूपी नगर-रचनेतील आधार-स्तंभच असलेल्या श्रीशंकरांस नमस्कार असो.

– ब्रह्मानंदरूप असणाऱ्या, अत्यंत सुख देणाऱ्या, शुद्धस्वरूप, ज्ञानमूर्ती, सुख आणि दु:ख यांच्याही पलीकडे गेलेल्या,–

: आकाशाप्रमाणे (निर्लेप आणि सर्वव्यापी) असलेल्या; (उपनिषदांतील)–

: 'तत् त्वम् असि' (= ते तत्त्व तूच आहेस !), याच्या जशा महावाक्यांनी ज्यांची ओळख करून दिली जाते, – अशा, एकमेव अद्वितीय, अविनाशी, निर्मळ, स्थिररूप, सर्वांच्या बुद्धीला साक्षी असणाऱ्या, ज्याला जन्मच नाही अशा, सत्त्व, रज आणि तम या त्रिगुणांच्या (तीन गुणांच्या) पलीकडे असणाऱ्या (म्हणजे, या गुणांची बाधा ज्याला होत नाही अशा) त्या सद्गुरूंना मी वंदन करीत आहे.

**: श्रीशंभुराज-मुद्रा :**

**''शंभो: शिवजातस्य मुद्रा द्यौरिव राजते ।**
**यदंक सेविनो लेखा वर्तते कस्य नोपरि ।।''**

= श्रीशिवाजी महाराजांचे पुत्र श्रीशंभुराजे यांची 'राजमुद्रा' आकाशाप्रमाणे शोभून दिसत आहे. तिच्याखाली असणारा लेख सर्वांच्यावर चंद्राच्या कलेप्रमाणे, चंद्राच्या कोरीजसा आहे.

: (भावानुवाद) :

**(१) 'नमस्तुंगशिरश्चुंबिचन्द्र....।'** – हा श्लोक विजयनगर (हम्पी) सम्राटांच्या दानपत्रांवर येत असे. त्यानंतर १५० वर्षांनीही छ. संभाजींच्या या दानपत्रातही तो आलेला आहे; हा हिंदवी स्वराज्याचा अनुबंध आहे.

– या दानपत्राच्या प्रारंभास छ. संभाजी महाराजांची 'राजमुद्रा' आहे. :–

**।। श्री शंभो शिवजातस्य ....।।** – छ. संभाजी महाराजांच्या हस्ताक्षरातील मजकूर दिलेला आहे; तो पुढीलप्रमाणे आहे. :–

**।। मतं मे शिवराज–पुत्रस्य श्रीशंभुराज ।।**

**।। छत्रपतेः यदत्रोपरिलेखितं ।। छ ।। श्री ।।** **(१)** =

श्रीशिवरायांचे पुत्र श्रीशंभुराजे छत्रपती यांची, यापुढे लिहिलेल्या मजकुरास माझी सम्मती, मान्यता आहे.

कल्याण असो ! शोभिवंत, रत्नजडित, अतिशय मौल्यवान, माणिकांच्या रत्नांनी सुशोभित केलेल्या, सोन्याच्या पायांनी शोभायमान झालेल्या, सोन्याच्या साखळ्यांनी अलंकृत केलेल्या,

पाचू व हिरे यांच्या तेजोकिणांनी जणू ओवाळलेल्या, पाचू व जरीच्या पताकांचे आच्छादन वरती असलेल्या अशा राज–सिंहासनावर (संभाजी) महाराज विराजमान झाले होते. त्यांच्यापुढे (समोर) देवसमूह (नृपति–गण), व पुढील भागात संगीत शास्त्रानुसार गायन करणाऱ्या गंधर्व, सिद्ध, किन्नर, साध्य, अप्सरा यांच्या कंठमाधुर्यामुळे विविध रागदारींत गाइलेल्या गायनाने व तालबद्ध संगीताने मन आकर्षित केले जात होते.

: अनेक प्रकारची (पाणी पिण्याची) सोन्याची भांडी तेथे ठेविली होती.
अनेक सुवर्ण–अलंकारांनी नटलेल्या राजसमूहामध्ये, (शंभू राजे) अमृत–सागरात शोभायमान असणाऱ्या त्रैलोक्याधिपती श्रीविष्णूप्रमाणे शोभत होते.

: श्रेष्ठ कवींनी ज्यांचे गुणकीर्तिपराक्रमगौरवाचे गान, आपल्या काव्याचा विषय म्हणून गावे असे ते (अद्वितीय) राजे होते.

: (भावानुवाद) :

२) : राज–प्रासादाच्या सभोवतालच्या उद्यानांमध्ये, दररोज बकुळ, कोरांटी, अशोक, चाफा, कुडा, कमळ, नागचाफा, नागकेशर, बटमोगरा, केवडा, जाई यांच्या लता–वेली फुलत असत.

तसेच,– वेलदोडे, तमाल–पत्र, ताड, नारळ, सुपारी, डाळिंब, जांभूळ, लिंब, सफरचंद वगैरेंच्या फळझाडांनी बाग बहरलेली होती. तेथे पारिजातकाची राई (राजी, वृंद, समूह) होती; केळींचे ताटवे शोभत होते. माधवीलतेशी मीलन झालेल्या व मोहोरून शोभिवंत दिसणाऱ्या आम्रवृक्षाच्या सुमधुर मादक मोहोराचा आस्वाद घेऊन गंधधुंद बनलेल्या कोकिळ वृंदांच्या ध्वनिमधुर गायनाने, मीलन झालेल्या (मानवी) युगुलांना आनंद होत होता. तर वियोग झालेल्या मानिनी प्रमदांचा गर्व नाहीसा होत होता. सर्व दुष्ट वासनांची बीजे नष्ट होत होती.

३) वाणी आणि मन यांना नांवे माहीत नसलेल्या फुलां–फुलांवर फिरत राहून उत्कृष्ट मध मिळविणारे, व द्राक्षामंडपांमध्ये फिरणारे जे भ्रमर (मधुप, भुंगे), त्यांच्या गुंजारवाने उद्यान दुमदुमून जात असे. या उद्यानांपुढे चंदन इत्यादींच्या बागा, स्वर्गातील इंद्राचे नंदनवन (नांवाचे) उद्यान, कुबेराचे चैत्ररथ नामक उद्यान ही सर्व, फिकी वाटत होती.

पोपट, मैना यांचे मधुर ध्वनी, बगळ्यांच्या थव्यांचे कलकलाट, यांच्यामुळे पळून जाणाऱ्या मोठमोठ्या पातकी (चोर वगैरे) लोकांना जणू आश्वासन देऊन त्यांचे रक्षण करणाऱ्या (म्हणजे, त्यांना लपून राहण्यास योग्य अशा जागा उपलब्ध असलेल्या) मोठमोठ्या अनेक बागांनी तो परिसर मनोहर दिसत असे.

पृथ्वीवरील सात द्वीपे (बेटे) यांपैकी एका द्वीपावर असलेल्या या राजवाड्यास समुद्रातून बाहेर काढलेली तेजस्वी (देदीप्यमान) रत्ने जडवलेली होती. त्याच्या सभोवती खंदक होते.

४) सभोवार आश्रयस्थाने होती. (दैवतांची मंदिरे/ ?). संसारात धावाधाव करून दमलेल्या (थकल्या–भागलेल्या) भक्तजनांनी त्या आश्रयस्थानांचा

: (भावानुवाद) :

आधार घेतल्यामुळे शांत मने झालेल्या संयमी अशा भक्तजनांचे मृत्यूविषयीचे भय नाहीसे झाले होते.

राजवाड्यांतील छतांना मौल्यवान मोत्यांच्या माळा लावलेल्या होत्या. देवांच्या वाहनांवर शोभून दिसावेत, अशा शोभिवंत चौथऱ्यांवर मुलायम गालीचे अंथरलेले होते; तिथे सुगंधित धूप आणि इतर सुगंधी द्रव्यांचा दरवळ (घमघमाट) सुटला होता.

सोन्याच्या तटबंदीच्या आतील बाजूस जगातील जणू सर्व देवता विराजमान झाल्या होत्या.

तेथील दारांमध्ये स्वागतशील परिचारिका हात जोडून उभ्या होत्या. त्या केवळ बोटांच्या इशाऱ्यांनीच बोलत असत.

तेथील मंदिरात विष्णू, ब्रह्मा वगैरे श्रेष्ठ देवाधिदेव विराजमान झालेले होते.

(५) सुंदर रत्नखचित मंदिराच्या आतील बाजूस (मातीच्या) भांड्यांत उगविण्यात आलेले, जवाची शेती, धान्यांचे अंकुर शोभत होते, आदि ब्रम्हा दैवताच्या मंदिराच्या सभोवार इतर दैवतांचीही मंदिरे होती.

तेथील महालांमध्ये, फुलांतील परागांनी सुगंधित झालेल्या बिछायती आणि उशा, तसेच हंसांच्या मृदुल, मुलायम पिसांनी भरलेल्या स्पर्श रेशमी गाद्या अंथरलेले पलंगही शोभत होते.

तेथील स्त्रिया रतीप्रमाणे सुंदर होत्या. आपल्या मधुमधाळ मार्दवी सुस्पंदसुमंदस्मितांनी, किंचित अलगद उमलून आलेल्या लाल कमळ फुलांच्या सौंदर्यालाही त्यांनी नित्यचि मागे टाकले होते.

मुळातच कुंतलकाळ्याविभोर असलेल्या त्यांच्या नेत्रद्वयापुढे नीलकमळेही क्षुल्लक वाटत असत.

त्यांच्या दंतपंक्ती डाळिंबाच्या लसलसित लालस अंतरंगाहूनही रसरशीत वाटत असत.

त्यांनी नेसलेली लालस वस्त्रप्रावरणे व सुतंगकंचुकींचा उभार यांतून बाहेर पडणाऱ्या लालीपुढे, अशा रक्तिमवर्णाच्या माणिक्य वगैरे रत्नांची नितळ लालीही फिकट वाटे.

: **(भावानुवाद) :**

मोती, हिरे, इंद्रनील यांचे हार गळ्यात घातल्यामुळे, गंगा–यमुना सरितांच्या पाण्याच्या लाटा एकत्र मिसळत असल्याजसे (सारखे) दृश्य दिसायचे.

(६) त्यांमध्ये शोभायमान असलेल्या अंगकांतीचे लावण्यवैभव चिरंतयौवना सरस्वती सदृश कमनीय दिसते.

**अंकासीन रमणींचे वर्णन –**

काम–कांक्षी जनांनी आरंभिलेल्या, मुखचंद्र आल्हादकारी अमृत–रसपानसमयीं सांडणाऱ्या अमृतबिंदूप्रमाणे (त्या लावण्यकामिनींच्या) नासिकापुटाग्रीं विराजित मोतीच शोभत होते.

पहाट (प्रभात)कालीन लाल रंगाने रंगलेल्या मेघांच्या दाटीवाटीतून बाहेर पडत असलेल्या सूर्य–बिंब (मंडल)– किरणांप्रमाणे शोभिवंत लाल वस्त्रे त्यांनी परिधान केली होती.

(७) आपापल्या मस्तकमध्यभागीं पद्मराग (रंगमयी), रत्नांची बिंदी त्यांनी घातली होती. त्या स्त्रिया म्हणजे जणू, उसळत्या राजतारुण्याच्या तपाचे फळच वाटत असे.

उरोज–उभार बहराच्या अतीव भाराने कृश कमर कदाचित (!) पिचायचीही अशा भीतीने ब्रह्मदेवाने त्यांच्या कटिबंधप्रांतीं उत्पन्न केलेली तीन वलये (भिवली) सुशोभित होती.

शृंगाररूपी बीजाच्या अंकुरांवरती टप्पोरल्या कळ्यांसम भासमान असणाऱ्या आपल्या रोम–राजींनी त्या शोभिवंत दिसत होत्या.

राजराणीवशातील सान्निध्य–सौख्य–लाभास्तव हंसांनी जणू अलंकार आभूषणांची, दागदागिन्यांची सर्वविध रूपे धारण केली होती.

हंस आणि परमहंस (संन्यासी) ज्याप्रमाणे सर्वांच्या हृदयात असलेल्या भगवंताच्या चरणांची उपासना करतात; त्याप्रमाणे, पैंजणांच्या रूपाने चारी वेद त्या राजस्त्रियांच्या चरणांची सेवा करीत होते.

– ते कधी आवाज करून (नाद–निनाद उठवून), तर कधी शांत राहून.

स्वत:चा आधार असलेल्या शंकराचे सतत ध्यानचिंतन केल्याने, जो दर

: (भावानुवाद) :

पंधरवड्यात क्षीण होतो, खंगत जातो, तो चंद्र (या कामिनींच्या) नखांच्या रूपाने (दहा बोटांच्या रूपांत) दहा प्रकारांनी दृष्टीस पडत होता. या चंद्राचा वियोग सहन न झाल्याने नक्षत्रे जणू, हिरव्या, निळ्या, पिवळ्या रंगांच्या रत्नांच्या (अंगठ्यांच्या) रूपाने विराजत होती. केवळ रंगाच्या रूपात शिल्लक राहिलेली मेंदी देहभान विसरून, लाल रंगामुळे जणू पति–प्रेमाचा पूरच व्यक्त करीत होती.

(८) श्रीशंकराची चरण–कमले म्हणजे, प्रत्यक्ष कल्पवृक्षाची पालवीच. (भक्ताने) इच्छिलेले फळ देण्याची जणू स्पर्धाच या दोन्ही चरणांत (पायांमध्ये) लागली होती.

रात्रंदिवस मोठ्या भक्तीने या चरणांचे ध्यान व पूजन केल्यामुळे अगस्तीला एवढे मोठे सामर्थ्य प्राप्त झाले होते, की–

त्याने एका हुंकाराबरोबर नहुष सम्राटाचे 'इंद्रपद' नष्ट करून टाकले.

– महासागराची चूळ त्या अगस्तीने भरल्यामुळे, त्याच्या पोटात 'आतापी' व 'वातापी' या राक्षसांना त्याने नाहीसे केले.

– त्याच अगस्तीने विंध्यपर्वताचेही गर्वहरण श्रीशंकराच्या चरणभक्तीमुळेच केले.

– हा सगळा प्रभाव अगस्तीला ज्याच्या कृपेने प्राप्त झाला, त्या श्रीशंकराला योग–मार्गाद्वारा जगताचे पूर्ण ज्ञान प्राप्त झाले होते. त्याने अंगाला भस्म लावले होते.

– ध्यानमग्न अशा त्या श्रीशंकराने रुद्राक्षमाळा धारण केली होती. त्याच्या मस्तकावर जटा होत्या.

(९) अर्धनारीनटेश्वराच्या रूपात तो प्रकट झाला होता.

केवळ पवित्र भस्म देऊन त्याने (भक्तांना) मोठे ऐश्वर्य प्राप्त करून दिले होते.

– शुद्ध आणि अकृत्रिम भाव धारण करून, पद्मासन घालून, देवीचे स्तोत्र म्हणण्यात ज्यांनी सहा प्रहर घालविले आहेत; –

**: (भावानुवाद) :**

: अशा शंभुराजांच्या प्रार्थनेने अर्धनारी–नटेश्वराच्या रूपातील जगदंबा प्रकट झाली होती.

: भुवया वक्र करून, आरक्त (लालेलाल) नेत्र गरगरा फिरवून तिने (जगदंबेने शत्रूंचा) नायनाट केला होता; पाशबंधांनी त्यांना बांधून टाकले होते;

अंकुशाने तिने त्यांना भयभीत केले होते.

– अशांपैकी काही, महाराष्ट्रातील विविध स्वभावांचे,

विजेप्रमाणे चंचल असलेल्या धनसंपदावैभव लक्ष्मीमुळे मदांध झालेले,

: व, कामात हयगय/राजद्रोहस्वरूप प्रमाद हीच कोणी मदिरा; ती पिऊन उन्मत्त झालेले जे दुष्ट मंत्री, त्या दुर्मदधारी मंत्र्यांच्या सल्ल्यामुळे (कानभरणीने) संभाजी राजांच्या छत्रधारण आणि राजसिंहासनारोहण यांत विघ्ने, अडथळा आणणारा प्रचंड हलकल्लोळ माजला होता.

: तो शमवून शांत (नष्ट) करण्यासाठी (शंभू) राजांनी अतिशय कर्तव्यकठोर राजनीतीला अनुसरून आचरण करून;–

: अतिशय क्रूरपणे केल्या जाणाऱ्या व अवघड अशा लढाईचा उद्योग उखडून टाकून, समुद्रवलयांकित पृथ्वी आंदोळविली व दिगंतकीर्ती मिळविली.

: गुरु–सेवेने (शंभु) राजांचे अंत:करण शुद्ध झाले आहे.

: त्यांना शरण आलेले सर्वजण त्यांची (शंभू राजांची) स्तुती करीत होते.

: प्रबल पाप नाहीसे करणाऱ्या भगवंताचे सतत स्मरण केल्याने त्यांचे (शंभू राजांचे) – आधिभौतिक, आधिदैविक आणि–

आध्यात्मिक कष्ट दूर झाले आहेत.

: नित्य पूजन व भजन करून त्यांनी (शंभू राजांनी) आपले जीवन पावित्र्याने भरून व भारून टाकले आहे. तशातच–

: दुर्दैवरूपी वणव्याने त्यांच्या (शंभू राजांच्या) आनंदावर विरजण पडले असले तरी, सतत ध्यान, धारणा यांच्या योगाने त्यांनी (शंभू राजांनी) आपल्या– जरा व मरण यांवर(ही), मात केली आहे.

: दुर्गम असा हा भवसागर पार करण्याचा उपाय सांगणाऱ्या वेद–स्मृती इत्यादी ग्रंथांनी उपदेशिलेले उपाय करून त्यांनी (शंभू राजांनी) काळावरही

मात केली आहे.

: कोकण भूमीला व तिच्या निसर्गाला 'अलंकार' स्वरूप शोभणाऱ्या कुडाळ या नगरातील, पुरोहितांमध्ये श्रेष्ठ.

*** 'सिंहासनारोहण' : (तिथी) : संभाजी राजे :**

: (सूर्यवंश/ उत्तरार्ध, पृ. ९, श्लो. ६५ वा, परमानंद कवीन्द्र.):

**–''राजन्नेत्र नभोङ्ग भूमिभरिते रौद्राष्टष्टे रौद्रके**
**माघे मासि सिते 'रथोत्सव'–दिने मुख्ये मुहूर्तेशुभे ।**
**शंभुर्भूमिपतिस्त्रिवर्षसमये सिंहासने भ्राजने**
**संशोभच्छिवयोरभीति सुकरछत्रप्रभाभास्वरे ।।'' ६५ ।।**

– (''नेत्र (=डोळा) = २/नभ (=आकाश) = ०/ अंग (=षडंग) = ६/ भूमि (=पृथ्वी) = १; – हे अंक, उजवीकडून डावीकडे वाचून '१ ६ ० २' ही शालिवाहन शकाची संख्या मिळते. त्यावर्षीं रौद्र नामक संवत्सर–वर्ष होते. माघ शुक्ल सप्तमी (७ मी), 'रथोत्सवदिन' (सूर्य दैवताची रथसप्तमी तिथी), मुख्य शुभ मुहूर्त, त्रिवर्ष समयीं शिवराय–पुत्र संभाजी राजे सिंहासनारूढ झाले. त्यांचा 'राजाभिषेक' समारंभ साजरा झाला; आणि त्यांनी सूर्यप्रभेजसे श्वेत तेजस्वी राजछत्र धारण केले.'')

('रथोत्सवदिन' – आश्विन शु. २ किंवा, शु. ४) (?)

* *

* **शिवदिग्विजय–बखरीत ४ ओळी काव्यात छ. संभाजी महाराजांचा जन्म–शक कोणत्या रीतीने व कोणता दिला आहे, याचा विचार –**

संस्कृत काव्य–परंपरेत पुष्कळ काव्यांमध्ये शकाच्या अंकांचा उल्लेख संख्यावाचक शब्दांत सरळ सरळ न देतां संकेताने देण्याची परंपरा आहे. अर्थात यासंबंधी कवींवर तसे बंधन असतेच असे नाही. मर्जी वाटल्यास किंवा इतर काही कारण नसेल तर कवी स्पष्ट अंकांत शकाचा उल्लेख करतो. उदा. कवींद्र परमानंद हे शिवसमकालीन कवी 'सूर्यवंशम्' या संस्कृत शिवचरित्र महाकाव्यात (त्यालाच स. १९२७ मध्ये, संपा. स. म. दिवेकर यांनी स्वतःच 'शिवभारत' हे नांव दिले. व ती चूक पुढे कोणीही दुरुस्त केली नाही. 'Wrongly called by modern Maharashtrians as the 'शिवभारत'–'' : इति – प्रो. डॉ. सर जदुनाथ सरकार/'Shivaji and his Times' : (p. 312/Edn. 6th/1961 A.D.), अफजलखानाच्या वधाचा शक, संवत्सर, तिथी, वार, वेळ इ. तपशील स्पष्ट, सरळ व सुबोध शब्दांतच देतात, पुढील श्लोकात –

८१ – १५ –(पंधरावर एक्क्याऐंशी) :

– **''एकाशीत्यधिकैः पंचदशभिः सम्मितैः शतैः। : (शके १५८१)**
**शालिवाहे शके, संवत्सरे चैव विकारिणि। (२१–८३)**
**मासि मार्गे, सितेपक्षे, सप्तम्यां, गुरुवासरे।**
**मध्याह्ने, दैवतद्वेषी, शिवेनाफजलो हतः॥'' (२१–८४)**

= (शके १५८१ मध्ये, विकारीनाम संवत्सरीं, मार्गशीर्ष महिन्यात, शुक्लपक्षात, सप्तमी या तिथीस, गुरुवारीं भरदुपारीं (मध्याह्नीं) दैवतद्वेष्टा अफजलखान यास शिवरायांनी ठार केले.)

याउलट याच कवींद्रांनी सूर्यवंशम् या ग्रंथातच छत्रपती श्रीशिवाजी महाराज यांच्या जन्मतिथीच्या श्लोकांत (६–२६ ते ३१), 'सम्मिते' (म्हणजे शक–अंकांची सम= (दोन) वेळा केलेली बेरीज सम येते.) आणि 'व्यंजिता (व्यंजना–काव्यशैलीने, सूचकतेने, / Suggestion / indication), श्लेषार्थक अशी, जी तिथी वर्णिली आहे; ती दोन गूढार्थसूचक शब्द योजून; ही शिवजन्मतिथी व शक–निर्देशन इत्यादी, सांकेतिक भाषेत वर्णिले आहे.

* *

## दानपत्र : १ : द्वितीयार्ध :

### (भोसले–वंशज–माहात्म्य) :

### (१. श्रीमालोजी, २. श्रीशाहाजी, ३. श्रीशिवाजी, ४. श्रीसंभाजी महाराज.)

: (मूळ संस्कृत) :

(१) (श्रीमालोजी राजे माहात्म्य):

।। शिखर–स्वामि शंभु माहादेवयात्रा समागम– समागत– समस्त– दिग्देशवास्तव्य – जनसमारचित कर्णारुंतुदसलिलकोलाहल वर्णनानुकर्णन संयात– शिवभक्तिभावविकार मन:कल्पित तोयौघ– तरलिततटाकप्रकार समुझ्झित स्वायव्यय प्राय– विचार हरिश्चंद्र रंतिदेवानुसार संकल्पित संसर्वस्वागार मांधातृसदृश– महोदार प्रथमांत–धनप्रदानकृतनिर्माण प्रारंभनिर्धार विहितैकोत्तर– शतसंख्याक कुलप्रतिष्ठापूर्वक पूर्वपूर्वज समुध्धारपरीक्षानिमित्त कैलासवासि– परित्याजित– पूर्वसेवनोद्योग व्यापारभावभजितभव– निजामद्वारपरिगृहीत संपूर्ण सांसारिक समाचार दृढतर सरोबंधन छद्म स्वछंद प्राक्कर्मानुबंधनिर्बंध समसम्यगाबध्ध– वेद, शास्त्र, पुराण स्मृत्यागमानुमिति– सिद्धान्तसिद्धांतितभावि पृथ्वीचक्रशक्राय– मानांकुरित शाश्वतवैभव संभरितहेषकर्षित तोयदगर्जनागर्जित संतर्जित दारिद्र्यप्रचार हयहस्त्यादिसंभार, सिंहावलोकानुकार विरचित चित्तविचारोत्साहप्रेषित प्रतिवार्षिक द्रव्यसंस्कारसमारचित– पुष्करपूरोचित पुण्यपुष्कराशयविस्तार सदाशिवस्वरूप सदाशिवभावना भावितांत:करण–

**: (मराठी अनुवाद) :**

– शिखर शिंगणापूर महादेवाच्या यात्राप्रसंगीं आलेल्या, सर्व दिशांमध्ये ठायीं ठायीं सगळीकडे वास्तव्य करणाऱ्या जनतेचे पाण्यावांचून होणाऱ्या हालअपेष्टांचे वर्णन ऐकून, शिवभक्तीने प्रेरित होऊन स्वत:च्या खर्चाने तलाव बांधण्याचा संकल्प; हरिश्चंद्र, रंतिदेव या पूर्वजांच्या प्रमाणेच स्वत:ही केला, आणि मांधातांसारख्या उदार राजांचे अनुकरण करण्याचे ठरवून, कामाला आरंभ करण्याचा निश्चय करून आपल्या कुळातील एकशे एक पूर्वजांचा उद्धार करण्याच्या त्यांच्या या निश्चयाची परीक्षा घेण्याच्या उद्देशाने (श्रीशंकरांनी) कैलासवास सोडून भूलोकीं आगमन केले.

– निजामाच्या दरबाराची संपूर्ण जबाबदारी स्वीकारून आणि दृढसंबंध ठेवून योग्य ते राजकारण करणारे, जुन्या घडामोडींचे अनुसंधान ठेवून पूर्वीच्या सेवेतील कष्टातून मिळालेल्या अनुभवांचा आपल्या कामात उपयोग करून घेणारे वेद, शास्त्र, पुराण, स्मृतींच्या आगम, अनुमतीच्या सिद्धांतानुसार निर्माण झालेल्या या पृथ्वीवर इंद्राप्रमाणे राज्य करणारे, विपुल आणि शाश्वत वैभवाने संपन्न असणारे, (समृद्ध अश्वशाळेतील) अश्वांच्या खिंकाळण्याने उत्साहित होणारे, हत्ती आणि घोडे यांच्या गर्जनेने मेघगर्जनेसही मागे टाकणारे, सिंहाप्रमाणे दक्षपणे अवलोकन करणारे, मनात आलेल्या विचारांप्रमाणे आचार करण्यात उत्साहपूर्वक तत्परता दाखविणारे, तलाव बांधून, प्रतिवर्षी द्रव्य खर्च करून पुण्य-संकलन करणारे, सदाशिवस्वरूप श्री मालोजी राजे यांचे अंत:करण श्री शंभू महादेवाबद्दलच्या पूज्यभावनेने भरून गेले. त्या करुणामय श्रीशंभू महादेवांनी कृपावंत होऊन ज्यांच्या वंशात स्वत: वंशावतार धारण केला आहे, त्यांच्या अनुग्रहाने जे भवसागर तरून गेले, असे चतुर, अग्रणी, सारासार विवेकशील, देव-चराचर-सृष्टिप्रतिपालक, अशी ज्यांची महानता अखिल पृथ्वीतलावर प्रसिद्ध आहे, अशा श्री मालोजी राजांचे (महीपालांचे) (छत्रपती संभाजी महाराज) हे पणतू होत.

(श्री मालोजीराजे भोसले यांच्यानंतर त्यांचे पुत्र) श्रीशाहाजी महाराज यांनी प्रबळ अशा निजामशहाच्या राज्यात एक प्रधानपद मिळविले. केवळ एक रात्र युद्ध करून ज्यांनी सर्वत्र हाहाकार उडवून दिला, आपल्या अद्वितीय अशा धनुर्विद्येच्या जोरावर शत्रूच्या प्रचंडतर विपुल सैन्याला बंदिवान केले, दिल्लीपती

: (मूळ संस्कृत) :

सकरुणीकृत गिरीशप्रसादावलोकन
स्ववंशांशावतार ग्रहणानुग्रह-संतरित- दुस्तारसंसारप्रस्तार-
सारासारविचारसंचार, चतुर, शूराग्रगण्य,
देवब्राह्मणप्रतिपालक महीतलप्रख्यात महत् च
मालोजिमहीपाल प्रपौत्रेण (शंभुनृपेण) -

२. (श्रीशाहाजी महाराज) :

- ''प्रबळनिजामनृप छत्रपतिराज्यैक प्रधानीभूतैक रात्रियुद्ध
हाहाभूतीकृतातिकोदंड- कलाकलन प्रचंडतरबहळारातिवर्ग-
बंदीकृत- दिल्लींद्रवीरवृंद- महामाहात्म्यमूढ-
मलिकाख्यासुर-निदेश समस्तदेवालयरक्षणक्षण तृणीकृत-
निर्ध्वंससमयसमागत जीवसंरक्षण- क्षात्रधुरंधरोचित
पराक्रमाचरण- निर्वार्यनिर्बंधधारणौद्धत्य निवारिता-
खिलामार्यधरांतर्गतागणित गीर्वाणगणस्थापन प्रसन्नीकृत-
पार्वतीपति प्रणयप्रसादैकस्थान मज्जित-निजाम-
क्ष्मापालकालाव्य वहितोत्तरकाल-समायात दुष्काळप्रचुरितचक्र
हाहाकार-कालव्याल ग्रसिताबालप्रजाजाल काल-
तत्कालगृहीत करालकरवाला- कालकालीन काल
बहलोकांतरा लोल्लसल्लसत्तडि- न्मालमंडलितमंडल
मंडलीकुंडलनाकुलीकृत ताम्र तुरुष्क संकालन संकलित
निष्कलंकि कल्क्यवतारलीलोल्लास भरभरितांत:करण- पूर्वक
तद्वंश्य विशिष्टाख्यान ख्यापन- छत्रधारण दुर्गम महावली
दुर्गग्रहणकारणोद्भटत्तर रणोत्साहोत्साधक- रणदुर्वार
वैरिभटोत्कटोत्सारण स्थापितस्वामिधर्माभिमान हतभाग्योद्योग
विज्ञात विजातीय विक्रमाविर्भाव - संभ्रमितैदिल्लदत्तैश्वर्य
समुदाय-देदीप्यमान हैंदवधर्म जीर्णोद्धारण करणधृतमति
समृद्धताद्भुतधृति- धारणनिर्धारितम्लेच्छ

: **(मराठी अनुवाद) :**

शहाजहानकडून आलेल्या मलिक अंबर नांवाच्या वीरश्रेष्ठ यवन असुराच्या आज्ञेने मंदिरे उद्ध्वस्त करण्यासाठी आलेल्या सैनिकांचा ज्यांनी आपले प्राण तृणवत मानून शर्थीने क्षात्रधुरंधराला साजेसा पराक्रम करून संपूर्ण नाश केला. आणि देवालयांचे रक्षण केले, शत्रूंनी घातलेल्या अटींमधील उद्दामपणा ज्यांनी धुडकावून लावला - आर्यभूमीवरील सर्व म्लेच्छांना धराशायी केले, विद्वज्जनांसाठी आश्रयस्थाने स्थापून पार्वतीपती श्रीशंकरास ज्यांनी भक्तिपूर्वक प्रसन्न करून घेतले, त्यांचा कृपाप्रसाद संपादन केला, त्यानंतर लगेचच (१६२९-३०) आलेल्या दुष्काळ आणि (मोंगल व आदिलशहा) परचक्राने प्रजा संत्रस्त झाले तेव्हा त्यांनी आकाशात तळपणाऱ्या विजेप्रमाणे लखलखती तेजस्वी तलवार हाती धरून ताम्र व तुर्क यांना ज्यांनी जर्जर जर्जर करून सोडले, व कलंकी (कलकी) या अवताराचे कार्यरूप प्रकट कृतीने दाखवून दिले, आपल्या वंशाचे वैशिष्ट्य सांगणारे छत्र धारण केले, दुर्गम अशा माहुली गडाला शत्रूचा वेढा पडला असता प्रचंड उत्साहानी ज्यांनी शत्रूसैन्याचा नि:पात करून (स्वामी) 'राज' धर्माचे पालन करण्यासाठी बांका प्रसंग ओळखून ज्यांनी योग्य पावले टाकून स्वपराक्रमाचे प्रदर्शन केले. दुर्दैवाने त्यांच्या पराक्रमाचा त्यांच्या शत्रूला (निजामशहाला?) अंदाज न आल्यामुळे संभ्रमित झालेल्या आदिलशहाने दिलेल्या विपुल ऐश्वर्यामुळे ते शाहाजीराजे शोभून दिसू लागले. गोंधळलेल्या आदिलशाहाने दिलेल्या ऐश्वर्यामुळे जे शोभू लागले, ज्यांनी हिंदू (हैंदव) धर्माचा जीर्णोद्धार केला, ज्यांचा धाडसी पराक्रम म्लेच्छांच्या विनाशास कारणीभूत ठरला, ज्यांना राज्याच्या सीमा सांभाळण्यासाठी अनेक मांडलिकांनी सहकार्य दिले, इतर काही प्रमुख राजांनी त्यांचे अनुकरण केले, अशा (शाहाजी राजांच्या) ज्यांच्या सैन्यातील अतिशय चपळ घोड्यांच्या अगदी सहज चालण्याने धुरळा उडत असे, भेरी, नगारे (इ. रणवाद्ये) वाजत असत, हत्तींच्या गळ्यातील घंटांचा ध्वनी दुमदुमत राहत असे, मागोमाग वीर सैनिकांच्या गर्जनांचा घोष ऐकू येत असे, सेनादलाबरोबर तोफ उडविणारे गोलंदाज असत पायदळाचा आरडाओरडा, क्रोधाने लाल झालेले डोळे इत्यादी प्रकारांसह कनकगिरीवर केलेल्या चालीमध्ये ज्यांचे शौर्य आणि औदार्य, गांभीर्य, धैर्य आदि व्यक्त झाले अशा त्या, याचकांच्या कामना परिपूर्ण करणाऱ्या, परोपकार करण्याच्या नित्यपरिपाठामुळे 'महाराज' हे

: (**मूळ संस्कृत**) :

क्षयनिदानकालोचित सेतुराज्यस्वीकारा **दृतानेक**- सामंतानुसृतनरपति- प्रधानलीलोल्लसद **तिचटुल**- तुरगावलीटापोल्लेख विसर्पत्क्षिति- रजोछलत्**क्षोदक्षोभभेरी** भांकृतिसं**क्षोभ गजघटाघंटारव - गर्जन** - वीरानुसर्जन तर्जनत्वरितप्रयोग- प्रवीणप्रयुक्ताग्नियंत्र दुर्दिनक्रम- पदातिप्रयुक्त कोलाहलक्रम- कोपारुणितनेत्र संज्ञासंसाधित- कनकगिरिप्रस्थान **शौर्यौदार्य गांभीर्य**- धैर्याद्यगणितगुणगण ग्रामाभिराम- पूरितयाचककामकृत **परार्थ-व्यायामप्राप्त महाराजनाम श्रीमन्नृपशाहपौत्रेण (शंभु नृपेण)।**

**(३) (श्रीशिवराय-माहात्म्य) ! :**

'' **(महाराजनाम श्रीमन्नृपशाहपौत्रेण)** बालक्रीडनव्याज **निर्व्याज** निजनिग्रहागत- जंभदंभसंरंभभरित- **प्रबलाफजल्लकक्षस्थ लोह्यलन**- बिछूछालनोछलित- रुधिरप्रवाहोपलिप्त देहोद्भासित-**प्रकट** नृसिंहस्वरूपावलेप सिंहानुसारि- कृतातिविकृतसिंह **दुर्गोछाल- पंचसप्तति (७५,०००) सहस्राश्ववार व्यूह- व्यूहित** सैनिकांतर्गत भावपंचास्यादि **प्रचंडतर** राजपुत्रानेकविध **संरक्षित** दिल्लींद्राभिमान- निधानीभूत- **सुरत्राण-मातुल**- मर्दनाविष्कृत जयद्रथरचित पार्थनरावतारनि**क्षेप** यौवनारंभगृहीत **म्लेच्छक्षयदीक्षा** क्षपितानेकविध विजातीय ताम्रभेदोद्भावित **दक्षाध्वरध्वंसन** दक्षनिग्रहानुग्रह **समर्थ** महोदग्रोग्रवेषानु**क्षेप** दिल्लींद्रमान प्रध्वंसनपटुकरदीकृत विजयपुराधी**श्वर भाग(गा)नगरेशादि छत्रपति प्रार्थ्यमान**- भुजछायसहज प्रयाणोछ्य **पलायित प्रबल पठाणपुर:सरसमाक्रांत** कार्नाटकप्रांत कर्णाकर्णन नितान्तक्लान्त **समस्तसामन्तचक्र- शिरश्चूडामणि**- मंजरीपुंजपिंजरित **पदपंकज- कंजिलेक्षण**

: **(मराठी अनुवाद) :**

नामाभिधान प्राप्त झालेल्या शाहाजी राजांच्या नातवाने (छ. संभाजी महाराजांनी)

– श्रीशाहाजी महाराज या नृपतींच्या नातवाने केलेल्या बालक्रीडा पाहून संतुष्ट झालेले व आवेशाने भारलेले, छत्रपती श्रीशिवाजी महाराज की, ज्यांनी प्रबळ अफजलखानाला खास उभारलेल्या मंडपात कुचलले, बिचवा चालविला, त्याच्या अंगातून उसळलेल्या रक्ताने ज्यांचा देह माखला गेला, नृसिंह प्रकट झाल्यासारखे जे भासले, सिंहाजसे शूर, पराक्रमी अतिदुर्गम सिंहगडावर चाल करून जाण्यासाठी पंच्याहत्तर हजार (७५,०००) घोडदळ ज्यांनी उभारले, आणि सेनेची व्यूहरचना ज्यांनी केली, आणि पार्थ या नरावतार अर्जुनाने जसे जयद्रथाचे मर्दन केले त्याप्रमाणे पराक्रमी शाहजाद्यांचे संरक्षण असलेल्या व दिल्लीच्या बादशहाचे अभिमानस्थान असलेल्या सुलतानाचे– मामाचे (शास्ताखानाचे) ज्यांनी मर्दन केले, जसे की, जयद्रथाचे मर्दन पार्थ नरावतार अर्जुनाने केले; तारुण्याच्या अगदी प्रारंभींच ज्यांनी म्लेच्छ नाशाची दीक्षा घेतली, अनेकविध विजातीय ताम्रमुखी सैनिक ज्यांनी पराभूत केले, दक्ष– यज्ञाचा विध्वंस करण्याचा ज्यांनी निश्चय केला, निग्रह आणि अनुग्रह करण्याला समर्थ, प्रचंड आणि उग्र चेहऱ्याच्या शत्रूंचे पारिपत्य करण्यामध्ये मुत्सद्दी, दिल्लीच्या बादशहाची मानखंडना करण्याला टपलेले, विजापूरचा आदिलशाहा आणि भागानगरचा निजाम हे ज्या छत्रपतींच्या पराक्रमाचा आश्रय घेऊ इच्छितात, ज्यांनी आपल्या सहज हालचालींनी प्रबळ पठाणांना पळवून लावले आहे, ज्यांनी कर्नाटक प्रांतावर आक्रमण केले, आणि ज्यांनी तेथील प्रशासकांना जेरीस आणले, समस्तसामंतचक्राच्या (मंडळाच्या) शिरोभागीं जे विराजित आहेत, आंब्याच्या मोहोराप्रमाणे ज्यांचे पाय पिवळे झाले आहेत, अमृत वर्षाव करणारी ज्यांची दृष्टी आहे. अंजनसंस्कारामुळे ज्यांचे डोळे सुंदर दिसत आहेत.



: (मूळ संस्कृत) :

(छत्रपती श्रीसंभाजी महाराजांचे आत्मगुण–कर्तृत्व–पराक्रम–वर्णन) :

– ''क्षत्रियकुलावतंस भृशबलान्वयोदधि विधुमंडलाय मानाभिमंडलाखंडल छत्रपति शिवराजपुत्रेण (छत्रपति श्रीशंभुनृपेण) अनेकदेवप्रार्थन प्रादुर्भूत–बालभाव इंद्रप्रस्थाधिनाथानुज्ञात– मल्लयुद्धदत्ताज्ञाभंग– संगातिरिक्तातिरक्तिमद्र– चनरचनानुरंजित चक्रवर्तिचित्त चक्रवर्तिलक्षणोपेत– प्रारब्ध प्राबल्य वैरिभावप्रविष्ट प्रधानादिप्रबल दुष्टमंत्र्युपदिष्ट ज्येष्ठपुत्रराज्याप्रदान– दुर्मन्त्र दुरभिप्रायाभिप्रेत– नीलपीतोपाधिपरिष्वक्त स्फाटिकमणिप्राय– हृत्सौजन्यैकनिकेत सापत्नरोषाक्रांत राज्ञी– रागानुसारि पितृभावोपदिष्ट– शिवराजछत्रपत्याशय परिज्ञानमात्र– पितृभक्तिवैमुख्यभीरु– धर्मपरिपाटि प्रक्रमाक्रमित– दाशरथिराम– विक्रमप्रक्रियप्रोत्साह परित्यक्त पादांतसंक्रांत– तृणतुच्छसार्धकोटि द्रव्याढ्य दुर्गबाहुल्याति दुर्गम राज्यभारगृहीत– स्वल्पाश्ववारसंभार– अवरंगाश्वपति सेनाधिपतिसंमिलन संपादितसप्तसहस्राश्ववार वैभवसंभावित भूपालदुर्गग्रहण दुराग्रहग्रस्त दलेलासुरसंयोजित जानुसमासादित– प्रकटित– तृतीयनेत्र– कृशानुशंभुरोषाडंबर– दक्षिणकराकलितसिकोश(?) कृपाण–चर्माम्बरसमासक्त वामकर– वीराग्रेसर वीरकेसरि बहलबाण– वर्षावलित्रस्त ताम्राग्रवर्तिषट् पंचो–छालनिगृहीत– समस्त योधगणाक्रांत दुर्गप्रांत– हेलोल्लंघित– दिल्लींद्रदल– परित्यक्त– धर्मपत्यनुषंगसंशीलित– पराक्रमाकलनानुसृत–

: **(मराठी अनुवाद)** :

– क्षत्रियकुलावतंस भोसले कुलसागरात चंद्राप्रमाणे जे शोभायमान आहेत, आणि पृथ्वीलोकातील जणू काही इंद्रच होत अशा छत्रपती श्रीशिवरायांच्या (ज्येष्ठ) पुत्राने, अर्थात छत्रपती श्रीसंभाजी महाराजांनी (आम्ही) अनेक देवतांची प्रार्थना केली. त्यामुळे आम्हांस अनुकूल कालमान प्राप्त झाला आहे, बालभावयुक्त आम्हांस अनुज्ञा दिली होती, इंद्रप्रस्थ (दिल्ली) च्या सत्तांधाने ज्या त्या मल्लयुद्धासाठीच्या दिलेल्या आज्ञेचा ज्या आम्ही भंग केला होता, – ज्या आमचा स्नेह दृढ आहे, – ज्या आमचे बोलणे मधुर आहे. – चक्रवर्ती राजांप्रमाणे ज्या आमची मनोवृत्ती आहे, जे आम्ही चक्रवर्ती लक्षणांनी युक्त आहोत, – दुर्दैववशात् वैरभाव पत्करलेल्या राजद्रोहाने झपाटले जाऊन जे उन्मत्त झाले त्या प्रधान आदिकरून प्रबळ दुष्ट मंत्र्यांच्या सांगण्यावरून ज्येष्ठ पुत्राला (आम्हांस) राज्य देण्यासंबंधीच्या दुष्ट सल्ल्यास अभिप्रेत त्या आम्हांस नानाविध (निळ्या-पिवळ्या छटांचे) उपसर्ग झाले आहेत, – ज्या आमचे हृदय स्फटिक मण्यांप्रमाणे आहे, जे आम्ही सौजन्यमूर्ती आहोत, – सापत्नभावाच्या आमीषाच्या आहारीं नेण्याच्या, राणीच्या इच्छेला झुगारून देणारे तसेच पित्याच्या कर्तव्याने सर्वोचित सल्ला देणाऱ्या पित्याच्या कर्तव्याला न जागणाऱ्या छत्रपती श्रीशिवराजांना विचार कर्तव्य आशयाला न जागणाऱ्यांचा विद्रोही मंत्र्यांमुळे संभ्रमित झालेले पितृभक्त असे आम्ही राजे धर्मपरंपरेप्रमाणे चालणाऱ्या दाशरथी प्रभुरामचंद्रांप्रमाणे जे पराक्रमी आम्ही,– धार्मिक विधींसंबंधीच्या निष्ठेमुळे ज्या आम्ही सर्वोपभोगतृणाजसे (गवतपालापाचोळ्याजसे) तुच्छ मानून, आपादमस्तक साधेपणा स्वीकारला आहे, – सहजगत्या दीड कोटी नाणी खर्च करून बांधलेल्या अनेक किल्ल्यांमुळे, अवघड वाटणारा राज्यभार ज्या आम्ही पेललेला आहे, – ज्या आम्ही घोडेस्वारांचा सेनासंभार उभारला आहे, ज्या आम्हांस औरंगजेबाच्या सेनाधिपतींसह ७,००० घोडेस्वारांच्या घोडदळाचे वैभव प्राप्त झाले आहे, – भूपालगड काबीज करण्यासाठी ज्या दलेलखानाने (दिलेरखानाने?) दुराग्रही क्लृप्त्या योजिल्या अशा खानाला ज्या आम्ही योजना आखून कह्यात घेतले, – ज्यांच्या उघडलेल्या तिसऱ्या डोळ्यापासून अग्नी प्रकट झाला आहे, अशा श्रीशंकरांच्या क्रोधाप्रमाणे ज्या आमचा क्रोध आहे, – उजव्या हातीं, म्यानातून

: (मूळ संस्कृत) :

**दशरथाचरण**– शिवचरणकमलप्रहृष्ट तातप्रेमसंप्राप्तराज्य– तरणिमंडलसरणि समनुसार–लोकांतरित भानुकुलभानुसंवर्धित– वैभवभरित **भूरिदुष्ट समुदाय– संरंभसमारब्ध दौर्जन्य– पंचसप्त सेवक** साहायिक– शिवयोगिभूतिभूषित **भालप्रदेश–कविवर्य कविकलश** प्रोत्साहन समुल्लसद्रुणिम **संसक्त दृग्देशगृहीत स्वेष्ट–** देवतानिदेश **प्रचंडतर** दोर्दंडास्फालन **निगृहीत** खलखंडखंडितारातिः– मुंडमंडलिकाप्राप्ति प्रचंडप्रनृत्तचंडीश्वर– वरिष्ठघोषित– सर्वाभीष्ट– निजाज्ञाडिंडिमर **वोद्घोष–संतुष्टप्रजासंघ– द्विज–देवौघ विहिताशी:** परंपरापरिपूर्णायु: **साधित– संपूर्णाश्वसमुदायोदंच**– न्मंचकाधिरोहण छत्रधारणावहेलित– **दिल्लीशाद्यनेक** छत्रपतिध्रुवप्राप्तप्रकृष्ट– दुर्गाधिपत्य दक्षिणादृग्वीक्षण **क्षणलब्ध**– सकलदक्षिण– विविधदक्षिणा प्रदानाभिनंदित–विद्वज्जन **निंदित देव शाखि– निजप्रचंडप्रतापतापन** तापिताखर्वगर्वखर्वी कृतारिवर्ग– **दारुदारुण स्वयशस्तौम**– शरत्सोममंडितो– द्वेलडिंडीरपिंड पांडुरापारपारावार **वेला**– ललितेलावलय विराजमान– राजाधिराज **श्रीशंभुराजछत्रपतिना विहितं– ''युग्म व्योम रसेंदु संवलित (=१६०२)** समातिक्रांत **नृप** शालिवाहन **शक रौद्र वत्सर नभस्य सित दशमींदु**वासर **समय** राज्यावाप्त्यनेहा– **प्रतिज्ञात चतुर्विंशति** कृष्टलमित– **शुद्धकल** धौतघटित **दशसहस्रसंख्याक** सुरत्राणीय वराहार्पणं प्राप्तराज्याभिवृद्ध्यर्था **भिमतार्थ–सिध्यर्थ** गुरुपादुकापूजन– **पुर:सरं** श्रीपादुका पूजननिमित्तं

: **(मराठी अनुवाद) :**

बाहेर काढलेली लखलखती तलवार आणि डाव्या हातात ढाल ज्या आम्ही धारण केली आहे, – वीराग्रेसर, वीरकेसरी पुष्कळ बाणांचा वर्षाव करून ज्या आम्ही ताम्रांना भयभीत केले आहे, – ज्या आमचे आघाडीचे वीर, शत्रूंवर अचानक छापा घालून त्यांना पकडतात, – समस्त योद्ध्यांनी काबीज केलेले किल्ले आणि सभोवतीचे प्रदेश यांच्यावर जे आम्ही सहजगत्या आक्रमण करतो, – दिल्लीच्या बादशहाने पाठविलेल्या मौलवींच्या प्रचाराला तोंड देण्यासाठी ज्या आम्ही पराक्रमाची शर्थ केली आहे, – दशरथ राजाच्या पराक्रमाचे ज्या आम्ही अनुसरण केले आहे, – शिवचरण कमळांमुळे अत्यंत हर्षित श्रीशिवजींच्या चरणकमलांमुळे लाभलेल्या, प्राप्त झालेल्या वडिलांच्या प्रेमामुळे ज्या आम्हांस राज्य प्राप्त झाले आहे, – सूर्यमंडलाच्या संचार–प्रदेशावरून आक्रमण करणाऱ्या सूर्याप्रमाणे जे आम्ही भोसलेकुलसूर्याने संवर्धिलेल्या, – वैभवाने नटलेले आहोत; दुष्टांच्या टोळीने उडविलेल्या दंडेलीचे पारिपत्य ज्या आम्ही पांच – सात (५–७) सेवकांच्या सहाय्याने केले आहे, – शिवयोग्याप्रमाणे कपाळावर भस्म चर्चिले आहे, त्या कविवर्य कलश यांनी ज्या आम्हांस प्रोत्साहन दिले; अनेक दुष्टांनी आरंभिलेल्या नीच कृत्यांनी, ज्या आमचे डोळे लालबुंद अग्नीच जसे तेजस्वी झालेले होते; – अशा वेळी स्वत:च्या इष्ट देवतेची आज्ञा घेऊन, – आपले प्रचंड दंड ज्या आम्ही थोपटून, – दुष्टांच्या समूहाला जखडून ठेवले आहे, – ज्या आम्ही शत्रूंची डोकी उडविली आहेत, मांडलिक सरदार मिळाल्यामुळे जे आम्ही बलवान झालेले आहोत, – प्रचंड नृत्य करणारी चंडी आणि आदि वरिष्ठ देवतांनी ज्या आमचे अभीष्ट चिंतिले आहे, – ज्या आमच्या आज्ञेचा डंका सर्वत्र वाजत आहे. – ज्या आमच्या राज्यातील प्रजा संतुष्ट आहे, आशीर्वादांमुळे ज्या आम्हांस परंपरेने परिपूर्ण आयुष्य लाभलेले आहे, – संपूर्ण घोडदळाच्या उपस्थितीत ज्या आम्ही उंच मंचकावर बसून छत्र धारण केले आहे, – दिल्लीच्या बादशहासहित अनेक राजांना ज्या आम्ही तुच्छ लेखले आहे. – ज्या आम्हांस मजबूत किल्ल्यांचे आधिपत्य लाभले आहे, – उजव्या डोळ्याने (दक्षिण, अनुकूल, अविरोधक नेत्राने) पाहिल्यामुळे सगळा दक्षिणदेश आमच्या ताब्यात आलेला आहे, – नाना प्रकारच्या दक्षिणा देऊन ज्या आम्ही विद्वज्जनांचा सत्कार केला आहे, – देव–गणांची निंदा ज्यांनी केली अशांना ज्या आम्ही आपल्या प्रचंड

: (मूळ संस्कृत) :

सकलविपक्षक्षयार्थ मायुरारोग्यैश्वर्य- पुत्रपौत्राद्यभिवृद्ध्यर्थम्- प्रत्यब्दं स्वीय स्वामीयपुत्रपौत्र पारंपर्यक्रमेण चालनीयं उपभोक्तव्यं च ''सुंदरी-मंदिर मंडनार्थानुदत्त-'' सहजनिजकरोर्ध्वकरण पुष्कराकुंचनोपह सितैरावत- (महत् च) महत्त्वमत्त मातंग- वल्गुवल्गनविजित- रविरथतुरंगमालिवा रत्नाग्रगण्य उच्चै:श्रवस समानजातीय- पंचाश्व सांगोपांगयाप्ययान- प्रतिवर्षसंबंधिभक्ष्य भोज्यसहित- सपरिजन सपरिवार- स्वामिवार्षिकमप्येत दंतर्गतमेव बोद्धव्यं इत्यलं विस्तर पत्ररचनया शुभमस्तु !! - दानपालनयोर्मध्ये दानाच्छ्रेयोनुपालनं ।। दानात्स्वर्गमवाप्नोति पालनादच्युतं पदं ।।१।। शिष्टाय द्विजवर्याय यो ददाति धनं धरां।। कल्पकोटिशतंया वच्छिवलोके महीयते ।।२।। मद्वंशजा: परमहीपति- वंशजावापापादपेत मनसो भुवि भावि भूपा: ।। ये पालयन्ति मम धर्ममिमं समग्रं तेभ्यो मयाविरचितो (अँ)जलिरेष मूर्ध्नि ।।३।। सामान्योयं धर्मसेतुर्नृपाणां कालेकाले पालनीयो भवद्भि: ।। (इत्थं)इत्छं सर्वान्भाविन: पार्थिवेन्द्रान् भूयोभूयो याचते रामचंद्र: ।।४।। एतत्पालयते यस्तु पूतात्मा धौतकिल्बिष: ।। भुक्तिमुक्तिफलं प्राप्य मोदते कुलजै: सह ।।५।। शके राजाभिषेकस्यसप्तमे रौद्र वत्सरे।। भाद्रे सितेनंगमृगौ चंद्र रुद्रे च संगवे ।।६।। नारायणाध्वरींद्रस्य रघुनाथभिध: सुत:। आमात्योदानपत्रे स्मिन्लेखनालंकृतिं व्यधात् ।।७।। ।। लेखनालंकार ।।

: **(मराठी अनुवाद)** :

पराक्रमरूपी तेजाने होरपळविले आहे. – प्रचंड अभिनिवेशाने ज्या आम्ही शत्रूंना नेस्तनाबूत केले आहे, – काष्ठाप्रमाणे निष्ठूर, स्वयशामुळे स्वयंप्रकाशित, शरद ऋतूतील चंद्राप्रमाणे शोभायमान, समुद्रतीराबाहेर पडलेल्या समुद्रफेसाप्रमाणे अपार शुभ्र वर्ण असलेल्या यशोधवल आम्ही, या अनंत पृथ्वीतलावर विराजमान असलेल्या राजाधिराज (श्रीशंभुराज छत्रपतींनी केलेले) हे – ''युग्म = २, व्योम = ०, रस = ६, इंदु = १/ (२ ० ६ १ = १६०२)'': (अंक उजवीकडून डावीकडे वाचून), नृप/शालिवाहन शके १६०२, रौद्र नाम संवत्सरात, भाद्रपद शुद्ध १०, सोमवार, या दिवशी हे, यापूर्वी राज्यप्राप्तीच्या शर्तीवर कबूल केलेले प्रत्येकी २४ गुंजांचे शुद्ध चांदीचे १०,००० (दहा हजार संख्यात्मक) नाण्यांचे दिलेले दान, आम्हांस मिळालेल्या राज्याच्या वृद्धीसाठी गुरुपादुकापूजन पुरःसर श्रीपादुकांच्या पूजनानिमित्त सर्व शत्रूंच्या संहारार्थ आयुरारोग्य ऐश्वर्य व पुत्रपौत्रादिकांच्या अभिवृद्धीसाठी प्रतिवर्षी स्वतःच्या व स्वामींच्या पुत्रपौत्रादि परंपरेने चालवावे, आणि त्याचा उपभोग घ्यावा. ''सुंदरी–मंदिराच्या शोभेसाठी आणि मदतीसाठी सहज पुढे केलेल्या हाताने मंदिररचना, जलाशय खोदणे, ऐरावताला मागे टाकतील अशा मत्त हत्तींच्या आकर्षक क्रीडांद्वारा ज्यांनी सूर्य–रथाच्या घोड्यांना जिंकले आहे, – घोड्यांमध्ये सर्वश्रेष्ठ अशा उच्चैःश्रवस या, (इंद्राच्या) अश्वाच्या समान जातिवंत ५ (पांच) घोडे जोडलेले वाहन प्रतिवर्षी लक्ष भोज्यांसह (जेवणाऱ्यांसह/ ?), त्यांच्या चारापाण्याच्या खर्चासह सपरिजन आणि परिवार यांच्या भोजनासह स्वामींच्या वार्षिक उत्सवासाठी दान यातच अंतर्भूत समजावे. अधिक विस्ताराची आवश्यकता नाही. प्रस्तुत दानपत्ररचनेने शुभ ते ते घडो !! दान आणि पालन यांमध्ये दानापेक्षा पालन हे अधिक श्रेष्ठ आहे. – दानापासून (ते दान देणाऱ्याला) स्वर्ग प्राप्त होतो. – मात्र दानपत्राच्या पालनापासून अच्युत पद प्राप्त होते. (१) – सदाचारी श्रेष्ठ द्विजाला (ज्ञानवंतास) जो धन आणि भूमी दान देतो तो कोटीशः कल्पांतापर्यंत शिवलोकात सन्मान पावतो. (२) आमचे वंशज अथवा अन्य राजांचे वंशज, पापभीरू असे, या पृथ्वीवर भविष्य काळात होणारे राजे जे या आमच्या समग्र राजधर्माचे पालन करतील त्यांच्यासाठी आम्ही आमच्या शिरावर अंजली धारण करतो. (३) – राजे लोकांचा हा सामान्य धर्मसेतू, याचा सदासर्वकाळीं आपण

**: (मराठी अनुवाद) :**

आदर करावा, अशी सर्व भावी राजे लोकांना प्रभु रामचंद्रांनी पुन्हा पुन्हा प्रार्थना केली होती. हे 'प्रभु रामचंद्र', (४) – जे शुद्धात्मा आणि निष्पाप पुरुष या धर्माचे पालन करतात त्यांना भुक्ती आणि मुक्ती असे उभयविध फळ मिळते आणि ते वंशजांसह आनंदात राहतात. (५) छत्रपती श्रीशिवाजी महाराजांच्या राजाभिषेकाच्या ७ वे वर्षी, रौद्र संवत्सरात (श्रीशिवरायांच्या निधनाच्या शकवर्षी व संवत्सरवर्षी) भाद्रपदमासीं, शुद्ध पक्षात, चांद्र एकादशीच्या दिवशीं सकाळच्या प्रहरीं, (६) नारायण श्रेष्ठ यज्ञकर्ता रघुनाथनामक पुत्र अमात्य यांनी या 'दान-पत्रा'वर 'लेखनालंकार' केला.''

: 'संमत आबाजी **(मोडी लिपीत)** सोन देऊ सचीव।'

* (२७ ऑगस्ट १६८०)



## ❐ : (दानपत्र - आकलन) :

### * दानपत्र १ : द्वितीयार्ध :

**१. * (श्रीमालोजीराजे भोसले यांचे माहात्म्य.) :**

: १ : -''शिखर-शिंगणापूरच्या श्रीशंभू महादेवाच्या यात्रेस (प्रतिवर्षी चैत्र शुक्ल पौर्णिमेस) आलेल्या निरनिराळ्या गांवांतील लोकांनी पिण्याच्या, धुण्याच्या पाण्याच्या टंचाईमुळे, कानठळ्या बसविणारी केलेली हाकाटी ऐकून, ज्यांच्या मनात शिवभक्ती निर्माण झाली, त्या मालोजी राजे भोसले यांचे पणतू संभाजी राजे होत.

: पाण्याच्या ओघाप्रमाणे उचंबळून आलेल्या भावनांनी खर्चाची तमा न बाळगतां, हरिश्चंद्र, रंतिदेव यांच्याप्रमाणे सर्वस्व अर्पण करण्याचा संकल्प करून मांधातृ (मांधाता) नामक सम्राटाप्रमाणे उदारहृदयी असलेल्या मालोजी राजे भोसले यांनी, पूर्वजजनांनी अर्धवट (अपूर्ण) सोडलेले (पिण्याच्या पाण्याचा तलाव बांधण्याचे) काम जोमाने पुन: सुरू केले, व अशाप्रकारें आपल्या १०१ (एकशें एक) पूर्वजांचा (पिढ्यांचा?) उद्धार केला.

(१) : कुलदैवताचे शिखरशिंगणापूर, महादेवाचे डोंगरावर, तीर्थक्षेत्री तलाव बांधण्याची, बांधल्याची ही बातमी सर्वत्र, सर्वदूरवर पसरली.

: या त्यांच्या पुण्यकर्मामुळे, वेद आदि ग्रंथांमध्ये सांगितल्याप्रमाणे ते (मालोजी राजे) जणू इंद्रच भासले. (पर्जन्याचे दैवत.).

: त्यांना शाश्वताचे भाग्यवैभव लाभले.

: त्यांच्या हत्ती, घोडे इत्यादींच्या प्रचंड नाद-निनाद ध्वनींनी प्रचंड गडगडाटकारी मेघगर्जनांनाही मागे टाकले.

: या काळापर्यंत झालेल्या तलावाच्या कामाचे सिंहावलोकन करून, प्रतिवर्षी हा तलाव भरला जाण्यासाठी, आणि त्याच्या देखभाल-दुरुस्ती, डागडुजीसाठी, सुधारणेसाठी आवश्यक त्या खर्चाची योजना त्यांनी (मालोजी राजांनी) केली.

: पुण्यकर्मस्वरूप असा हा तलाव म्हणजे, सदाशिव श्रीशंकराचे स्वरूपच समजून मालोजींचे अंत:करण श्रीशिवाच्या भक्तीने भरून आले.

: मालोजी राजांच्या अशा या कृतीमुळे प्रसन्न झालेल्या श्रीशंकरदेवांनी

कृपादृष्टीने त्यांच्या (मालोजी राजे भोसले यांच्या) वंशात अंशावतार घेण्याचा अनुग्रह केला; तरून जाण्यास कठीण अशा संसाराचे (जगताचे, ऐहिक जन्माचे) भवसागराचे त्यांचे दुःख दूर केले. सारासार विचार करण्यात चतुर, शूरांमध्ये श्रेष्ठ, देव–ब्राम्हण–प्रतिपालक आणि, पृथ्वीवर प्रसिद्ध अशा या मालोजी राजे भोसले यांचे पणतू श्रीसंभाजी राजे भोसले होत.''

* *

**२ : * (श्रीशाहाजी महाराज भोसले : यांचे माहात्म्य.) :**

: ''श्रीमालोजी राजे भोसले यांच्यानंतर, त्यांचे पुत्र श्रीशाहाजी महाराज भोसले, यांनी प्रबळ अशा निजामाच्या राज्यातील एक प्रमुख सेनापतीचे पद मिळविले;

: एक रात्र युद्ध करून त्यांनी हाहाकार उडविला;

: धनुर्विद्येच्या जोरावर त्यांनी अनेक प्रबळ शत्रूंना बंदी बनविले;

: दिल्लीपती (शहाजहान)कडून आलेल्या वीरश्रेष्ठ मलिक (अंबर) नांवाच्या यवन असुराच्या आज्ञेने मंदिरे उद्ध्वस्त करण्यासाठी आलेल्या सैनिकांचा नाश, प्राणांची पर्वा न करता त्यांनी केला; आणि देवालयांचे रक्षण केले;

: श्रेष्ठ क्षत्रियांना शोभेल असा पराक्रम त्यांनी गाजविला;

: शत्रूंनी घातलेल्या अटींमधील उद्धटपणा त्यांनी धुडकावून लावला;

: अनेक दैवतांची त्यांनी स्थापना केली;

आणि श्रीशंकरांचा कृपाप्रसाद प्राप्त करून घेतला;

: निजामाचा प्रदेश ताब्यात घेतला.

: या पाठोपाठ आलेल्या (१६२९–३०) दुष्काळ व परचक्र (मोगलांचे व आदिलशहाचे) यांमुळे सर्व प्रजा त्रस्त झाली असतांना, त्यांनी आकाशात चमकणाऱ्या विजेप्रमाणे तेजस्वी तलवार हातीं घेऊन ताम्र व तुर्क यांना नामोहरम केले, व कलंकी (कल्की) या अवताराचे रूप दाखविले, कृतीने प्रकट केले.

: शाहाजी राजांनी, ''आपल्या वंशाचे वैशिष्ट्य सांगणारे छत्र धारण केले;''

: महावली (माहुली) हा दुर्गम किल्ला जिंकून युद्धात पराक्रम गाजविला;

: शत्रुसैनिकांचा नि:पात करून स्वामीच्या धर्माचा अभिमान स्थापित केला.

: शाहाजी राजांच्या शत्रूंच्या दुर्दैवाने त्यांच्या पराक्रमाचा अंदाज न आल्याने आदिलशाहाने त्यांना विपुल ऐश्वर्य दिले; त्यामुळे ते (शाहाजी महाराज) शोभून दिसू लागले.

: हैंदवधर्माचा जीर्णोद्धार करण्याचा निश्चय करून मोठ्या धैर्याने त्यांनी म्लेंच्छांचा नायनाट केला;

: राज्याच्या सीमा सांभाळण्यासाठी अनेक मांडलिकांनी त्यांना सहकार्य दिले, तर इतर काही प्रमुख राजांनी त्यांचे अनुकरणही केले.

: (अशा श्रीशाहाजी राजांच्या) सैन्यातील अगदी सहज चालणाऱ्या अतिशय चपळ घोड्यांच्या टापांनी धुरळा उडत होता;

: भेरी, नगारे वाजत होते;

: हत्तींच्या गळ्यांतील घंटांचा ध्वनी दुमदुमून राहिला होता;

: गर्जना करणारे वीर सैनिक मागोमाग येत होते;

: तोफा उडविणारे गोलंदाज त्यांच्या सेनादलांबरोबर होते.

: सतत आवाज करीत चालत जाणाऱ्या यांच्या पायदळाला कनकगिरीकडे जाण्याचा इशारा केवळ नेत्रांद्वारेच करण्यात आला होता.

: शौर्य, औदार्य, गांभीर्य, धैर्य इत्यादी इत्यादी अगणित गुणांनी शाहाजी महाराज हे मनोहर वाटत होते.

: त्यांनी याचकांच्या कामना पूर्ण केल्या होत्या;

: त्यांनी दुसऱ्यासाठी कष्टही खूप सोसले होते; आणि– त्यांनी, 'महाराज' हे अभिधान प्राप्त करून घेतले होते.

: अशा श्रीशाहाजी महाराजांचे, श्रीसंभाजी महाराज हे 'नातू' होत.

**: ३ : * (छत्रपती श्रीशिवाजी महाराजांचे माहात्म्य.) :**

:'' निष्कपट अशा शिवाजी महाराजांना पकडण्यासाठी आलेल्या गर्विष्ठ, जबरदस्त अशा अफझलखानाच्या कुशीत लहान बालकाने खेळण्याशी खेळावे, इतक्या सहजपणें 'बिचवा' (शिवाजी महाराजांनी) खुपसल्यामुळें उसळलेल्या रक्तप्रवाहाने शरीर माखून गेल्याने, शिवाजी राजे नृसिंहाप्रमाणे

दिसू लागले. (नरसिंहाने हिरण्यकश्यपूचे पोट आपल्या हातांच्या पंजांच्या नखांनीच फाडले होते; अशी एक जुनी कथा आहे.)

: सिंहासारख्या (नरवीर पराक्रमी/नरसिंहच अशा) तानाजींनी स्वप्राणांचे बलिदान देऊन सिंहगड जिंकून घेतला.

: ७५,००० (पंचाहत्तर हजार) घोडेस्वार बरोबर घेऊन आलेल्या आणि अनेक पराक्रमी राजपुत्रांचे संरक्षण लाभलेल्या औरंगजेबाला (ही) ज्याचा अभिमान वाटे, त्या त्याच्या (शाहिस्तेखान) मामाची फजिती करून, शिवाजी राजांनी, जयद्रथाची फजिती करणाऱ्या पार्थाची (अर्जुनाची) बरोबरी केली.

: तारुण्याच्या अगदी प्रारंभींच त्यांनी (शिवाजी महाराजांनी) म्लेच्छांचा नाश करण्याची दीक्षा घेतली,

: अनेक ताम्रांना पराभूत केले.

: हे (शिवाजी) राजे म्हणजे,– दक्षाच्या यज्ञाचा विध्वंस करण्यात तत्पर असलेले, आणि कृपानुग्रहही करणारे जणू श्रीशंकर दैवतच होते.

: दिल्लीपतीचा गर्व नाहीसा करण्यात ते (शिवाजी महाराज) पटाईत होते.

: विजापूरच्या भूपतीला आपल्याकडे कर द्यायला त्यांनी (शिवरायांनी) भाग पाडले होते. भागानगरच्या (हैद्राबाद/आंध्रप्रदेश) अधिपतीनेही (कुतुबशाही) यांची (शिवरायांची) मदत मागितली होती.

: शस्त्रधारी हात यांनी नुसता वर करतांक्षणींच प्रबल पठाणही पळून जात असत.

: या (शिवाजी) राजांनी कर्नाटक–प्रदेश काबीज केल्याचे ऐकून भयभीत झालेल्या मांडलिक राजांनी यांच्या चरणांवर मस्तक ठेविले होते. मस्तकांतील पुष्पपरागांनी त्या श्रीशिवरायांचे चरण धूसरित झाले होते. अमृताचा वर्षाव करणारी ज्यांची (शिवरायांची) दृष्टी आहे.

**: ४ : * (छ. श्रीसंभाजी महाराज यांचे गौरवशाली व्यक्तिमत्त्व.) :**

(७) : क्षत्रिय कुलाला अलंकार ठरलेले, भोसले कुलरूपी समुद्राला चंद्रमंडलाप्रमाणे शोभणारे भूतलावरील इंद्रच, असे होते राजे शिवाजी.

– ''अनेक दैवतांची प्रार्थना केल्याने ज्या संभाजींना (अनुकूल कालमान प्राप्त झाले.) अनुकूलत्व लाभले, त्या आम्हांस (संभाजींस) दिल्लीपतीने

(औरंगजेबाने) आमच्या बालवयातसुद्धा दिलेली मल्लयुद्धाची आज्ञा ज्या आम्ही (संभाजींनी) पाळली नाही, (तिचा भंग केला.).

: निरहंकारी व मधुर अशा बोलण्याने ज्या आम्ही (संभाजींनी) चक्रवर्ती राजांचे (श्रीशिवरायांचे) मन मोहविले, स्वत: जे आम्ही (संभाजी) 'चक्रवर्ती' राजसम्राट लक्षणांनी युक्त आहोत;

: नशीब फिरल्याने ज्यांचे (आमचे, संभाजींचे) मंत्रीही (आमचेच) शत्रूही बनले; प्रबल अशा दुष्ट मंत्र्यांनी ज्येष्ठ पुत्राला राज्य न देण्याचा बदसल्ला दिल्याचे जाणूनही,

– निळ्या–पिवळ्या रंगांच्या फुलांच्या सहवासाने स्फटिक, जरी त्या त्या रंगांचे भासले, तरी मूळचे निर्मळच असतात. त्याप्रमाणे–
ज्यांचे (संभाजींचे) अंत:करण निर्मळ होते.

: सौजन्यमूर्ती असलेल्या पण सापत्नभावाने प्रभावित झालेल्या राणीवरील प्रेमाने, शिवाजी राजांनी वडील या अधिकारात शृंगारपुरीं जाऊन तेथे वास्तव्य करणे व तेथून राज्य प्रशासन पाहण्याची दिलेली आज्ञा, त्यांचा मानस जाणून, पितृभक्तीला पारखे होऊ नये, व (पुत्र) धर्माचेही पालन व्हावे, म्हणून ज्यांनी (आम्ही) मानली, आणि–

: दशरथाचे पुत्र श्रीराम यांच्याप्रमाणे आपल्या पित्याच्या (श्रीशिवरायांच्या) आज्ञेचे पालन केले;

: आपल्या स्वत:च्या पायांशी आलेले दीड कोटीचे धन (१,५०,००,०००/–), राज्य, अनेक किल्ले हे सर्व सोडून देऊन,–

– केवळ थोडेसे घोडेस्वार बरोबर घेऊन ते (आम्ही/संभाजी राजे) राहिलो;

: औरंगजेबाच्या घोडदळाचा प्रमुख दिलेरखान हा ७,००० (सात हजार) घोडदळ आणि वैभव घेऊन, भूपाळ दुर्ग घेण्यासाठी आला, व त्याने (आमच्यापुढे/संभाजींपुढे) गुडघे टेकले असतां,–

: श्रीशंकरांनी आपला तिसरा डोळा उघडून त्यातून अग्नी बाहेर काढावा, (बाहेर टाकावा/डोळ्यांतून अग्नीचा वर्षाव करावा, त्याप्रमाणे ज्या आम्ही (संभाजींनी) आमचा क्रोध/रोष प्रकट केला;

: डाव्या हातात ढाल, व उजव्या हातात म्यानातून बाहेर उपसलेली तरवार घेऊन, धीराने युद्ध करून, तर अनेक वेळा बाणांचा वर्षाव करून ज्या आम्ही (संभाजींनी) मोगलांना हैराण केले;

: ज्या आम्ही (संभाजींनी) शत्रूंकडील सैनिकांना कैद करून, त्यांचे किल्ले व प्रदेश काबीज केले,
: दिल्लीपतीचे सैन्यही (ज्या आम्ही) सहज गारद केले;

: दशरथ राजाप्रमाणे ज्या आम्ही (संभाजींनी) धर्माचे पालन केले;

: शिवाच्या चरणांचे ध्यान करणाऱ्या कुलरूपी सूर्याचे (वंशसूर्याचे/सूर्य वंशाचे/भोसले कुलसूर्याचे) वैभव ज्या आम्ही (संभाजींनी) वाढविले;

: पांच–सात (५–७) सेवक स्वत:बरोबर घेऊ३न येणाऱ्या,

: कपाळाला भस्म लावलेल्या कविवर्य कवि कलश याने ज्या आम्हांस (संभाजींस) प्रोत्साहन दिले;

: अनेक दुष्टांनी आरंभिलेल्या नीच कृत्यांमुळे ज्या आमचे (संभाजींचे) डोळे (क्रोधाने) लाल झालेले होते;

: इष्ट देवतेची आज्ञा (कौल) घेऊन,
: आपले बलशाली दंड थोपटून ज्या आम्ही (संभाजींनी) दुर्जनांचा नायनाट केला;
: व त्यामुळे शत्रूंची मस्तके गळ्यात घालून नृत्य करणाऱ्या चंडीदेवीचा पती जो श्रीशिवशंकर;
: त्याच्याप्रमाणे आम्ही (संभाजी) राजे दिसलो;
: त्या आम्ही (संभाजी राजांनी), सर्वांचे कल्याण करणाऱ्या राजआज्ञेची दवंडी पिटविली, त्यामुळे,–
: त्यांचे (आमचे/संभाजींचे) प्रजाजन संतुष्ट झाले.
: ''दीर्घायु हो !'' असा आशीर्वाद सर्व विद्याज्ञानवंतांनी व देवतागणांनी ज्या आम्हांस (संभाजींस) दिला आहे,

: संपूर्ण घोडदळ ताब्यात घेऊन दिल्लीपती (औरंगजेबा)सारख्या अनेकांची तमा/फिकीरही न बाळगतां ज्या आम्ही (संभाजींनी) सिंहासनावर आरूढ होऊन राजछत्र धारण केले;

: बलाढ्य अशा किल्ल्यांवर ज्या आम्ही (संभाजींनी) आधिपत्य प्रस्थापित केले आहे;

: केवळ नजरेच्या जरबेने (धाकानेच) ज्या आम्ही (संभाजी राजांनी) दक्षिण दिशा काबीज केली आहे;

– दक्षिणा देऊन ज्या आम्ही (संभाजींनी) विद्वज्जनांचा गौरव केला, व त्यामुळे कल्पवृक्षालाही मागे टाकले आहे;

: शत्रूंच्या सामर्थ्याचा गर्व ज्या आम्ही (संभाजी राजांनी) आपल्या पराक्रमरूपी सूर्याने जाळून टाकला (राख केला.);

: शरद ऋतूतील चंद्रामुळे भरती आलेल्या, शुभ्र फेसाने शोभणाऱ्या अमर्याद सागर–किनाऱ्याने वेढलेल्या, (यशाचा रंग शुभ्रधवल असतो, अशा यशोमंडित आम्ही,

: पृथ्वीवर विराजमान झालेल्या अशा राजाधिराज छत्रपती शंभुराजांनी हे जे दान दिले आहे, ते याप्रमाणे –

* ''युग्म–व्योम–रसेंदु संवलित''/(युग्म = २/ व्योम = ०/ रस = ६/ इंदु = १/ म्हणून– हे अंक उजवीकडून डावीकडे वाचून/= १६०२ नृप शालिवाहन शक, रौद्र नाम संवत्सर, भाद्रपद शु. १०, सोमवार, या दिवशी–

हे यापूर्वी राज्यप्राप्तीच्या शर्तीवर कबूल केलेले दान दिले आहे.

: (त्याप्रमाणे) – २४ गुंजा इतक्या शुद्ध सोन्याची घडविलेली दहा हजार सुलतानी (१०,०००); 'वराह' नांवाची नाणी.

: राज्यप्राप्तीच्या प्रसंगीं, अनासक्त भावनेने दान देण्याचे संभाजी राजांनी ठरविले. तसेच–

: मिळालेल्या राज्याची वाढ व्हावी, म्हणून गुरु–पादुकांचे पूजन करून, त्या निमित्त, व शत्रूंचा नाश व्हावा, म्हणून–

आयुष्य, आरोग्य, ऐश्वर्य, पुत्र व पौत्र आदींच्या अभिवृद्धीसाठी दर वर्षी स्वतःच्या आणि स्वामींच्या (ज्याला दान दिले, त्याच्या) परिवारासाठी व

सेवकांसाठी, दरवर्षी आवश्यक त्या अन्न–धान्यासह सर्व काही या दानातच समाविष्ट आहे, असे समजावे.

: हा विस्तार आता पुरे. कल्याण असो !

* ''दान देणे व पुढे त्याची अंमलबजावणी करणे, यांमध्ये– दानापेक्षा त्याची अंमलबजावणी अधिक महत्त्वाची होय. : दानामुळे स्वर्गप्राप्ती होते. : (? ?) : तर त्या दानाच्या पालनामुळे (अंमलबजावणीमुळे) अच्युत–पदाची प्राप्ती होते. (?) : जो सुसंस्कृत व विद्यासंपन्न अशा 'द्विजा'ला (विद्वानाला, ब्राम्हणाला/?), धन आणि जमीन दान करतो, तो शिवलोकात (कैलासात, कैलासवासात ?) अनंतकाळपर्यंत राहतो, मोठेपणाने राहतो. (!) (२): माझे (संभाजी राजांचे) वंशज, किंवा (येथे राज्य करणारे) अन्य राजांचे वंशज, किंवा– पुढे होणारे निष्पाप असे राजे, माझी (संभाजींची) धर्माज्ञा पाळतील, त्यांना मी (संभाजी) प्रणाम करतो. (३)

: ही राजांची धर्ममर्यादा कायमची आहे. ती आपण वेळोवेळी (कालेकाले) सर्व कालात पाळावी, अशी हा 'श्रीरामचंद्र' (??) पुढे होणाऱ्या सर्व राजश्रेष्ठांना प्रार्थना करतो. (४)

: जो निष्पाप व पवित्र पुरुष, ही आज्ञा पाळील, तो व त्याचे वंशज भोग व मोक्ष प्राप्त करून आनंदात राहतील.

* *

**दानपत्राचा लेखनकाल :**

: (शिव) राजाभिषेकाच्या (सप्तमे) सातव्या रौद्र नांवाच्या संवत्सरात(वर्षात)–

भाद्रपद शुद्ध १०, सोमवारीं 'संगव' नांवाच्या प्रात:कालीन मुहूर्तावर

: (संगव = दिवसाचा ७ ते १२ घटका–काल.

दूध काढण्याची वेळ. (छां. उप. २.९.४, भागवत पु. ६–८–२०).

: रघुनाथ नारायण अ'मात्य याने, या दानपत्राचे लेखन केले. (६,७)

लेखनालंकार. चंद्र ११ मास भाद्रपद संमत आबाजी सोनदेऊ सचीव.

उर्फ साबान सन इहिदे समानीन अलफ.

बार सुद बार शुद बार अनुमतं च दानाध्यक्ष मोरेश्वर पंडितरायस्य शुभमस्तु छ.

= (दानविभाग–प्रमुख मोरेश्वर पंडितराव यास हे मान्य आहे. कल्याण असो.)

**।। लक्ष्मी– नृसिंह–भक्त श्रीनीरेरायाब्धि सन्मणे: ।।**

= (लक्ष्मी–नृसिंहाचा भक्त प्रल्हाद निराजी

**प्रल्हादवर्धिनी मुद्रा प्रल्हादस्य विजृंभते ।।**

याची, ही मुद्रा शोभत आहे.)

**।। मर्यादेयं विजयते ।।**

* *

*** संभाजी राजांची 'कलशाभिषेका'ची तिथी :**

: (सूर्यवंश, उत्तरार्ध : पृ. ९, श्लोक ६४ वा).

– ''युग्माम्बराऽरक्षति (अरिक्षिति)/ ?) वृत्तिचित्रे
चैत्रे सिते, वत्सर कालयुक्तके (क्ते) ।।
काम्यातिथौ तत्कलशाभिषेक:
कामं चमत्कार ततिञ्चकार ।।''

(= युग्म (जोडी) = २, अंबर = (आकाश) = ०, अरि = (शत्रू, रिपू) = ६, क्षिती = १ = (पृथ्वी) = २०६१. हे अंक ('अंकानां वामतो गति: ।'– या न्यायाने) उजवीकडून डावीकडे वाचून = १६०२ शालिवाहन शकाची संख्या सिद्ध होते. शके १६०२, चैत्र, शुक्ल १२ (द्वादशी) मिती. यावर्षी 'कालयुक्त'नांवाचे संवत्सर वर्ष होते. त्या दिवशीं 'कामदेव' (मदन) रूपस्वरूपवान शिवराजपुत्र शंभु राजे यांचा 'कलशाभिषेक' हा राजसत्तास्वीकाराचा संस्कार (विधी, समारंभ, सोहळा) साजरा करण्यात आला.) (शके १६०२, कालयुक्त संवत्सर, चैत्र शुद्ध १२, द्वादशी). ती 'काम्या' तिथी होती.) : (मदन (काम) याची तिथी, ती 'काम्या' तिथी, चैत्र शु. १२, द्वादशी).

**

**चंद्र ११ (शुक्लपक्ष)**

**मास भाद्रपद ऊर्फ साबान**

**सन इहिदे समानीन अलफ**

**बार सुद बार शुध वार**[३]

**अनुमतं च दानाध्यक्ष मोरेश्वर पंडितरायस्य शुभमस्तु छ.**[४]

**''लक्ष्मीनृसिंहभक्तश्रीनीरेरायाब्धिसन्मणे: ।। प्रल्हादवर्धिनी मुद्रा प्रल्हादस्य विजृंभते मर्यादेयं विजयते**[६]

..................

* (टीपा : १. **'मतं मे श्रीशिवराजपुत्रस्य'** इत्यादि श्लोकातील अक्षरे संभाजींच्या हातची आहेत असे दिसते.

२. मुळात 'तकटा' आहे ते 'तटाक' असे वाचावयाचे.

३. श्लोक ७ नंतर 'लेखनालंकार'पासून शेवटचा 'शुध वार' येथपर्यंतचा मजकूर मोडी लिपीत आहे.

४. 'अनुमतं' इत्यादि मजकूर देवनागरीत आहे.

५. ही मुद्रा प्रारंभी व मजकुराच्या डाव्या बाजूस आहे.

६. 'मर्यादा' शिक्का प्रत्येक जोडावर पाचदा उठविला असून पाच जोडांचा हा सबंध कागद आहे.)

* *

## ९. : दानपत्र – १ : एक विवेचक अभ्यास :
## आणि छत्रपती श्रीसंभाजी महाराज (शिवाजीपुत्र) यांचे देवनागरी हस्ताक्षर :

(१) छ. संभाजी महाराजांनी आपल्या 'दानपत्रा'त (इ.स. १६८२) –

– पितामह (आजोबा) : शाहाजी महाराज,

– पिताश्री छत्रपति श्रीशिवाजी महाराज, यांची वर्णने केली असून, त्यांच्या आयुष्यातील महत्त्वाच्या घटना–प्रसंगांचे समर्पक अभिमानपूर्वक उल्लेख केले आहेत. तसेच –

– स्वत:च्या (छ. संभाजी महाराजांच्याही) आयुष्यातील प्रसंगही उद्धृत केले आहेत. ते प्रसंग काही पूर्वजीवनातील तर काही अभूतपूर्व आहेत.

(२) छ. राजाराम महाराजांचीही

सहा **'संस्कृत दानपत्रे'** उपलब्ध आहेत. त्या सर्वांत त्यांनी आपल्या पूर्वजांची वर्णने (वंशकथन) केल्याचे दिसून येते.

(३) छ. श्रीसंभाजी महाराज यांनी स्वत:स राज्यपद मिळविण्यात आलेल्या अडचणी दूर होऊन, ते मिळाल्यावर, त्यासंबंधी पूर्वी संकल्प केल्याप्रमाणे 'मंचकारोहण' केल्यानंतर 'सुंदरी देवीस' (तुळजापूर 'भवानी') वार्षिक नेमणूक दानपत्राने करून दिली ; त्याचे साद्यंत नेमणूकपत्र–

**'संस्कृत दानपत्रा'**त आहे. प्रारंभीं **''नमस्तुंगशिरश्चुंबिचंद्र''** – असा श्रीशिवाबद्दल नमनश्लोक आहे. (असाच उल्लेख : पाहा,

'छ. श्रीराजाराम महाराज यांची दानपत्रांतील माहिती' 'सनदापत्रे',

संपा. वाड, पृ. १ ते ६ आणि २११ ते २१७).मावजी व पारसनीस.

– त्या श्लोकाखाली, **''ब्रह्मानंदं परमसुखदं''**... हा 'सद्गुरु'नमन श्लोक आहे.

(४) – त्याखाली छ. संभाजींची 'पिंपळपानी' (पिंपळपानाच्या आकाराची)

'राजमुद्रा' आहे.

**।। श्रीशंभो: शिवजातस्य मुद्रा द्यौरिव राजते ।।**

**यदंक सेविनी लेखा वर्तते कस्य नोपरि ।।''**

(४.१) छ. संभाजी महाराजांची दुसरी एक ऐकीव 'राजमुद्रा' आहे:–

**''श्रीमत्‌शिवभक्त्युद्रेकादधिगत –**

**धरणीसमस्तसाम्राज्यवर्धिनि ।**

**शंभो: छत्रपतेर्मुद्रा मोदप्रदा जयति ।।''**

(४.२) पुण्यशील सौ. मातुश्री राणी येसूबाई – यांची **'राज्ञीमुद्रा'** :–

– **''श्रीसखी राज्ञी जयति ।।''**

(५) त्याच्या खालील २ ओळी –

स्वत: छ. संभाजी महाराजांनी आपल्या हाताने लिहिल्या आहेत. :–

**''।। मतं मे शिवराजपुत्रस्य श्रीशंभुराज ।। :**

**।। छत्रपते: यदत्रोपरि लेखितं ।। छ ।। श्री ।।छ।।''**

(६) या दान–पत्रात एकूण १४९ ओळी आहेत.

(७) प्रारंभीं डाव्या हातास लंबगोलाकृती मुद्रा, रा. मोरोपंत पिंगळे यांची 'असावी'. (?) :–

**''।। एषा श्रीशिव राजेंद्रमुख्यामात्यस्य सत्यधृक् ।**

**मुद्रा मोरेश्वरस्यास्तां भद्रासद्रागदायिनी ।।''**

**(८) या मुद्रेखाली –**

**१)''अनुमतं च दानाध्यक्ष मोरेश्वरपंडित रायस्य शुभमस्तु''** –

– या दोन उभ्या ओळी, त्यावेळचे पंडितराव मोरेश्वर यांनी स्वहस्तें लिहिल्या आहेत.

(९) पत्राच्या शेवटच्या १४९ व्या ओळीत शेवटी मोडी-लिपीत- **''लेखनालंकार''- या शब्दाने नारायणध्वरींद्राचे पुत्र रघुनाथ (रघुनाथ नारायण हनमंते) अमात्य यांनी केला आहे.**

(१०) त्याच्या खाली मोडीत -

- **''संमत आबाजी**
**सोनदेव सचीव''** - या दोन ओळी **आबाजी सोनदेव** यांनी स्वहस्तें संमतिदर्शक म्हणून लिहिल्या आहेत.

(११) पहिल्या ६५ ओळी 'प्रशस्ति'पर आहेत. तीत **कवि बाण** यांच्या '**कादंबरी**' (ऐतिहासिक काव्यग्रंथ) या धर्तीवर लांब-लांब सामासिक विशेषणे योजिलेली आहेत.

(१२) त्यानंतर, या दानपत्रात ऐतिहासिक प्रसंगांच्या उल्लेखांस प्रारंभ होतो. हे प्रसंग व शोध पुढीलप्रमाणे :-

१. वंशनाम : 'भृशबल'. (भृश = जोरदार, पुष्कळ, अती),
बल = शक्ती. (भोसले, विपुल सामर्थ्यसंपन्न वंश, भृशबल).

२. कुल, वंश : '**भानु**'. (= सूर्यवंश, रघुवंश, ईक्ष्वाकुवंश).

३. (ओळी ६५ ते ७० पर्यंत) : शाहाजी महाराजांनी कनकगिरी जिंकून घेतल्याच्या प्रसंगाचे वर्णन आहे. त्यांनी कर्नाटक हस्तगत केला, तेव्हा कनकगिरीच्या पाळेगारास जिंकून, तो गिरी घेण्याचे काम त्यांनी (आपले ज्येष्ठ चिरंजीव संभाजीराजे) यांच्यावर सोपविले होते; त्यांच्या संगतीं अफजलखानही होता. तो, शाहाजीराजांचा मनातून द्वेष करीत असे. युद्ध चालू असता अफजलच्या विश्वासघातामुळे श्रीशिवरायांचे थोरले बंधू, त्या संभाजी राजांवर अग्नियंत्राचा गोळा लागून मृत्यू ओढवला.

: (संभाजी राजे इ. स. १६६३ पर्यंत जिवंत असल्याचे शिलालेखी पुरावे

उपलब्ध झाले आहेत. (कर्नाटकात)/ : रा. आ. कदम)

: तद्नंतर शाहाजीराजांनी घनघोर युद्ध करून गडावर आपला ध्वज लाविला. (शक १५७७, इ.स.१६५५). ही नोंद वरील ५ ओळींत आहे. (?)

: यानंतर, अफजलने विजापुरास चहाडी करून शाहाजी महाराजांवर धरणे आणविले; व पुढेही महाराजांना विजापूर येथे घेऊन जाण्याचे काम त्यानेच केले. या कारणांमुळे त्याच्यावर भोसले-कुलाचा रोष झाला.

अफजलखानाचा वध शिवाजी महाराजांनी कसा केला त्याचे वीररसात्मक वर्णन केले आहे.

: त्यात वादभूत 'बिचवा' या शस्त्राचा स्पष्ट उल्लेख केला आहे :-

: (''अफजल – कक्षस्थलोद्दाल बिछूछालनोछलितरुधिर।'')

: त्यामुळे या पुढे 'बिचव्या'चा वाद तुटला (संपला), असे स्पष्ट म्हणण्यास अडथळा (= प्रत्यवाय) नाही.

: अफजलाच्या रक्ताने सर्वांग भरलेल्या शिवाजी महाराजांना येथे **'नरसिंहा'ची उपमा** दिली आहे ती अत्यंत समर्पकपणें शोभते ! महाराजांच्या प्राणावरील हा बिकट प्रसंग होता. (गोवा, बनवासी, कुंतलेश्वर कदंब राजवंशाची व गुर्जर राजवंशाची आराध्य कुलदेवता 'नरसिंह'ची शक्तिरूपिणी 'नारसिंही' होती. (ताकारीजवळ, कृष्णा नदीपात्रातील मंदिर, इ.स. ११९०, मांजर्डे, 'मंजरवाटक' (=मंजरबाडे गावु), ताम्रपट.)

५. (ओळ ७३ ते ७७) : यांत –

– **''दिल्लीन्द्राभिमाननिधानीभूत-मातुल.. ।''**

– (अशा दिल्लींद्र त्या औरंगजेबाचे अभिमानस्थान **बनलेल्या** त्याच्या मामाचे अर्थात शाहिस्ताखान याचे मर्दन जे थोरले (शिवाजी) महाराजांनी केले त्याचे वर्णन, **पार्थ(अर्जुन)** आणि **जयद्रथ** यांच्यांत घडलेल्या प्रसंगांची उपमा देऊन केलेले आहे.)

६. (ओळी ७७ ते ७९) : यांत थोरले (शिवाजी) महाराज यांनी–

– **''यौवनारंभ गृहीत म्लेच्छ-क्षयदीक्षा''**...

घेतल्याचे स्पष्टच दिग्दर्शित केले आहे.

७. (ओळी ७९–८०) : यांमध्ये औरंगाच्या विनंतीवरून विजापूरच्या आदिलशाहाचे पारिपत्य करून त्यास मांडलिक कसे बनविले, आणि या आपल्या पराक्रमाने औरंगाचा, थोरले (शिवाजी) महाराजांनी कसा **रेंच** (गर्व, तोरा, ताठा, रग, गर्वाचा परिहार करणे, खोड जिरविणे) उतरविला ते सांगितले आहे.

८. (ओळी ८० ते ८६) : यांमध्ये भागानगरकर (कुतुबशहा) शरण आल्यावरून थोरले (शिवाजी) महाराज यांनी त्याला आपल्या कृपेची पांखर घालून, त्याचे सैन्य सहाय्यास घेऊन, सर्व कर्णाटक हस्तगत केले, हा प्रसंग वर्णिला आहे; म्हणजे प्रसंग ४, ५, ६, ७, ८ हे वरील पाच प्रसंग शिवाजी महाराजांचे आहेत; हे सर्व प्रसंग म्हणजे त्यांच्या एकंदर जीवनचरित्राचे सार होत.

९. : (ओळी ८६–८७) : यांमधील प्रसंग अपूर्व आणि आजपर्यंत अज्ञात असा आहे.:–

–**''इंद्रप्रस्थ (दिल्ली)च्या अधिनाथाने (औरंगजेबाने) आपल्यास मल्लयुद्धाची आज्ञा केली; तरीही आपण ती, बालभाव असतानासुद्धा झिडकारून टाकिली.''**

–असे, छ. संभाजी महाराज स्वत:विषयी म्हणतात. शके १५८८ ज्येष्ठ, (इ.स.१६६६) मध्ये संभाजी महाराज नुकतेच वय वर्षे ८ संपून, ९ वे वर्षात पदार्पण करीत होते. त्यावेळीं ते आग्रा–भेटीत श्रीशिवरायांसह नजर–कैदेत होते. ('केवळ दृष्टिबंधन'!). तेथे रामसिंगाने छोट्या राजांना (बाल संभाजींना) औरंगाकडे अधूनमधून नेले असणार. छोटे राजे 'अत्यंत सुंदर' ('सुरत पाक') असल्याने, औरंगजेब त्यांना, पाहण्यासाठी वेळोवेळी आणवीत असेलही, अशा एखाद्या प्रसंगीं, त्याने या 'सिंह–शावक' संभाजींस आपल्या पदरच्या एखाद्या बालमल्लाशी झुंज करावयास सांगितले असेल. पण, बालवयातच **'म्लेच्छ–क्षय–दीक्षा'** घेतलेल्या **'प्रतिज्ञा–दीक्षित'** श्रीशिवरायांच्या या बाल वीर पुत्राने, त्या म्लेच्छ सत्ताधीशाची

आज्ञा लाथाडली होती यात आश्चर्य नाही !
: बहुधा, या वेळेपासूनच औरंगाच्या मनात संभाजी महाराजांच्या विरुद्ध 'और रंग'–धारी चिरस्थायी वैरभाव उत्पन्न झाला असावा. (?)

१०. (ओळी ८७ ते ९६) : यांत, संभाजी राजांच्या –
('तारुण्यसहजप्रकटप्रभावाने' (??), दिपून गेलेल्या दुष्ट दुर्मंत्र्यांनी...''
– आ. बा. जोशी, आबा चांदोरकर, पृ. ३५).

– ''**चक्रवर्तिलक्षणोपेत प्रारब्ध प्राबल्यवैरिभावप्रविष्ट प्रधानादि प्रबल दुष्ट मंत्र्युपदिष्टज्येष्ठपुत्र–राज्याप्रदान दुर्मंत्रदुरभिप्रायाभिप्रेत... ।**''

= (चक्रवर्ती राजाप्रमाणे ज्यांची मनोवृत्ती आहे, चक्रवर्ती लक्षणांनी जे युक्त आहेत, दुर्दैववशात (प्रारब्ध–प्राबल्यामुळे) (संभाजी) राजांशीच वैरभाव पत्करलेल्या, राजप्रमाद, राजद्रोह–प्रमाद (अपराध) स्वरूप मदिरा प्राशिलेल्या प्रधान आदि प्रबळ, दुष्ट मंत्र्यांद्वारें कानभरणीमुळे (त्यांच्या सांगण्यावरून); ज्येष्ठ पुत्राला (संभाजींना) राज्य न देण्याचा दुष्ट सल्ला शिवाजी महाराजांनी मानल्यामुळे ज्यांस (संभाजींस) नानाविध उपसर्ग झाले आहेत, स्फटिक मण्यांप्रमाणे ज्यांचे हृदय स्वच्छ, निर्मळ, पारदर्शी नितळ आहे, जे सौजन्यमूर्ती आहेत; सापत्नभावाने झपाटलेल्या राण्यांच्या क्रोधाला अनुसरून, पित्याच्या कर्तव्याला न जागणाऱ्या छत्रपति शिवराजांचा विचार कळल्यामुळे **'वडिलांची इच्छा प्रमाण'** मानून, पितृभक्तीपासून दूर गेलेले (संभाजी) राजे धर्मपरंपरेने चालणाऱ्या दाशरथी रामाप्रमाणे पराक्रमी, तरीही, – मंत्र्यांची सूचना की, ''ज्येष्ठ पुत्रास राज्य देऊ नये,''– या सूचनेचा लाभ घेऊन, औरंगाचा सेनापती दलेलखान याने संभाजी राजांना आपल्याकडे बोलावून घेऊन, आणि त्यांना सप्तसहस्री देऊन, त्यांच्या साहाय्याने भूपाळगड(गिरी), आणि इतर काही ठाणी घेतली.

११. (ओळी ९७ ते १०४) : यांत, पुढील काळात दलेलाच्या चढेल वर्तनामुळे चिडून जाऊन आणि स्वपत्नीच्या प्रेरणेने; दलेलास मिळवून दिलेली ठाणी पुन्हा परत घेऊन, कुटुंबासह संभाजी राजे हे पन्हाळा गडावर शिवाजी महाराजांना येऊन भेटले; शिवरायांनी संभाजीराजांना क्षमा करून आपले पुत्रवात्सल्य प्रगट केले.

१२. (ओळी १०४ ते १०८) : थोरल्या महाराजांनंतर शंभुराजे, 'छत्रपती' झाले; त्या प्रसंगीं कवि कलशाचे सहाय्य त्यांना थोडेफार झाले.

१३. (ओळी १०८ ते ११३) : शंभुराजांनी मंचकारोहण केले.
: (श्रावण शु. ५, शके १६०२) (शि. च. प्र., पृ. ३०).

१४. (ओळी ११३ ते १२०) : यांत **'संभाजी महाराजांची 'प्रशस्ती'** वर्णिलेली आहे.

१५. (ओळी १२०–१२१) : यांत दानपत्राचा काळ दिला आहे :–

**– 'युग्म–व्योम–रस–इंदु–संवलित समातिक्रांत –**

: (२–०–६–१ = १६०२ शके) नृपशालिवाहन शक रौद्रवत्सर, नभस्य (भाद्रपद), सित (शुक्लपक्ष) दशम (दशमी, १०), इंदुवासर (सोमवार) :

– 'शक १६०२, भाद्रपद शुक्ल १०, सोमवार'.

: (शिवराय राजाभिषेक शक ७ होय.)

**– पुढे दानाचे (नेमणुकीचे) वर्णन आहे.**

१६. शेवटी पांच श्लोकांत या दानपत्राचे महत्त्व सांगताना म्हटले आहे.

**– ''ये पालयन्ति मम धर्ममिमं समग्रं**

**तेभ्यो मया विरचितोंजलिरेष मूर्ध्नि ।।''**

= (''माझे वंशज अथवा अन्य राजाचे वंशज, या पृथ्वीवर भविष्यकाळात होणारे राजे जे या माझ्या समग्र धर्माचे पालन करतील, **त्यांच्यासाठी मी**

**माझ्या शिरावर (मूर्ध्नि) अंजली धारण करतो.'')**

* **(टीप : यामुळेच तर भविष्यात औरंगजेब, संभाजी महाराजांच्या प्राणांचा कराल काळ ठरला नसेल?)**

* *

* : (८.२) : **छत्रपती श्रीसंभाजी महाराज** :
: (जन्मस्थळ : पुरंदर गड, ता. पुरंदर, जि. पुणे.)
: (जन्म, ज्येष्ठ शु. १२, शके १५७९, हेमलंबी संवत्सर, गुरुवार, स्वाती नक्षत्र, घटिका १० (दहा) : (ता. १४ मे १६५७)
: (निधन, फाल्गुन वद्य ३०, शके १६१०, विभव संवत्सर. (११ मार्च १६८९) समाधी – वढू बुद्रुक, तुळापूर; ता. हवेली, जि. पुणे.

❒ ❒

## * विभाग ३ रा : परिशिष्टे :

(लेखनकाल : शके १५७९, वैशाख – ज्येष्ठ. इ.स. १६५७, मोगलांशी पहिला संघर्ष, नौसिरखान सेनापतीस बुडविले.)

– छत्रपति श्रीशिवाजी महाराजांचे **'मोडी लिपीतील हस्ताक्षर'** :

**आणि 'श्रीशिवरायांची साक्षरता'**

१/ छ. श्रीशिवाजी महाराजांच्या उपलब्ध हस्ताक्षराविषयी पुढील साधनांत विस्तृत विवेचन व सांगोपांग ऊहापोह वाचावा.–

(१) – ''उपन्यास, पृ.८–, **'श्रीशिवशाहीचा लेखनालंकार'**, – १३, पृ. २५–३३ विवेचन व छायाचित्र.
: संपा. – आ. बा. जोशी, आबा चांदोरकर, १९३४ इ.स.

(२) ''भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे – ३०, त्रैमासिक, – (वर्ष २ रे, अंक १ ते ४).

(३) 'साधनचिकित्सा', वा. सी. बेन्द्रे, पृ. ८९,– परिच्छेद १६ वा,

२/ एक पत्र जे उपलब्ध झाले त्याचे छायाचित्र–मुळाच्या पाऊणपट मापात घेतलेले, 'लेखनालंकार' (१९३४ मध्ये) छापलेले आहे.

३/ छ. शिवाजी महाराजांची 'राजमुद्रा' : (संस्कृत) : (अष्टकोणी) :

– **''प्रतिपच्चंद्रलेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता ।**
**शाहसूनोः शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते ।।''**

**

*** : (८.२) : शंभुराजांचे पुत्र 'शिवराज' ('शाहू') महाराज यांची मुद्रा :**

**– '' ।। श्रीवर्धिष्णुर्विक्रमैः विष्णोः सा मूर्तिरिव वामनी**
**शंभुसूनोरसौ मुद्रा शिवराजस्य राजते ।।''**

:(शके १६४० कार्तिक वद्य २. : /१८–११–१७१८)

: (मराठ्यांच्या इतिहासाची साधने/शिक्काल/संपा. प्र.न. देशपांडे/२००३)
: (पृ. १३१)/लेखांक १०२):

## * छत्रपती संभाजीराजांचे एक दानपत्र : एक विवेचक अभ्यास –

**मावजी** व पारसनीस **यांच्या** ‘सनदापत्रांतील **माहिती**’ या ग्रंथात काही **संस्कृत दानपत्रे** छापली आहेत, ती अभ्यासूंनी पाहण्यासारखी आहेत. त्यांत पृ. १ ते ६ वर आरंभीची दोन आणि पृ. २११ ते २१७ वर नंतरची चार अशी एकूण सहा दानपत्रे आहेत. या सहाही दानपत्रांच्या आरंभी **‘नमस्तुंग’** हा श्लोक आहे. ती सर्व, छत्रपति राजाराम यांच्या नांवची आहेत. त्या सर्वांत **भोसले वंशजांचे ‘वंशकथन’** आलेले आहे.

प्रस्तुतच्या दानपत्राचा उल्लेख **डॉ. सौ. कमल गोखले यांच्या ‘शिवपुत्र संभाजी’** (पुणे, १९७१) या ग्रंथात पृ. ४३२–३४ वर आलेला आहे. राज्यपद मिळविण्यात आलेल्या अडचणी दूर होऊन ते मिळाल्यावर, तत्संबंधी पूर्वी संकल्प केल्याप्रमाणे संभाजी महाराजांनी जे दान दिले ते या दानपत्रात ग्रथित आहे. यावर **‘श्री शंभोः शिवजातस्य’** ही राजमुद्रा आहे.

या दानपत्रातील विशेष उल्लेखनीय नांवे व वाक्यांश अधोरेखित केले आहेत.

१. **‘विजयपुराधीश्वरभागानगरेशादिछत्रपतिप्रार्थ्य.... शिवराजपुत्रेण’ :**
= विजापूर व गोवळकोंडा येथील सुलतानांनी प्रार्थना केल्यामुळे, ज्यांनी पठाणादींनी जिंकलेला कर्नाटक प्रांत आपल्या ताब्यात आणला, अशा **‘भृशबल’ म्हणजे भोसले कुलाला चंद्राप्रमाणे असणारे जे शिवाजी महाराज त्यांचा मुलगा, (संभाजी).**

२. **‘दलेलासुर’ : (दलेल नांवाचा असुर).**
म्हणजे दिलेरखान.

३. **'युग्मव्योमरसेंदु' :**

युग्म = २, व्योम = ०, रस = ६, इंदु = १. यांची 'अंकानां वामतो गतिः' या एका रिवाजाप्रमाणे १६०२ अशी संख्या येते, शालिवाहन शक १६०२. त्या वर्षी दानपत्रात लिहिल्याप्रमाणे त्याशी जुळता रौद्र संवत्सर येतो. (अंक उजवीकडून डावीकडे वाचावेत)

नभस्य = भाद्रपद, सित दशमी = शुद्ध दशमी, इंदु वासर = सोमवार,

–या दिवशी सूर्योदयाला **नवमी** होती. पण त्याच दिवशी पुढे **दशमी** लागली. म्हणून येथे दशमीचा उल्लेख ठीकच आहे. त्या दिवशी संभाजींच्या हातीं मराठी राज्य पक्केपणें आले. म्हणून त्यांनी ज्या सुलतानी **वराहा**मध्ये (पादशाही '**होना**'मध्ये) २४ गुंजा (कृष्टल) शुद्ध सोने होते, असे दहा हजार **वराह (होन)** देण्याचा संकल्प सोडला. ''ते महाशय स्वामीच्या पुत्रपौत्रांनी वर्षानुवर्षे भोगावे,'' असे दानपत्रात म्हटले आहे.

या दानपत्रावर राजाभिषेक वर्ष ७, भाद्रपद, शुद्ध त्रयोदशी, शुक्रवार, या दिवशीं अमात्य रघुनाथ नारायण (हणमंते) ह्यांनी **'लेखनालंकार'** हा शेरा मारला व हे **'दानपत्र'** अधिकृतरीत्या पुरे झाले.

* *

*** : (८.१) : दानपत्राचे स्वरूप :**

– हे दानपत्र जामदग्न्यगोत्री, आश्वलायनसूत्री, ऋग्वेदांतर्गत शाकलशाखाध्यायी कऱ्हाडे ब्राम्हण, कुडाळ येथील नगर–उपाध्याय, 'बाकरे' या आडनांवाचे, नामदेवभटाचे पुत्र, महाशय, सर्व मांत्रिकांत श्रेष्ठ, यांना छ. संभाजींनी दिलेले आहे. या दानपत्राच्या वाचनात, डॉ. श्री. ल. आठलेकर यांचे साहाय्य झाले. या दानपत्राचा मराठी गोषवारा 'शिवपुत्र संभाजी', डॉ. कमल गोखले, या ग्रंथात दिला आहे. हे दानपत्र – लांबी ३०० सेंमी. (३ मीटर), रुंदी २३.५ सें.मी.चे आहे. ५० सें.मी. लांबीचा एकेक कागद, असे ६ (सहा) कागद आहेत. पांच ठिकाणीं ते कागद जोडलेले आहेत. दानपत्राचा कागद चिवट व उत्तम जातीचा आहे. त्यावरील हस्ताक्षरही ठसठशीत, मोठे व वळणदार आहे. दानपत्रावर बाजूने वेलबुट्टी काढलेली आहे. जागोजाग फुलांची चित्रे ठशांच्या रूपाने त्यावर उमटविलेली दिसतात. * *

## ❒ 'समयनय' : ग्रंथ

### 'श्रीभोसलवंशभूषणमणि' छ. श्रीसंभाजी महाराज यांच्याविषयी गागाभट्टांच्या सदिच्छा !–

– गागाभट्ट यांनी (१६८०) **'समयनय'** हा ग्रंथ (श्लोकसंख्या २६८), इ.स. १६८०/ शके १६०२ मध्ये लिहिला व तो त्यांनी छत्रपती श्रीसंभाजी महाराजांना अर्पण केला आहे, आणि, ''तो ग्रंथ संभाजींच्या आनंदास, कृपेस कारणभूत होवो,'' असे गागाभट्ट म्हणतात. त्यांपैकी ते ३ श्लोक पुढीलप्रमाणे:–

**''–सिंहासनच्छत्रधराधिराजराजाधिराजैकशरण्यभूत: ।**
**शंभु: स्वयंभु:प्रभुरस्तु तुष्ट:**
**स्फुरत्प्रतापोज्ज्वल दिग्विभाग: ।।२।।**
**दिनकरतनयेन तेन गागाभिधविबुधेन**
**निरीक्ष्य सन्निबंधान् ।**
**रघुवरकृपयाऽमुना निबद्ध:**
**'समयनय:'सुखमेतु शंभुराज: ।।२६७।।**
**शाके, 'दस्रवियद्रसक्षिति' मिते रौद्राभिधे वत्सरे ।**
**विश्वामित्रकुलारविंदतरणिर्गागाख्यसूरि: कृती ।।**
**श्रीमद्भोसलवंशभूषणमणे: शंभो सितच्छत्रप्रस्था–**
**स्वानंदाय सदा भवेदशिथिला**
**कीर्त्यै प्रसादाय च'' ।। ।।२६८।।**

= सिंहासनाधिष्ठित व राजछत्र धारण करणारे, श्रेष्ठ अधिराज व राजाधिराज (सम्राट, सार्वभौम, चक्रवर्ती) यांचे एकमेव आश्रयस्थान असलेले, ज्यांच्या तळपणाऱ्या पराक्रमामुळे सर्व दिशा उजळून गेल्या आहेत, असे स्वयंभू राजे शंभू अर्थात् छत्रपती श्रीसंभाजी महाराज संतुष्ट होवोत !

– दिनकरांचे पुत्र बुद्धिमान गागाभट्ट यांनी इतर काही ग्रंथांचे अवलोकन, अभ्यास करून प्रभु श्रीरामचंद्रांच्या कृपाशीर्वादाने 'समयनय' (हा तिथिनिर्णयविषयक) ग्रंथ तयार केला, लिहिला. त्या ग्रंथामुळे शंभुराजे (संभाजी राजे) आनंदी

होवोत.

– शालिवाहन शके १६०२ मध्ये, रौद्र नामक संवत्सर वर्षी, विश्वामित्र–गोत्ररूपी कमलपुष्पाला सूर्याप्रमाणे असणाऱ्या गागाभट्ट यांनी रचिलेला 'समयनय' हा ग्रंथ धवल (श्वेत) पांढरेशुभ्र राजछत्र धारण करणाऱ्या, भोसले घराण्याला ललामभूत (भूषण, गौरव) असणाऱ्या अशा छत्रपती श्रीसंभाजी महाराजांच्या आनंदासाठी, कृपेसाठी हा 'समयनय' ग्रंथ कारणीभूत होवो, व त्यामुळे त्यांना चिरंतन कीर्ती प्राप्त होवो. : (श्लोक २६७ व २६८)

*** प्रस्तुत ग्रंथरचनेच्या शालिवाहन शक या वर्षाचे स्पष्टीकरण–**

– ''शाके, 'दस्र वियद्रसक्षिति' मिते, चा अर्थबोध – **दस्र वियत् रस क्षिति मिते ।**

: दस्र म्हणजे अश्विनौ, देवांचे वैद्य. ते जुळे, म्हणून दोघे आहेत. त्यांचे अंकमूल्य = २.

: वियत् (= आकाश) = ० (शून्य) हे अंकमूल्य.

: रस (= षड्रस/६ रस) = ६ हे अंकमूल्य.

: क्षिति (= पृथ्वी) = १ हे अंकमूल्य.

म्हणून दस्र = २, वियत् = ०, रस = ६, क्षिति = १ = २०६१ ही संख्या येते.

१) अशा कालोल्लेखातील अंक उजवीकडून डावीकडे असे वाचावेत, 'अंकानां वामतो गतिः ।', असा एक नियम आहे. प्रत्येक वेळी अंक असेच वाचावेत असा मात्र नियम नाही, व वहिवाटही नाही. (उदा. संभाजी महाराजांच्या जन्माचा शालिवाहन शक सांगणाऱ्या शब्दांची अंकमूल्ये पाहा. पृ. ९ वर). येथे '१६०२' हा शालिवाहन शक आपणांस वरील चार शब्दांच्या अंकमूल्यांतून मिळतो.

२) शालिवाहन शके १६०२ या वर्षी 'रौद्र नाम संवत्सर' होता, असे श्लोकात म्हटले आहे. पंचांगाप्रमाणे शालिवाहन शक १६०२ या वर्षी 'रौद्र' संवत्सर होता, म्हणून येथे शक व संवत्सर हे परस्परसुसंगत आहेत.

* *

: (**'समयनय'**, – गागाभट्ट, १६८०. संपा. : **डॉ. प्र. ग. लाळे आणि अन्य ३.** प्रका. भारतीय इतिहास संकलन समिती, महाराष्ट्र. (पुणे–३०). (गुढीपाडवा, ५ एप्रिल २०००).

* *

## ■ राजे रामसिंहांस छ. संभाजींचे एक पत्र : (संस्कृत)

### छ. संभाजी महाराजांची एक अतर्क्य अशी

### महान साहसपूर्ण योजना :

**:(की, जी पूर्णपणें व तीच त्यांच्याच परिणामीं स्वप्राणांवरही बेतली?):**

– संभाजी महाराजांनी राजपूतांना औरंगजेबाविरुद्ध प्रतिकार व स्वत्वरक्षणासाठी उठविण्याचा प्रयत्न केला होता. इ.स. १६८२ मध्ये त्यांनी मिर्झा राजा जयसिंहाचा मुलगा रामसिंह यांस त्या संदर्भात लिहिलेल्या, एका संस्कृत तेजस्वी पत्रात त्यांनी तसेच सुचविलेले होते. ते मूळ 'संस्कृत' पत्र, व त्याचा मराठी अनुवाद पुढीलप्रमाणे आहे :–

**✻ छत्रपति संभाजी महाराजांचे (संस्कृत) पत्र :**

**राजा रामसिंग यांस – ✻ (नोव्हें. १६८२ मध्ये लिहिलेले पत्र.) ✻**

| | |
|---|---|
| **– ''रामराम राजमान** | – ''रामराम राजमान– |
| **राजमान–महाराज** | राजमान–महाराज |
| **रामसिंहवर्म–** | रामसिंहवर्मा ! |
| **महाशयेषु ।। ० ।। र्छ ।।** | महाशय यांसी ! |
| **श्रीमद्रमारमण–** | श्रीमद्–रमा–रमण श्रीविष्णु– |
| **चरण–परिचरण–** | चरण–सेवा–परायण– |
| **परायणांऽत:करण** | अंत:करण–प्रवृत्तीमुळे |
| **तावाप्त–** | लाभलेले |
| **वैभवभावसंभावना** | वैभव आणि भक्तिभाव |
| **संभाविताऽ–** | यांमुळे प्राप्त झालेल्या तेजोविशेषाने अलंकृत |
| **शेषविशेषधामधौरेयेषु** | |
| **विविधवर्णाश्रम** | विविधवर्णाश्रमधर्मावर |
| **संकीर्णधर्म–** | घाला घालणाऱ्या |
| **शर्मविघटकदुर्मददंडदर्प–** | दुष्ट प्रवृत्तिरूप सर्पांचा संहार करणाऱ्या |
| **सर्पापसर्पणनिर्घृणसुपर्ण–** | क्रूर गरुडाशी साम्य असणारे |

| | |
|---|---|
| सवर्णवर्णेषु | स्वत:च्या (क्षात्र) वर्णामध्ये (असलेले) |
| धीरोदात्त वीरासाधारण– | धीरोदात्त असाधारण वीर |
| प्रविदारण दुर्निवारण– | ज्यांनी केलेल्या आक्रमणाचा |
| प्रतिभटोद्भट– | प्रतिकार करणे कठीण. |
| धरा परिदृढवारणविदारण– | शत्रूचे पारिपत्य करणारे, |
| निष्ठुरविस्त्रिं | भूमि–तलाव, व नि:संकोचपणें संचार करणाऱ्या |
| शकरजकठोर– | हत्तींचे गंडस्थळ फोडणारे/फाडणारे धारदार |
| भैरवरवकंठीरवेषु– | तलवारीप्रमाणे किंवा व्याघ्र–वाघनखांसारखे |
| अनन्य सामान्य– | संहारक, प्रचंड गर्जना करणाऱ्या सिंहाजसे, |
| सौजन्यवदान्यता | विलक्षण सौजन्य आणि औदार्य |
| वशीकृतमान्य– | यामुळे ज्यांनी प्रतिष्ठित सज्जनांना |
| जन–तन्यमान धन्य– | आपलेसे केलेले आहे, |
| भावानुभावन्मूर्धन्येषु– | असे धन्य, मान्यताप्राप्त सज्जनांमध्ये श्रेष्ठ. |
| (१) सदुचित समुपचित– | (१) अत्यंत सद् उचित आणि स्वसंपादित |
| गुणरत्नधाम– | अशा अगणित गुणरत्नांची खाण असलेल्या |
| स्नेहाभिलाषी– | महाशय यांसी, आपल्या स्नेहाची अभिलाषा |
| श्रीशंभुराजवर्म | बाळगणाऱ्या श्रीशंभुराजवर्मानृपती यांच्या |
| नृपविहितवचन– | सांगण्यावरून (वचनावरून) |
| निवेदनमद: | येथील कुशल निवेदन करणारे हे पत्र, |
| पत्रमत्रत्यभव्यभव्या | आपणांकडे आपल्या नजरेखालून जावे, |
| वेदनपूर्वकं | यासाठी पाठविण्यात येत आहे, |
| श्रीमद्गोचरं तदेव पृच्छति, | आपल्या कुशलाचीही विचारणा |
| | (प्रतीक्षा) करीत आहोत. |
| (२)यदुतश्रीमद्भि | (२)आपले पत्र मिळाले. |
| र्लिखितं, स्वमनसि | आपण आपल्या मनातील भाव |
| एवं स्थितं, | पत्राने कळविला आहे; |
| | तो असा की,– |
| यद्दिल्लींद्रेण साकं | : ''मी, (औरंगजेब) बादशहास |
| विरोधो न विधेय:, | विरोध करू नये; |
| तस्य महत्त्वमेव | त्याचा मान राखावा, |

| | |
|---|---|
| **पालनीयं,** | आणि त्याचे सार्वभौमत्व मान्य करावे;'' – असेही आपण पत्रात सुचविले आहे. |
| **(३)तदनु कुमार कृष्णसिंहस्य तादृश्यवस्था** | (३) आपला राजकुमार (पुत्र) कृष्णसिंह याने शाहजादा (सुलतान–?) याजबरोबर कारस्थान केले. : परिणामीं कृष्णसिंहाची बादशहाच्या सांगण्यावरून |
| **सुरत्राण–संकेत–निष्पन्नेति,** | कशी अवस्था झाली, त्याचा सर्वनाश कसा झाला, हे आपणांस कळलेच आहे. |
| **निपुणं विज्ञाय,** | * (कृष्णसिंह हा परिंडा मुक्कामीं, एका स्त्रीच्या प्रकरणावरून एका अफगाणाच्याकडून मारला गेला. (१० एप्रिल १६८२). : पण, हे औरंगजेबाच्याच सांगण्यावरून झाले असावे, अशी त्यावेळीं बातमी उठली होती.) |
| **: कंचिद्राजकार्यविषयं मनसि कृत्वाऽस्माकं स्तुतिपुर:सरं पत्रं प्रेषितं,** | :राजकीय परिस्थितीचा पूर्ण विचार केल्यानंतर काही राजकार्याचा हेतू मनात धरून आपण आम्हांस आदर–स्तुतिपूर्वक पत्र पाठविले आहे की, |
| **:यदकबर: सुरत्राण: स्वसविधे स्थापित: इदमुचितमेव कृतं श्रीमद्भिर्–अस्माकमपि संमतमेतत्,** | : '' अकबर शाहजादा (सुरत्राण=सुलतान) याला तुम्ही तुमच्या राज्यात आश्रय दिलात, ही फारच चांगली गोष्ट केलीत. :तुम्ही अंमलात आणीत आहात ते धोरण मलाही मान्य आहे. |
| **वयं हिंदूका:, अस्मान् भवन्तो** | :आपण सगळे हिंदूक आहोत. म्हणून या परिस्थितीत जे काही करणे योग्य व |

| | |
|---|---|
| यदाज्ञापयन्ति,<br>**तदवश्यं विधेयं, इति ।** | आवश्यक आहे, असे तुम्हांस वाटेल,<br>जे करण्याची आज्ञा आम्हांस कराल ते करण्यास,<br>मी (रामसिंह) अवश्य तयार आहे.'' |
| **(४)** | (४) |
| –''तर्हिप्रकृतविषये<br>श्रीमद्भिर्मुख्यताम्<br>**अवलंब्यै–** | ''हा जर तुमचा उद्देश असेल तर–<br>या कामात तुम्हीच मुख्यत:<br>पुढाकार घ्यावयास पाहिजे. आणि– |
| **तस्य यवनाधमस्य<br>सांप्रतं** | त्या यवनाधमाला (औरंगजेबाला<br>सांप्रत असे वाटू लागले आहे की,) – |
| **सकल हिंदूका:**<br>सत्त्वशून्या: | : ''आम्ही सर्वच हिंदूक म्हणजे–<br>तत्त्वहीन सत्त्वशून्य झालो आहोत.'' |
| श्रीप्रासादभंगादि<br>धर्मोप्लप्लवेऽपि | :आमच्या देवालयांचे विध्वंस झाले तरीही, –<br>आम्ही धर्माभिमानशून्य<br>झालो आहोत, धर्माचरणशून्य बनलो आहोत, |
| **स्वधर्मरक्षणाक्षमा:**<br>स्वधर्महीना **इति,''**<br>मन्यमानस्योत्कर्षं, | आम्ही स्वधर्मरक्षण करण्यास असमर्थ,<br>दुबळे आहोत.''–<br>: आणि म्हणूनच त्याची भरभराट होत आहे. |
| **तथा,<br>'क्षत्रिय'** शब्दाभिधेय–<br>**विपर्यं, तथा–<br>श्रुती स्मृति/सिद्ध<br>(वर्णाश्रमधर्म)** | :परंतु आम्ही आमच्या उत्कर्षाला<br>व 'क्षत्रिय' अभिधेय/संबोधन–<br>शब्दाला, क्षात्रधर्माला कमीपणा आणणारी<br>कोणतीही गोष्ट मान्य करणार नाही.<br>:प्रत्येकाचा धर्म आणि |
| प्रजापालरूपराजधर्म–<br>विप्लवंचासहिष्णव:, | 'प्रजा–पालनरूप राजधर्म' यांना पोहोचणारी<br>हानी आम्हांस सहन होत नाही/<br>सहन होणार नाही.<br>: 'राजे' म्हणून आम्ही आमचा 'प्रजापालन' हा<br>'राजधर्म' टाकून देऊ शकत नाही. |
| **स्व–कोश–** | : या दुष्ट यवनांशी युद्ध करण्यात |

| | |
|---|---|
| | आम्ही आमचे धन-कोश (खजिने/धनराशी/ संपत्ति संग्रह), |
| देश-दुर्गादिषु | आमचा देश, आमचे दुर्ग |
| विधृतानदरा, | इत्यादी सर्व काही (प्रसंगीं प्राणही) पणास लावण्यास तयार आहोत. |
| दुष्ट्यवनाधिप | : त्या दुष्ट यवनाधि पतीशी वैर साधणे |
| प्रतिद्वंद्वितयैव- | : या दृढ उद्देशानेच आम्ही गेली दोन वर्षे |
| अकबर-दुर्गादासौ | अकबर आणि दुर्गादास दोघांनाही |
| वर्षद्वयपर्यन्तं | आमच्या देशात स्वदेशात/स्वराज्यात |
| स्वदेशे स्थापितौ, | आश्रय दिला आहे. |
| यवनाधिपसंबंधिन: | :आम्ही, यवनाधिपतीच्या |
| सेनानायका मारिता:, | अनेक सेनानायकांस वधिले आहे. |
| केचित्कारागृहे स्थापिता:, | कित्येकांस कारागृहांत टाकिले आहे. |
| केचिद् द्रव्यं गृहीत्वा | काहींना खंडणी घेऊन सोडले आहे. |
| मोचिता:, | तर काहींना दयाधर्मापोटीं सोडले आहे. |
| केचिद् धर्मेण, | काहींनी आमच्या सैनिकांना लाच चारून |
| केचिदस्मत्सैनिकाना | आपली सुटका करून घेतली आहे. |
| मुत्कोचं दत्वापयाता:, | :अशा प्रकारें त्याचे (औरंगजेबाचे) |
| एवं विधा तत्सेनानायका: | सेनानायक सर्वत्र कुचकामी ठरले, |
| अप्रयोजका:, अस्मिन्समये | (बिनकामाचे ठरले.) |
| यवनाधम:कारागृहस्थो | :आता अशी वेळ आली आहे की, त्या |
| विधेय:, | यवनाधमाला (औरंगजेबाला) पकडून |
| | कारागृहात घालणे शक्य होईल. |
| श्रीस्थापनादय: सर्वेऽपि | :मग आपल्याला देवतांची पुन:स्थापना करून, |
| धर्मा: प्रवर्तितव्या, | धर्मकर्मेनिर्विघ्नपणें पार पडतील |
| इति मनसि धृत्वा, | अशी व्यवस्था करता येईल. |
| तदनुकूलमाचराम | आणि हे सगळे लवकरच |
| इति विदां कुर्वन्तु | करण्याचे आम्ही मनाशी ठरविले आहे; |
| तत्रभवन्तो भवन्त:। | याची आपण खात्री बाळगावी. |

| | |
|---|---|
| **(५) किंच वयं भवत्समक्षं अल्पवयस: स्थितास्तदा** | (५) पण, आपल्या मानाने आम्ही अल्पवयी व अननुभवी आहोत. |
| **श्रीमतां स्वधर्मपक्षपात शौर्यादयो गुणा: श्रुता: दृष्टाश्च,** | :आपल्या, धर्माभिमानाच्या आणि शौर्यादिगुणांच्या अनेक गोष्टी, कीर्तिवार्ता ऐकल्या आहेत, पाहिल्याही आहेत. |
| **:इदानीं तु यूयं सप्तांगराज्यसंपन्ना:** | :तुम्ही यावेळी सप्तांग राज्यसंपन्न आहात. |
| केवलंधैर्यम् **अवलंब्यास्मदारब्ध:** | :तुम्हीही यावेळी केवळ पूर्ण धैर्य आणि साहस अवलंबिलेत तर, |
| यवनोच्छेदायोपयुक्ता **भपिष्यथ चेत्,** | आणि या यवन औरंगजेबाची शक्ती नष्ट करण्याच्या कामात आम्हांला मदत केलीत तर, |
| **किं किं न भवेत्?** | आपण (उभयपक्षी) काय करू शकणार नाही? – (काय काय घडू शकणार नाही?) |
| **एवं सति,** | : या गोष्टीचा आम्ही विचार करतो आहोत; तेव्हा– आपण मात्र, |
| **स्वधर्मत्यागेन तूष्णीं भावमापन्ना, इदमतीवाश्चर्यमस्माकं विधत्ते।** | : अशा प्रसंगी स्वधर्माभिमान व धर्मकर्तव्ये सोडून गप्प बसून राहिलेले आहात ! हे पाहूनही या गोष्टीचे आम्हांस आश्चर्य वाटते ! |
| **(६)अन्यञ्च हाडा** दुर्जनसिंह**: कीदृक् ?** | (६) ''आणखी एक गोष्ट, (अशीआहे की);– दुर्जनसिंह हाडा हा कशा प्रकारचा माणूस आहे आणि– |
| **तस्य कोशादि सर्वं** भवद्भिरस्माभिश्च **ज्ञायता एव।** | त्याचे सैन्यबल, कोश आदि सर्व काही हे आपणां दोघांनाही पूर्णत: माहीत आहे. |
| **:परंतु तेन कोशादिस्थाने धैर्यमेव मत्वाऽ** स्मल्लिखितानुसारेण | : परंतु, त्याने आपल्या संपत्ती आदींवर सर्वथ: पाणी सोडले, आणि आमच्या सूचनेस अनुसरून त्याने स्वत:चे शौर्य |

| | |
|---|---|
| **कथमुवप्लवो विहित:,** | गाजवून धामधूम उडवून दिली. |
| **स भवद्भिरदूरवर्तिभि: श्रुत एवास्ति,** | :तुम्ही तर तिकडच्याच भागात असल्याने तुम्हीही हे ऐकलेच असेल. |
| | * (बुंदीचा राजा दुर्जनसिंह हाडा याने औरंगजेबाविरुद्ध बंड केले होते. पुढे तो एका लढाईत मारला गेला.) |
| **:इतोऽस्माभिर्विधीयते यत्तत् विधीयत एवेदानीं अकबर** | : इकडे आम्ही (छ. संभाजी महाराज) अकबर आणि |
| **दुर्गादासौ** | दुर्गादास यांना |
| **गुर्जरदेशं प्रति प्रेष्येते** | गुर्जरदेशात पाठविण्याच्या विचारात आहोत. |
| **तर्हि, श्रीमद्भि धैर्यावष्टंभेन यत्कर्तव्यं तद्वश्यं विधेयम्।** | : तरी आपणही यावेळीही जे जे काही करता येणारे कर्तव्य करणे आवश्यक आहे, ते ते धैर्यपूर्वक जरूर करावे. |
| **(७)पठाणाधिप:शहा आबास नामकै:** | (७) पठाणांचा प्रमुख अधिपती (इराणचा शहा) अब्बास नांवाचा, याने– |
| **अकबरस्यांगीकारपूर्वकं पत्रं प्रेषितं,** | ''आपण अकबराला मदत करू'',– असे लिहिले आहे, (त्याने पत्र पाठविले आहे.) |
| **:तथापि, यवनस्यैतादृशं** | : पण, याबाबतीत आपण यावनांची मदत घ्यावी, आणि |
| **यशोदेयमिति** | यशाचे श्रेय त्यांना मिळवून द्यावे |
| **अनुचितमिति,** | हे आम्हांस अनुचित वाटते. |
| **यथा–** | जसे– |
| **श्रीमत्पूज्य महाराजैरयमेव** | आपले श्रीमत् पूज्य पिताश्री महाराज (जयसिंह मिर्झा राजे) |
| **यवनाधमो दिल्लीश्वर: कृत:** | यांनी यवनाधम औरंगजेब याला 'दिल्लीश्वर' बनवून त्या कृतीचे |
| **यशो गृहीतं,** | श्रेय संपादन केलेच ना? |
| **तथापि, श्रीमद्भिरपि अकबरसाहाय्येन यशो ग्राह्यं,** | : त्याप्रमाणेच, आपणही अकबरास मदत करून त्याच यशोश्रेयाचे धनी व्हावे. |

| | |
|---|---|
| **हिंदुस्थानस्यैते सुरत्राणा:** एतत्स्थापने यवनाश्चेन्मुख्या:, **तदा तेषामेव प्राधान्यं स्यात्**, अतस्तद्व्यतिरेके अस्माभिर्भवद्भिश्चा **कबर: सुरत्राणो विधेयस्तेन स्वधर्मरक्षणं भविष्यति, भवतां च महाराज जयसिंह–वंशं शोभविता।** | : यवनांच्या मदतीने अकबराला 'हिंदुस्थानचे सुलतानपद' (राजपद) लाभले तर त्यांना मात्र प्राधान्य लाभेल; अर्थात ही गोष्ट आपण होऊ देऊ नये. : आपण दोघांनी एक होऊन अकबर सुलतानास सत्तेवर बसविले तर, 'स्वधर्मरक्षणाचे कार्य' होईल, आणि, आपल्या या कार्याने महाराज जयसिंहांच्या वंशाला विशेष शोभा येईल ! |
| (८) **'सविस्तरं च** श्रीमत्कविकलशपत्रात् **तथा,** श्रीमज्जनार्दन पंडितपत्रात् प्रतापसिंहमुखवचनेभ्य: चारमुखेभ्यश्चावगंतव्यं, | (८) ''सविस्तर असे सर्व काही,– **माझे मंत्री कवि कलश** यांच्या जवळील पत्रातून आणि **जनार्दन पंडित** हेही (स्वतंत्र) पत्रातून (स्वत:च) तुम्हांस सविस्तर वेगळे लिहीत आहेतच; आमच्या **दूतांच्या**, अर्थात **प्रतापसिंह** यांच्या तोंडीबोलांवरूनही आपल्याला सगळा तपशील कळेल. ते आपल्याला भेटतीलच. |
| **निरंतर स्वकुशललेखनेना– नंदनीया वयमिति। किं बहुलेखन पल्लवितेन** विज्ञधुरंधरेषु ।।'' | : आपले कुशल निरंतर वरचेवर लेखनाने कळवीत असावे; ते आम्हांस (आनंद देणारे) मोदप्रद होणारच आहे. धुरंधर जाणकाररांस यापेक्षा आणखी येथे (या पत्रात) अधिक ते काय लिहावे? काय लिहिणे? सर्व गोष्टी आपणांस विदित आहेतच.'' |

* *

# १२. छत्रपति श्रीसंभाजी महाराज : राजाराम व शाहू महाराज :

## – (कवि पुरुषोत्तम बंदेष्टी/१८२१ इ.स.)

### 'छ. संभाजी महाराज'; : (एकूण १४ श्लोक) :

६.१ ते ९) ६.६६, ६७, ६८/७.१/ = ७.१ पाठभेद. (श्लोकांक/६.१) :
('अध्याय' या अर्थाने, 'चमत्कार' हा शब्द कवीने वापरला आहे.)

क्र. विषय :

१/ संभाजी राजे सत्तेवर आले.

२/ सर्व प्रकारची समृद्धी होती.

३/ संभाजी राजे सर्वांचे रक्षणकर्ते होते; दानशील होते.–
: कर्णाच्या दानशीलतेलाही त्यांनी जिंकले होते.

४/ प्रजाजनांच्या स्त्रियाही शुद्ध चारित्र्यवान होत्या.–
कोठेही बालमृत्यू होत नव्हते.

५/ सर्व प्रजा संभाजींच्या जिवापाड रक्षणाची इच्छा बाळगीत होती.

६/ संभाजींच्या लोकोत्तर कार्यांनी व त्यांची गुणग्राहकता लक्षात घेऊन सर्व देव–समूह व प्रजाजन हर्षित झालेले होते.
: (राज्याच्या ७ प्रकृतीचे विवेचन) :

७/ नीतिशास्त्रज्ञात्या संभाजींची पत्नी त्यांची देवाजशी पूजा करीत असे.

८/ संभाजींच्या अद्वितीय, अनुपम सौंदर्याचे वर्णन.

९/ संभाजींनी अनेक शत्रूंना एका पाठोपाठ एक असे वठणीवर आणले.
: विष्णू व शिव यांच्या भक्तीने त्यांच्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या होत्या.

१०/ आठ वर्षे राज्य केल्यानंतर संभाजींचे निधन झाले.

११/ संभाजींनी आपला देह तुळापूर येथे त्यागिला.
(फाल्गुन वद्य ३०, अमावास्या, शके १६१०, इ.स. १६८९)

१२/ (छ. राजाराम महाराज) :

१३/ (शाहूंचा जन्म) :

१४/ (शाहूंचा जन्म, पाठभेदाचा श्लोक) :

* *

(१) : (छ. श्रीशिवराय–पुत्र श्रीसंभाजी महाराज सत्तेवर आले.) :–

**– दिवमिते जनके जगतीपतिर्जनित हर्षभरः सततं नृषु।**

**मदनदेव समानवपुः प्रभुः प्रथितकीर्तिरपालयदुर्वराम् ।। ६.१ ।।**

= पिता (छ. श्रीशिवाजी महाराज/चैत्र शु. १५ शके १६०२ रौद्र संवत्सर/इ.स.१६८०) स्वर्गवासी झाल्यानंतर श्रीसंभाजी महाराज पृथ्वीपती झाले. त्यामुळे इतर राजांना अतिशय आनंद झाला. त्यांचे शरीर मदनाजसे सुंदर होते. त्या राजांची कीर्ती दूरवर पसरली. त्यांनी सुपीक अशा पृथ्वीवर राज्य करण्यास प्रारंभ केला.

(२) : (सर्व प्रकारची समृद्धी होती.) :

**–अवति शंभुनृपे न धनागमो न जलदो, जलदो न वसुंधरा।**

**फलति धान्यचयो न च मद्गृहे न मनसापि जगाद जनस्त्विदम् ।।६.२।।**

= महाराज श्रीशंभुनृपतींनी (शिवाजीपुत्र संभाजींनी) पृथ्वीचे पालन करण्यास सुरुवात केली. त्यावेळीं, कोठलीच धनप्राप्ती झाली नाही; किंवा मेघांनी पाणी देणे सोडून दिले; किंवा भूमीतून काहीच उपज झाली नाही तरी ''माझ्या घरात धान्याचा साठा होत नव्हता.''– अशा तऱ्हेचे शब्द कोणी मनातही उच्चारीत नव्हते. (म्हणजेच घरोघरीं सर्व प्रकारची समृद्धी होती, आणि ती वाढत होती.) : (६.२)

(३) : (संभाजी राजे, सर्वांचे रक्षणकर्ते होते.) :

**– द्विजकुलं सकलं सकलं सदा परिररक्ष निरक्षरपोषकः।**

**वितरणं तरणिप्रभवस्यतद्–वितरणेन निजेनजिगाय सः ।। (६.३)**

= संभाजी महाराजांनी गुणसंपन्न अशा सर्व विद्वानांच्या समुदायाचे रक्षण केले. पण त्याचबरोबर गरजू माणसांना ते अन्न आणि वस्त्रे देत होते. अधिरथ 'सूत' म्हणजेच 'अधिरथ सूर्य'च्या पुत्र कर्णाची दाने देण्याची प्रवृत्ती त्यांच्या ठायी होती. मात्र संभाजी महाराजांनी आपल्या दानशीलतेने त्या कर्णाच्याही दानशीलतेला जिंकले होते. : (६.३)

(४) 'राज्यात स्त्रिया शुद्ध चारित्र्यवान होत्या– 'कोठे बाल–मृत्यू होत नव्हते.'

**– न विधवा विधवाऽऽस नितंबिनी न च ममार कुमारनरः क्वचित् ।**

**न हि धनं निधनं भविता ममेत्त्यवति नैवमुवाच नृपे जनः ।। ६.४ ।।**

= संभाजी महाराज राज्य करीत असताना कुणीही पतिहीन विधवा स्त्री दुसऱ्या कोणास विशेष पती मानीत नसे, कोठेही बालमृत्यू होत नसे. ''माझ्याजवळ पैसा नाही. पैशाच्या अभावी माझे मरण अटळ आहे.'' असे कोणीही म्हणत नसे. : (६.४)

(५) : (संभाजींच्या जिवापाड रक्षणाची इच्छा सर्वजण बाळगीत असत.) :

**– परिजनः शिवसूनुमसूनिव प्रियतमान्समवेक्ष्य रिरक्षिषुं ।**

**शिवकृतं परिपालनमात्मनः किमपि केऽपि कदापि न सस्मरुः ।।६.५।।**

= श्रीशिवरायांचे सुपुत्र संभाजी हे; आपले आश्रित, सेवक, सुहृद यांचे रक्षण करण्याचे, कल्याणकारी(शुभ) कार्य आहे, या गोष्टींचा ते स्वत:ला कधीही विसर पडू देत नसत.

(६) : (संभाजींच्या गुण–ग्राहकतेमुळे देव–समूहही हर्षित झाले होते.) :

**– प्रकृतयः कृतयोऽस्य महत्तमा इति विलोक्य महामुदमाययुः ।**

**बुधजना अथ तस्य गुणज्ञतां समधिगम्य ननन्दुरुपर्यपि ।। ६.६ ।।**

= या संभाजी महाराजांची कामे फार मोठी, लोकोत्तर आहेत; हे पाहताच राजांच्या प्रमुख अधिकाऱ्यांना (प्रकृती म्हणजे प्रधान, राजकार्यकराः। पुरोहित आदि सात अंगे प्रकृतीची असणारे किंवा प्रजाजनांना) मोठा आनंद झाला. नीतिज्ञ लोक सर्वोपरी असतानादेखील, तसेच देवांचे समूहही संभाजींची गुणग्राहकता लक्षात घेऊन हर्षित झाले. : (६.६)

*** (राज्याची ७ अंगे/'सप्तप्रकृती' :**

**(१) –''स्वाम्यमात्य सुहृत्कोश राष्ट्रदुर्गबलानि ।''–**

१. स्वामी (राजा/राष्ट्रप्रमुख), २. अमात्य (मंत्री), ३. सुहृदु (मित्र/मित्र

राष्ट्रे/प्रजाजन), ४. कोश (खजिना), ५. राष्ट्र (देश/भूमी/राज्य), ६. दुर्ग (किल्ले/दुर्गम स्थाने), ७. बल (त्रिदल सैन्ये)/– ''स्वाम्यमात्यौ पुरं राष्ट्रं कोश–दंडौ सुहृत्तथा।

**(२) –''सप्तप्रकृतयो ह्येता: सप्तांगं राज्यमुच्यते ।।'' : (मनु. ९.२९४).**

(१. राजा, २. प्रधान, ३. पुर (नगर), ४. राष्ट्र, ५. कोश, ६. सैन्य (दंड), ७. मित्र.)

(3) 1. The king, 2. The minister, 3. The allies, 4. Treasure, 5. Army, 6. Territory, 7. Fortresses. (.....).

(७)(नीतिशास्त्रज्ञ संभाजींची पत्नी(येसूबाई) त्यांची देवांजशी पूजा करत असे.)

**– परिणयं नयविद्विदधे निजं व्रतनिबन्धनपूर्वकपूर्ववत् । : (पाठ : 'पूर्वमपूर्वकृत्')**

**युवतिरप्यस कृत्पतिदेवता तमनुकूलमपूजयदीश्वरम् ।। ६.७ ।।**

= नीतिशास्त्र जाणणाऱ्या छत्रपती संभाजी महाराजांनी त्यांची तरुण पत्नीसुद्धा स्वत:स अनुकूल अशा पतीची (संभाजी राजांची) 'देव' मानून पूजा करीत असे. : (६.७)

(८) : (संभाजींच्या अद्वितीय, अनुपम सौंदर्याचे वर्णन.) :

**– सलिलजातदलायतलोचनो नववया: पृथुदीर्घभुजोंऽसल: ।**

**कमलकोमलपादतलो नृप:** : (पाठ/..'पादसमोकवि:'):/

**कनकगौरतनुर्विततालक: ।।६.८ ।।** : (पाठ/..'र्विमलालक:') :

= कमलपत्राप्रमाणे संभाजी महाराजांचे डोळे विशाल होते. ते ऐन यौवनात होते. त्यांचे बाहू पुष्ट आणि लांब होते. त्या बलशाली संभाजी राजांची पावले कमलाप्रमाणे मृदुलकोमल होती. त्यांचे शरीर सोन्यासारखे गौरवर्णी होते. त्यांचा शिरोकेशसंभार कुरळा व चमकदार होता. : (६.८).

(९) : केवळ दर्शनानेही स्वपत्नीस कामसौख्यदायी अनुभव देणाऱ्या संभाजींनी अनेक शत्रू वठणीवर आणले होते. :

– पतिपरोत्तमदारमनस्यपि **स्मरसुखं** जनयन्निजदर्शनात् ।

**विजयते** जितशत्रुपरंपरो हरिहरार्चनलब्धमनोरथः ॥ ६.९ ॥ (पृ.८७ पाहा.)

= पतीला सर्वश्रेष्ठ परमेश्वर मानणाऱ्या स्त्रियांच्या मनातदेखील संभाजी नृपतींचे उदात्त व सात्त्विकतापूर्ण दर्शन होतांच स्मरण–सौख्याचा अनुभव येत असे. अशा त्या संभाजी राजांनी अनेक शत्रूंना एका पाठोपाठ एक असे वठणीवर आणले होते. ज्यांच्या सर्व इच्छा हरी आणि शिव यांच्या पूजन–अर्चन–भक्तीने पूर्ण झाल्या आहेत अशा त्या शंभुनृपतींचा विजय असो ! : (६.९)

(१०) : (आठ वर्षेराज्य केल्यानंतर संभाजीराजे निधन पावले.) :

**– सिंहासनगतः शंभुर्वर्षाष्टकमपालयत् ।**

**जगतीं जगतीनाथो जगन्नाथपदाश्रयः ॥ ६.६६ ॥**

= सिंहासनावर आल्यानंतर आठ वर्षे अवघी पृथिवी न्यायनीतीने रक्षण करून, राज्यसत्ता उपभोगून छत्रपती श्रीसंभाजी महाराजांनी पृथ्वीपती जगन्नाथाच्या चरणीं आश्रय घेतला. : (६.६६).

**(११) : संभाजी राजांच्या निधनाची तिथी.**

– ''ख–भूमि–रस–भू मिते वहति शालिवाहे शके ।''

० १ ६ १ = १६१० शके

(अंकवाचन)

**तुलापुरपुरे नृपः स किल फाल्गुननामातिथौ ॥**

**सुरासुरपतिं हरिं मनसि धारयन्नन्वगा–**

**द्दिवं दिविजसंस्तुतः स्तुतकथः कथावारिधिः ॥ ६.६७ ॥**

= छत्रपती श्रीसंभाजी महाराज हे आपले जीवन संपवून शालिवाहन शके १६१० (इ.स. १६८९) मध्ये फाल्गुन वद्य ३० अमावास्या या तिथीस सुर आणि असुर यांचे स्वामी श्री हरी यांचे मनोमनीं ध्यान करीत स्वर्गीं जाते झाले. त्यांनी आपला देह तुळापूर येथे त्यागिला ; व आपले आयुष्य संपविले. : (६.६७)

**त्यांनी तुळापूर येथे देह त्यागिला.** :

(१२) : (छत्रपति राजाराम महाराज) :

**– राजारामोऽरातिवर्गप्रहर्त्ता**

**कर्ता काम्यानेकयज्ञक्रियाणाम् ।**

**शास्ता भूमेर्दीनसंघस्य भर्त्ता धर्त्ता**

**भूते राजते राजसूनु: ।। ६.६८ ।।**

= अनेक शत्रुवर्गांचे नाशकर्ते, पराभव करणारे आणि अनेक प्रकारच्या इच्छापूर्तीची यज्ञयाज्ञकर्मे करणारे, तसेच दुबळ्या लोकांच्या समूहांचे पोषणकर्ते, तसेच सर्व प्राणिमात्रांचे संरक्षणकर्ते, धारणकर्ते राजाराम महाराज हे राजपुत्र राज्यकर्ते म्हणून शोभायमान आहेत. : (६.६८)

(१३) : (छ. संभाजी महाराजांचे पुत्र शाहू यांचा जन्म व रूपसौंदर्यवर्णन.) :

**– शंभोरंभोनिधेर्जज्ञे शाहुर्बाहुजवंदित: ।**

**इंदुरिंदीवराक्षोऽयं प्रणमन्ति शिशुं प्रजा: ।। ७.१ ।।**

– संभाजीरूपी सागरातून क्षत्रियांनी ज्यांना वंदनीय मानले असे श्रीशाहुराज जन्मास आले. कमलाप्रमाणे डोळे (तेजस्वी, स्वच्छ, लांब निमुळते) असणाऱ्या व चंद्रबिंबाप्रमाणे प्रसन्न असणाऱ्या शिशू शाहूंसदेखील सर्व प्रजाजन वंदन करीत असत. : (७.१)

**– शंभुत: सममवद्दयानिधि: शाहुनामानृपतिर्गुणालय: ।**

**दुंदुभौ दिविजदुंदुभिध्वनौ भूतले च सति दुंदुभिध्वनौ ।।**

।। ७.१ /पा.भे. ।।

– छत्रपती श्रीसंभाजी महाराजांचेपासून दयानिधी व गुणालय असे नृपती श्रीशाहू राजे जन्मास आले. त्यावेळीं स्वर्गलोकात देवांनी व भूलोकीं मांडलिक राजांच्या राजप्रासादांत नगारे दुमदुमू लागले, व मंगल ध्वनी निनादू लागले.

: (७.१/पाठभेद)



# १३. शंभुराजे यांचे जातकर्म व जन्मपत्र :

: (नवजात श्रीशंभुराजे यांचा 'जातकर्म'– विधिसंस्कार व ज्योतिषीद्वारा– 'जन्मपत्र'– लेखन–वाचन–भविष्यकथन व श्रवण) :

**: ('शिवकाव्य' : कवी संकर्षण सकळकळे कोण?)**

**: (श्रीशिवरायसमकालीन संस्कृत कवी.)**

: टीप / १. या काव्यातील सर्गांतील सर्ग ८ मधील श्लोक १ ते १६ मध्ये श्रीशंभुराजांच्या 'जातकर्म' या विधिसंस्काराचे वर्णन आहे. आणि, सर्ग १५ श्लोक १२ मध्ये बालवयीन ग्रामसमूह–रक्षक शंभुराजांच्या कर्तृत्वाचा उल्लेख आहे. तसेच–

– या काव्यांत शंभु राजांसाठी कवीने 'चिंतामणी' हे नांव योजिले आहे, **की जे, संभाजींचे 'नांवरस नांव' असावे. :**

**(१) – ''इति दलित सपत्न: श्रीशिव: पार्वतीयैर् : ('पर्वतीय').**
**(अ)परिमित कुमारैरन्वितस्तैर्गणेशै: ।**
**विदलित–रिपुराजस्फार सम्पत्समेतो**
**जलनिधिमभिवंद्य स्वां पुरीमाजगाम ।।'' (७.४२).**

: "Thus having destoyed the enemy's side, Shivaji (Maharaja) bowed to the ocean and returned to his city along with the chiefs of forces of the mountain ranges and also with the tremendous wealth of the enemies who were killed in the battle." : (७.४२)

= ''कोकण प्रदेशात शत्रु–पक्षाचा पराभव केल्यानंतर, शिवाजी महाराजांनी सागर– दैवतास विनम्र वंदन केले. आणि त्या युद्धात प्राणांस मुकलेल्या शत्रुपक्षीयांची प्रचंड संपत्ती आणि आपल्या पर्वतक्षेत्रांतील सेनादलांचे अधिपती यांच्यांसह ते आपल्या राजधानीस परत आले.'' : (७.४२).

## ❏ नवजात संभाजींचा जातकर्म–संस्कार :

(२) – ''**अथ 'जातकर्म–समये'नृपतिर्** गृहमाययौ निजसुतस्य **निजम् ।**
**परमृद्धिमत् त्रिदशपत्तनवद्विबुधोल्लसद्गुरु कविप्रियकृत् ।।''**
: (८.१)

: "Then, on the occassion of his son's ('जातकर्म') Jatakarma ceremony, Shivaji returned to his residence which was prosperous like the city of the gods and which made happy even Brihaspati and Shukra (बृहस्पती तथा शुक्र) with all the gods enjoying there as in the heaven." : (८.१)

= ''नंतर, शिवाजी महाराज, आपल्या (ज्येष्ठ) पुत्राच्या 'जातकर्म' नांवाच्या संस्कारविधीच्या समारंभासाठी आपल्या राजप्रासाद निवासस्थानीं आगमन करते झाले. ती राजधानी (राजनगरी) जशी की, देवांच्या स्वर्गीय नगरीजशीच वैभवसंपन्नतेने सुशोभित झालेली होती; की जेथे देवांचे गुरु बृहस्पती व कवी शुक्र हेही स्वर्गातल्या प्रमाणे वास्तव्य करून राहिले होते; व ते स्वर्गीय आनंदच उपभोगत होते.'' : (८.१)

(३) : (राजपुत्राच्या जन्माचे वृत्त शिवाजींच्या कानांवर घालण्यात आले.):
**–''सुतसम्भवं परमुदाऽकथयन् नृपतिं पुरोहितगणस्त्वरया ।**
**धृत संभृतोपकरणाभरण: शुभसूतिकागृहकृतावरण: ।''** : (८.२)

: "The group of priests (पुरोहित) who were carrying the necessary material (for the ceremony) and who made an artificial veil to the auspicious labour-room informed immediately yet gladly to the king about the birth of his son." :(८.२)

= ''शिवाजी राजांच्या पुत्राच्या जन्मामुळे परम आनंदित झालेल्या व धर्मसंस्कारविधी करणाऱ्या पुरोहितांचा समूह जातकर्मविधीच्या समारंभासाठी

आवश्यक ती सर्व साधनसामग्री गोळा करण्यात, तसेच सुशोभिकरणासाठी मंगल, शुभकारक, सुयोगकारी यशस्कर भरभराटीचे सूचक अशा कृत्रिम जाळीदार सूतिकागृहींच्या गृहीं कार्यरत असलेल्यांनीं शिवाजी महाराजांना त्वरेने व आनंदातिशयाने हे त्यांच्या राजपुत्राच्या मंगल जन्माचे वृत्त त्यांच्या कानांवर घातले.' : (८.२)

(४) : शिवाजी राजांनी राजपुत्र शंभूंचा जातकर्मविधी करून दानधर्म केला. :

**– ''सुत–जातकर्म–विधिवद्विदधे नृपतिस्तदा वितरणैरधिकम् ।**
**स्वपुरोहितातिथिसुरार्चनकृत् निजभक्तितः स्वपितृवत् प्रथितः ॥''**
: (८.३)

= : ("The king who was famous like his father (Shahaji Raje) on account of his devotion and who always worshipped the priests, guests and gods, then performed the birth-day ceremony of his son according to the sacred procedure by giving away many things in charity.") : (८.३)

= ''राजे शिवाजी हे आपल्या पिताश्री (शाहाजी महाराजां) प्रमाणेच ईश्वरभक्तीविषयी प्रसिद्ध होते. ते दैवतवंदना, पुरोहित तथा अतिथी व कुलदेवता यांच्याविषयी आपल्या मनात संपूर्णपणें आदर बाळगीत असत. पुत्राच्या जातकर्मविधीच्या समारंभात त्या सर्वांचे त्यांनी यथायोग्य ते सत्कार केले. आणि सगळ्या प्रकारच्या मंगल विधींसह व पवित्र भावनेने, आपल्या पुत्राचा जातकर्मविधिसंस्कार त्यांनी भव्यप्रमाणात संपन्न केला; तसेच, सर्वांना अनेक प्रकारचा दानधर्म करून संतुष्ट केले.'' : (८.३)

(५) : (शिवाजींनी आपल्या पुत्राचे जन्मपत्र ज्योतिषाकडून ऐकले.):

**– ''सुतजन्मपत्रमशृणोद् गणकात्, प्रयतादसौ नरपतिः प्रयतः ।**
**कृतमंगलो निजजनैः सहितः सदसि स्थितः परमयैव मुदा ॥''**
: (८.४)

: "He (Shivaji) sat controlled thing, performed the rites in the company of less relatives, who had assembled in the court-hall along with the royal personage, he listened attentively to the allentive astrologer who read out the horoscope of the boy."
: (८.४)

= ''शिवाजी महाराज (नरपती) यांनी आपल्या परिवारासह व नातलगांसह आपल्या राजभवनात परम आनंदाने भरलेल्या व भारून गेलेल्या मनाने, शांतचित्ताने व ध्यानपूर्वक एकत्रित बसून, आपल्या पुत्राचे 'जन्मपत्र' जे ज्योतिषांनी लिहून काढले होते, ते ऐकले.'' : (८.४)

(६) : चिंतामणी (शंभूराजे)च्या जन्मपत्राचे वाचन व श्रवण :

– **''नत्वा गणेशं गणकस्तदानीं स्वशास्त्रसिद्धान्तविचारदक्षः ।**
**चिन्तामणेर्मङ्गल 'जन्म–पत्रम्', अवाचयत्साधुसभासदग्रे ।।''**
: (८.५)

: "Then the astrologer who was well-versed in the theories of his own science (astrology) prayed & saluted to lord Ganesh and read out properly the auspicious horoscope of Chintamani before the courtiers. : (८.५)

= ''नंतर, ज्योतिषशास्त्रात निष्णात (पारंगत) असलेल्या ज्योतिष्याने श्रीगणेशदैवतास वंदन व त्याची प्रार्थना करून, ते श्रीशिवरायपुत्र 'चिंतामणी'चे समग्र जन्मपत्र स्वतः काळजीपूर्वक वाचले. आणि ते, त्यावेळीं तेथे राजभवनात उपस्थित असलेल्या सर्वांनी ध्यानपूर्वक श्रवण केले.'' : (८.५)

(७) : (आजच जन्मलेल्या स्वपुत्राचे भविष्यश्रवणास उत्सुक शिवराज.):

– **वृत्तैकवर्षस्य निजात्मजस्य चिन्तामणेरस्य भविष्यदर्थम् ।**
**अनेकजन्मान्तरपुण्यलभ्यं श्रोतुं शिवोऽयं परमीहते स्म ।।** : (८.६)

: ("Shivaji was also eager to hear the perdiction of future that was

aquired through merit of several births, of his son Chintamani (चिन्तामणि) who was 'one day' (the same day/but not of 'one year') old.") : (८.६)

= ''वय फक्त एकच त्याच दिवसाचे (जन्म काही क्षणांपूर्वीचाच फक्त) असलेल्या आपल्या 'चिंतामणी' नामक पुत्राने स्वतःच्या, पूर्वीच्या अनेक जन्मांमध्ये स्वगुणांनी व स्वकर्तृत्वाने जे यश मिळविलेले असेल, त्याच्या अधिष्ठानावर या जन्मीं भविष्यकाळात तो स्वपराक्रमाने व कर्तबगारीवर जे जे काही यश, जय-विजय व लोकोत्तर लोकाभिमुख चिरंतन लोकप्रियता इ. प्राप्त करणार असेल त्याचे भविष्यकथन ज्योतिष्याकडून ऐकण्यास शिवाजी महाराज उत्सुक होते.'' (८.६)

* (**'वृत्तैकवर्षस्य'** म्हणजे - **'वय दिवस एकच (१) असलेल्या'** - असा अर्थ घ्यावयाचा हे येथे स्पष्टपणें आहे. 'दिवस' हा अर्थ 'वर्ष' या शब्दाचा, येथे निश्चितपणें घेतलाच पाहिजे. :- रा.आ.कदम)

*** संवत्सर = वत्सर = वर्ष.**

**: 'वर्ष' = दिवस, दिन.**

: (वाल्मिकी रामायण - ७. उत्तराकांड/७३ वा अध्याय श्लोक ५ वा.).

=: ( १. पर्जन्य.
२. पाऊस, (मनु. ४-१०३/गीता - ९-१९).
३. वृष्टी, वर्षाव. (म.भा. ३.१२१.९. (शरवर्ष इ.)
४. शिंपडणे.
५. वर्ष/year. (मेघदूत - १.).
६. द्वीपाचा पोटभाग/भारतवर्ष इ.,
७. जंबुद्वीप.
८. वसतिस्थान (म.भा. ३.१४२.२२),
९. ढग.
१०. दिवस. (वा.रा. ७.७३.५) अह, दिन, अह्न. )

*** 'वर्ष' = संवत्सर = दिवस, दिन.**

**''अप्राप्त यौवनं बालं पंचवर्षसहस्रकम् ।**
**अकाले कालमापन्नं मम दुःखाय पुत्रक ।।''** : (वा. रामा. ७.७३.५)

= (''हे मुला ! आताच तर तू बालकच होतास. तरुणदेखील बनला नव्हतास. फक्त पाच हजार (५,०००) दिन (दिवस) (= १३ वर्षे, १० महिने, २० दिवस) हे तुझे वय होते. तरीही तू मला दुःख देण्यासाठी अवेळीच कालाच्या गालांत (मुखात) गेलास.'')/ (१३ व., १० म., २० दिवस.)

* (या वरील श्लोकात, 'वर्ष' या शब्दाचा अर्थ 'दिन', असा घ्यावा लागतो. जसे–

* ''**सहस्र संवत्सरं सत्रमुपासीत् ।**'' – इत्यादी.

: 'विधि–वाक्यां'मध्ये 'संवत्सर' हा शब्द 'दिवस' या शब्दाचा वाचक मानला गेला आहे.)

* : (८) : (नवजात पुत्राचे भविष्यकालीन नांव 'चिंतामणी' हे असेल.) :

**– ''एतस्य चिन्तामणिवाक्प्रसादात् सुतं हि 'चिंतामणी'मेव जातम् ।**
**अतो जनाः कामदमेतमाशु नाम्नाऽपि चिन्तामणिमाह्वयन्ति ।।''**

: (O king ! Know your son to be the (चिंतामणी) 'Chintamani', /(a boon-giving gem) itself, born by the grace of the (चिंतामणी) /Chintamani mantra. Therefore, people also (will) call your son, who fulfils their desires as "चिंतामणि"/Chintamani." : (८.७)

* (टीप : 'चिंतामणी' म्हणजे, (१) जे जे इच्छिलेले असेल, ते ते मनुष्यास देणारा एक कल्पित मणी, खडा. दिव्यत्वसंपन्न बहुमौल्यवान रत्न.)

('मालती माधव'. १०.२२.)

(२) गणपतीचे एक नांव.

= ('' त्यावेळी ज्योतिषाने श्रीशिवरायांच्या 'चिंतामणी' नामक पुत्राचे भविष्य वर्तविले की हे शिवराय ! 'चिंतामणी'ने (दिव्यरत्नमण्याने/श्रीगणेशाने) दिलेल्या

दैवी वरदानामुळे जन्मलेल्या आपल्या या पुत्राने सकल प्रजाजनांच्या इच्छा पूर्ण केल्यामुळे सर्व प्रजाजन आपल्या पुत्रासही ''चिंतामणी'' याच नांवाने आदरपूर्वक संबोधतील !'') : (८.७)

* (९) : (श्रीशिवरायांनी केलेले पराक्रम.) :

– **''शिवेन गर्भस्थित एव यस्मिन् न आक्रान्तमेतत् क्षितिचक्रवालम् ।**
**सद्वीपरत्नाकर–शैलराजविराजितं धि:कृतराजलोकम् ।।''**: (८.८)

: "Even when this boy was in his mother's womb, Shivaji conquered the entire world along with the islands, oceans, big mountains repudiating the kings," : (८.८)

= ''ते ज्योतिषी, शिवाजी महाराजांना उद्देशून आणखी पुढे म्हणाले की, 'एवढेच काय, पण हा राजपुत्र आपल्या मातेच्या गर्भात (पोटात) असतानाच, आपण (शिवाजी महाराजांनी) सकल पृथ्वी, तिची सर्व बेटे, महासागर, विशाल पर्वतराज इत्यादी, इतर सर्व राजे–महाराजे यांच्या समूहांना नगण्य ठरवून, तुच्छ लेखून पादाक्रांत केले आहे. त्यांना जिंकून घेऊन त्यांच्यावर आपले अधिराज्य प्रस्थापित केले आहे.'' : (८.८)

* (१०) : बाल संभाजी राजांचे खेळणे–बागडणे इंद्रपुत्र 'जयंत'जसे :

– **''अन्त:पुरे क्रीडति चारु, यस्मिन् 'जयंत'वत् कापि पुलोमजेव ।**
**माता सती पर्वत–पुत्रिकेव, विराजते स्वीय सखीसहस्रै: ''** ।। (८.९)

: ("When this boy (Chintamani) is playing (in his future Life) in the harem like 'जयन्त' (son of Indra and Shachi (Pulomja) in the heaven, his mother enjoys with thousands of female friends like 'शची' (daughter of Puloman in heaven) as did Sati/Parvati, (daughter of Himalaya Mountain/हिमालय पर्वत.) : (८.९)

= ते ज्योतिषी पुढे म्हणाले, –''जेव्हा हा पुत्र (हे बालक/चिंतामणी) स्वर्गातील

इंद्राचा पुत्र तो 'जयंत', आपल्या सवंगड्यांसोबत खेळावा, तद्वत हा पुत्र (चिंतामणी) आपल्या बाळगोपाळांबरोबर खेळत असलेला पाहताना याची आई आपल्या हजारो स्त्री-सखींच्या घोळक्यांत, इंद्राची पत्नी शची (पुलोमजा/पुलोमन् या पित्याची जी पुत्री); तिच्याप्रमाणे (स्वर्गात) आनंद लुटीत असते; आणि (हिमालय) पर्वताची कन्या तीच पार्वती (सती), ही सुद्धा आपल्या पुत्राचे खेळणे-बागडणे पाहून आनंदात रममाण होऊन राहावी, तशी या (चिंतामणी नामक) पुत्राची माता नित्य दिवस आनंदात तल्लीन राहील.''

: (८.९)

* (११) : शिवशार्दूल शंभुराजांच्या दर्शनानेही शत्रूंच्या स्त्रिया गर्भगळित बनतील.

– **''डिम्भेऽपि चिन्तामणिदर्शनार्थमानीत मात्रे चतुरंगसैन्यै: ।**
**त्यजन्ति गर्भम् सकलारिनार्य: करेणुवत् सिंह शिशाववाप्ते ।।)**

: (८.१०)

: ("Even when the boy is brought by the four - fold army ('चतुरंग सेना') units for the (दर्शन) darshan of Chintamani, the wives of all the enemies will drop foetus aborted like the she-elephant at the sight of the cub of a lion.") : (८.१०)

= ''ज्योतिषी पुढे म्हणाले, ''त्याचबरोबर एवढेच काय, पण; जेव्हा हे बालक चतुरंग (सेनेच्या १. पायदळ, २. घोडदळ, ३. हत्तीदळ, ४. रथदळ) संरक्षणात या 'चिंतामणी'च्या दर्शनासाठी राजभवनातून बाहेर आणले जाईल, तेव्हा शत्रूंच्या गर्भवती स्त्रियांचे गर्भदेखील गळून पडतील; जसे की, गर्भवती हत्तिणींचे गर्भ सिंह-शार्दूलाच्या ओझरत्या दर्शनानेही; दर्शन होतांक्षणींच गळून पडतात.''

: (८.१०)

* (१२) : शिवरायांचा राजप्रासादही शंभुराजांच्या खेळण्याबागडण्याने जसा की श्रीकृष्णाच्या जसे आणखी एक गोकुळच शोभेल ! :

**–''अस्मिन् शिशौ सोदर बालकाद्यैः क्रीडत्यसंं सखिभिः सहस्त्रैः ।**
**शैवं गृहं गोकुलमाकुलं तत्संपत्तिभिश्चारु जयत्यजस्त्रम् ।।''** : (८.११)

: "When this boy (Chintamani/infuture life) is playing with thousands of boys (his friends) ceaselessly, who are like his brothers, the place of Shivaji, noisy due to the playing of this boy and his boy&friends, always outshines with its grandeur eve the Gokul."

: (८.११)

= ''ज्योतिषी पुढे म्हणाले, जेव्हा जेव्हा हा राजपुत्र (चिंतामणी) आपल्या बंधूसमान हजारो सवंगड्यांबरोबर अविरतपणें खेळत, खिदळत, नाचत–बागडत राहील, तेव्हा तेव्हा श्रीशिवाजी राजांचा हा राजप्रासाददेखील की जो मुलांच्या हसण्याखिदळण्याच्या नादमधुर झंकारांमुळे नित्यनेमाने निनादून उठत राहील. आणि आपल्या भव्यतेच्या व उदात्ततेच्या तेजोमय वैभवाने निरंतर अखंडितपणें झळाळत राहील; जसे की श्रीकृष्णाचे व त्याच्या बाल सवंगड्यांचे आणखी एक गोकुळच !'' : (८.११)

✽ : (१३) : श्रीकृष्णाचा नवावतार शंभुराजे सागरसम्राट बनतील. :

**–''अस्मिन् शिशौ कृष्ण नवावतारे वशीकृतस्फार समुद्रतीरे ।**
**राजन्यकं बिभ्यति तत्सकम्पम् अनारतं चेतसि जातकोपम् ।।''**: (८.१२)

: "When this boy (Chintamani), who is the new-incarnation of lord Krishna, takes into his control the big sea-shore, all the angry kings tremble with fear and yet get encouraged in their minds."

: (8.12)

= ''ज्योतिषी पुढे म्हणाले, ''जो श्रीकृष्णाचाच नवा अवतार आहे; असा हा (चिंतामणी) राजपुत्र विशाल सागर–किनारे जिंकून घेऊन त्यांच्यावर आपले सागर–साम्राज्य प्रस्थापित करील तेव्हा आजुबाजूच्या परिसरातील आणि सुदूर

अंतरावरीलही राजे क्रोधित बनतील. तरीही ते थरथर कांपत राहतील. मनोमनीं भीती बाळगून थिजून राहतील.'' : (८.१२)

* (१४) : 'उच्चीचे पांच ग्रह' अद्वितीय सार्वभौम सम्राटपदाची प्राप्ती सुचवितात.

-''**तस्मादयं श्रीशिवसार्वभौमश्चिन्तामणिस्ते भविता तनूजः ।**

**'ग्रहेषु पंचस्वपि नूनमुच्चस्थितेषुजाताऽस्तिजनिर्यतोऽस्य ॥''** (८.१३)

: "Therefore, your son, Chintamani, can become a sovereign king as this boy was born when the five planets were in the exalted positions." : (8-13)

= ''ज्योतिषी पुढे म्हणाले की, ''अहो ! (छत्रपती श्रीशिवराज !), हा आपला पुत्र, (चिंतामणी) एक अद्वितीय सार्वभौम सम्राट-पद धारण करील; याची निश्चिती यावरूनही सिद्धच आहे की, ''उच्चीचे पांच ग्रह एक समवेत असते वेळीं,'' या पुत्राचा जन्म झालेला आहे.'' : (८.१३).

* : (१५) हा दानधर्मशील, लोकप्रिय व राजा चंद्रसाम्राज्यही हिरावून आणील.

- '' **पूर्णायुर्भवितैव पूर्णजलधिव्यूहाम्बराया भुवो**

**भर्ता दानविधेर्भवानिव सदा कर्ता प्रियाणामपि ।**

**हर्ता वैरिनृपालपालित महादुर्गश्रियां सर्वतः**

**पाताऽयं जगतोऽपि दाशरथिवत् चिन्तामणिस्ते सुतः ॥''**: (८.१४)

: "O ! king ! Shivaji Maharaja ! Your son Chintamani will definitely become long-lived one, who will be Lord of the earth encircled by four oceans. Like you he also engages himself in charity, and always to dearer people. He will steal away the grandeur of fort controlled by his enemies, and like Lord Ramachandra, he will protect the world." (8.14/ P. 148).

= ''ज्योतिषी पुढे म्हणाले, ''अहो शिवाजी महाराज ! आपला पुत्र चिंतामणी हा निश्चितच दीर्घजीवी राहील ! आणि तो अखंडित काल पृथ्वीपती राहील; की

ज्याचे साम्राज्य तुमच्या जसे चार महासागरांनी वेढलेले असेल. तुमच्या जसाच तोही दानधर्मशील सम्राट शोभेल. तो निरंतर लोकप्रिय, प्रजाजनप्रिय व प्रजाजनहितदक्ष राजा राहील. (की जो चंद्राचे तेजोप्रभावलयांकित साम्राज्यही हिसकावून आणील. आणि तो प्रभू रामचंद्रांच्या प्रमाणे जगताचे संरक्षण करील. शत्रू राजांच्या सत्तेखालील महादुर्गांचे वैभवही सर्व प्रकारें तो हरण करून आणील.'
: (८.१४/पृ. १४८).

* (१६) : श्रीशाहाजींच्या व श्रीशिवाजींच्या महान वांशिक परंपरेने प्राप्त झालेल्या गुणवत्तेने प्राप्त झालेली पुत्रप्राप्ती. :

**–''श्रीशाहक्षितिपतिपुण्यमप्यनल्पमाजन्मस्मरहरपूजनप्रसूतम् ।**
**(प्रभूतम् ।)**
**येनाजन्यमलसुतं शिवोऽपि साक्षात् चिंतामणि जनकत्वमाप नूनम् ।।'')**
: (८.१५/पृ. १४८)

: ("The Merit that king Shahaji accumulated by worshipping Lord Shiva (= स्मरहर), right from his birth, is abundant. Due to that merit only, Shivaji got this spotless son and himself became the father of Chintamani, (Shambu Raje)." : (8.15/P. 148).

= ''ज्योतिषी पुढे म्हणाले, ''जी गुणवत्ता श्रीशाहक्षितिपती (शाहाजी महाराज भूमिपती) आणि शिवाजी महाराज यांनी आपल्या महान प्रारंभकाळापासून स्मर–हर (मदनास पराजित करणाऱ्या) श्रीमहादेव शिवशंकराची पूजा–भक्ती व आराधना केली ती विपुल आहे. आणि त्याच केवळ गुणयोग्यतेमुळे शिवाजी महाराज यांनी हा (चिंतामणी) विशुद्ध, पवित्र व निष्कलंक आचरणाचा पुत्र प्राप्त केला आहे. आणि ते (शिवाजी राजे) स्वतःच त्या निष्कलंक 'चिंतामणी' याचे जनक शोभले आहेत.'' : (८.१५).

* : (१७) : पुत्राचे जन्मपत्रवाचन, श्रवण केल्याने शिवाजी राजे आनंदले. व त्यांनी विपुल दानधर्म केला.

– '' श्रुत्वा 'पौत्रं जन्मपत्रं' विशालं, राजा हर्षोत्फुल्लगल्ल: शिवोऽयम् ।
ज्योतिर्विद्भ्यो भूरि दत्त्वा धनादि प्राज्यं भूयो राजकार्यम् चकार ।।''

: (८.१६/पृ. १४७–१४८).

: ("Having heard the elaborate reading of his (Shivaji's) son's (Chintamani's) horoscope, (by the astrologers) the king Shivaji became very happy (with his cheeks blushing).
: With a smile on his face he gave away much wealth useful to those astrologers and then attended to his royal duties." : (8.16)

= ''अशा प्रकारें ज्योतिषांच्या मुखातून व त्यांनीच तयार केलेले आपल्या (श्रीशिवाजी महाराजांच्या) पुत्राचे (चिंतामणीचे) तपशीलवार जन्म–पत्र भविष्यकथन ऐकून घेतल्यानंतर, राजे शिवाजी महाराज अत्यंत आनंदी झाले, ते मनोमनीं अतीव सुखावले; आणि– त्यांचे मुखकमल लालेलाल बनले.
: आणि त्यांनी आपल्या अंतरीच्या ओसंडत्या आनंदातिशयाने, तेथे उपस्थित असणाऱ्या सर्वच्या सर्व गोरगरिबांना व गरजूंना मुक्त हस्ताने दानधर्म केला. भेटवस्तू वाटल्या. त्याच बरोबरीने ज्योतिष्यांचेही त्यांनी धन–वस्त्र इत्यादींची भरपूर विपुल दाने देऊन समाधान केले. आणि त्यानंतर त्यांनी (राजे शिवाजी यांनी) आपल्या राजकर्तव्यांच्या परिपूर्तीसाठी राजकाज पाहण्यास प्रारंभ केला.''

: (८.१६/पृ. १४८.१४९)



# १४. नवजात बालकाचे जातकर्म आदि संस्कार :

❒ मनुष्य जीवनात जन्मपूर्व, (मातेच्या जीवनात) जन्मोत्तर : (मुलां/मुलींवर) व मृत्यू आणि मृत्यूपरान्त (मरण व नंतरचे) असे १६ संस्कार केले जाण्याची परंपरा/प्रथा आहे. त्यांपैकी पुढील संस्कार जे छ. शिवाजी महाराज व संभाजी महाराज यांच्याविषयी केले गेल्याचे उल्लेख संस्कृत साहित्यात आढळले, त्यांचा संक्षिप्त परिचय येथे दिला आहे.

(१) **छ. शिवाजी महाराज : 'सूर्यवंश/पूर्वार्द्ध : मध्ये –**
कवी : कवीन्द्र परमानंद यांनी उल्लेखिलेले तीन (३) संस्कार : –
१) सूर्यदर्शन, २) उपवेशन, ३) अन्नप्राशन (उष्टावण).

(२) छ. संभाजी महाराज : 'शिवकाव्य'/संकर्षण सकळकळे,/मधील : –
१) जातकर्म–विधी. २) जन्मपत्रलेखन – श्रवण/भविष्यकथन.
: या संस्कारांच्या बरोबरच –

– या खेरीजचे १६ पैकी जे संस्कार ते, धर्मसिंधू, निर्णयसिंधू व इतर ग्रंथ तसेच, 'भारतीय संस्कृति कोश (मराठी/खंड १ ते १०)/संपा. पं. जोशी, महादेवशास्त्री सीताराम (पुणे), यांत जिज्ञासूंनी जरूर पाहावेत.

* **सोळा संस्कारांची नांवे :**

१. गर्भादान, २. पुंसवन, ३. सीमंतोन्नयन, ४.जातकर्म/(जन्मपत्रलेखन), ५. नामकरण, ६. सूर्यदर्शन/(निष्क्रमण), ७. अन्नप्राशन ८. चौल/चूडाकर्म ९. महानाम्नीव्रत, १२. महाव्रत, १३. उपनिषद्व्रत, १४. समावर्तन, १५. विवाह, १६. अंत्येष्टी
(किंवा– केशान्त./'ज्योतिर्मयूख' – ग्रंथातील नोंद).

: (संकेत कोश/श्री. शा. हणमंते.).

*** : १ : जातकर्म : विधी/(संस्कार) :**

: (भारतीय संस्कृति कोश, खं. ३ रा/पृ. ५८१–५८२)

स्त्री प्रसूत होऊन तिला जो मुलगा झाला असेल, तर त्याची नाळ

छेदण्यापूर्वी **'जातकर्म'** नांवाचा संस्कार/विधी करतात. मुलाचा पिता प्रथम पुत्राचे **'मुख अवलोकन'** करून स्नान करतो, व पुढील **'संकल्प'** करतो. –

– ''नवजात पुत्राचे गर्भजलामुळे उत्पन्न झालेले दोष नाहीसे व्हावेत, व त्याची बुद्धी व आयुष्य ही वाढावीत, यासाठी मी त्याचा 'जातकर्म' हा संस्कार करीत आहे.''

– मग तूप आणि मध (घृत+मधु+स्वर्ण), एकत्र करून, त्यात सुवर्ण (सोने) उगाळतात, व ते मिश्रण मुलाला चाटवितात.

: मग बालकाच्या दोन्ही कानांजवळ पिता आपले मुख नेऊन, पिता, –
''शतं जीव..... ।'' : (ऋ. १०.१६१.४/अथर्व. ३.११.४/२०.९६.९/ नि. १४.३६) या मंत्राने त्याला आशीर्वाद देतो. तो पूर्ण मंत्र असा आहे. :–

**१/ – ''शतं जीव शरदो वर्धमान:**
**शतं हेमन्तान् शतमु वसन्तान् ।**
**(ऋच)**
**शतमिन्द्राग्नी सविता बृहस्पति:**
**शतायुषा हविषेमं पुनर्दु:'' ।।** : (ऋग्वेद १०.१६१.४)

(किंवा) : : **(२ – ''शतं जीव शरदो वर्धमान: शतं हेमन्तान् छतमु वसन्तान् ।**
**शतं त इन्द्रो अग्नि: सविता बृहस्पति: शतायुषा**
**हविषाहार्षमेनम् ।।''**

: (अथर्ववेद– २०.९६.९)/(अथर्ववेद– ३.११.४)

– या संस्काराला, 'ऋग्वेदीय ब्रह्मकर्मा'त 'होम' हा पर्याय/विकल्प सांगितला आहे.

– 'यजुर्वेदीय ब्रह्मकर्म'मध्ये मात्र, होमाचे विधान आहे.

: त्यासाठी सूतिकागृहात (बाळंतिणीच्या खोलीत/कक्षात) अग्नीची स्थापना करून, त्यावर मोहऱ्या व इतर धान्यांचे कण यांचा सकाळ– संध्याकाळ होम करतात.

: शंड, मर्क इत्यादी राक्षसांपासून बाळ व बाळंतीण यांचे संरक्षण व्हावे, यासाठी हा होम करण्यास सांगितला आहे.

– मनुष्य आदिमकालापासून येनकेनप्रकारेण पुत्रजन्माचे काही ना काही विधी करीत आला आहे.

: आदिमानवाला, 'माणसातून माणसाची' किंवा 'जीवातून जीवाची उत्पत्ती' हे एक महदाश्चर्य वाटत होते. म्हणून त्या घटनेचे श्रेय त्याने कोणत्या तरी अतिमानवी शक्तीला दिले.

: अशा प्रसंगीं पहिला विचार त्याच्या मनात आला तो हा, की–

– प्रसूतीने क्लान्त (शक्तिक्षीण) झालेली स्त्री, आणि तिने जन्म दिलेला तो लहानसा बालजीव यांचे संरक्षण कसे होईल?

– त्यांच्यावर कोण्या पाप्याची दृष्ट तर पडणार नाही ना?

– अदृश्य भूतपिशाच त्यांना बाधा तर करणार नाहीत ना?

: या/अशा आशंकेने प्रेरित होऊन तो आदिमानव कोणत्या ना कोणत्या स्वरूपात त्या बाळाच्या व बाळंतिणीच्या संरक्षणाचे (सुरक्षिततेचे) उपाय किंवा विधी करू लागला.

– त्याच बरोबरीने त्या बाळाची व बाळंतिणीची शुद्धीही (शुद्धता) त्याला अपेक्षित होती.

– म्हणून, त्या दृष्टीनेही त्याने काही विधि–विधानेही निर्माण केली.

*** जात–कर्म : (तत्पूर्वी 'पुत्रावण' / पुत्रमुखावलोकन) :**

– भारत देशात **'गृहसूत्रां'**च्या रचना–कालात या संस्काराचा प्रयोग निर्माण झाला.

: **'जातकर्म'** करण्याच्या पूर्वी पित्याने पुत्राचे **'मुखावलोकन'** करावे, असा नियम सांगण्यात आला. कारण–

: **'पुत्र–मुख'** पाहिल्यामुळेच पिता, पितृ–ऋणातून मुक्त होतो; – अशी प्राचीन जनलोकांची विचारधारणा आहे, ठाम समजूत आहे. म्हणूनच या विधीला लोकव्यवहारात **'पुत्रावण'** (संस्कृतात 'पुत्रावलोकन' **पुत्रमुखावलोकन**) – असे म्हणण्याची चाल पडली आहे.

**नालच्छेदनापूर्वी** (नाळ कापण्यापूर्वी / तोडण्यापूर्वी) हा **'पुत्रमुखावलोकन'** संस्कार करायचा, हा मुख्य भाग. (पक्ष).

पण– तसा तो न जमल्यास सुवेर संपल्यानंतर तो पुत्रमुखावलोकन संस्कार करतात ('सुवेर' म्हणजे बुद्धी किंवा जनन– अशौच, सुएर, सोयर सुतक).

: तसेच, पुत्रजन्माचे प्रसंगीं पित्याला एखादे मृत–अशौच (सुतक) असल्यास, ते 'मृताशौच' संपल्यानंतर तो 'पुत्रमुखावलोकन' संस्कार करावा; असे नंतरच्या धर्मशास्त्रकारांनी सांगितले आहे.

(१) : **'मेधा(बुद्धि)–जनन'** : जातकर्मातले प्रथम (पहिले) कृत्य म्हणजे 'मेधा(बुद्धि)जनन' होय.

– 'मेधा–जनन' म्हणजे मुलाच्या ठिकाणीं 'बुद्धि–तत्त्व' निर्माण करणे, हे आहे. त्यासाठीच वर उल्लेखिलेले घृत(तूप)– आणि मध यांचे चाटण असते, की ज्यांत 'सोने'ही उगाळलेले असले पाहिजे.

जन्मलेला मुलगा बुद्धिमान निपजला पाहिजे; ही आकांक्षा यातून व्यक्त होत असते; आणि ती आपल्या सांस्कृतिक उच्च अभिरुचीचे द्योतक (गमक, निदर्शक, सूचक) आहे, ओळख आहे.

– यावेळी पिता आपल्या नवजात मुलाच्या कानात 'व्याहृतींचा' उच्चार करतो. या 'व्याहृती', 'बुद्धीचे प्रतीक' मानलेल्या आहेत.

: (व्याहृतिः = (स्त्री.) = १. उक्ती; भाषण. (रघु. १०.३३).
= २. मंत्रविशेष/भूः, भुवः, स्वः, महः, जनः, तपः,
सत्यं, हे शब्द./मनु. २.७८/ तै उप. १.५.१).

– ''गोभिल गृह्यसूत्रा'त म्हटलेय की, –

: – ''शिशूच्या कानात,– ''तू वेद आहेस.'',– असे वाक्य उच्चारावे. –

: याच प्रसंगीं पिता त्या शिशूचे, 'एक गुह्य नांव' ठेवीत असे. आई व बाप या दोघांच्या विना इतरांना ते प्रकट करायचे नसते. नांव 'गुह्य' (गुप्त) राखण्याचा हेतू का, की कोण्या प्रकट किंवा प्रच्छन्न (=अप्रकट, गूढ, गुप्त) शत्रूला त्या नांवावर **'अभिचार–कर्म' (जारण–मारण, मंत्र–तंत्र,** जादूटोणा) **करता येऊ नये.**

(२) जात–कर्मातले दुसरे कृत्य आहे : 'आयुष्य' : (आयुष्यवर्धकमंत्रांचे उच्चारण.)

: त्यासाठी पिता, मुलाच्या कानात, तीन आयुष्यवर्धक मंत्र उच्चारतो.

: **'पारस्कर गृह्यसूत्रा'**त असे सांगितले आहे की,– : (१.१६)

– पांच मंत्रविधींच्या जाणकारांकडून, मुलाच्या शरीरात जीवनाचा संचार (प्रदीर्घ आयुष्याचे सर्वोत्तम संवर्धन) होण्यासाठी/करण्यासाठी पुढील विधी करावा.:

– त्यानंतर, ज्या भूमीवर पुत्राचा जन्म झाला, त्या भूमीला त्याचा पिता धन्यवाद देतो. नंतर तो शिशूला– सुदृढ, पराक्रमी, व शुद्ध असे जीवन लाभावे/प्राप्त व्हावे, या हेतूने पुढील मंत्र म्हणत म्हणत पुत्राच्या खांद्यांना हळुवार हलकासा स्पर्श करतो. (तो मंत्र असा.) :–

– **''अश्मा भव ! परशुर्भव ! हिरण्यम् – अस्रुतं भव !**
**आत्मा वै पुत्रनामासि स जीव शरद: शतम् ।।''**

: (पारस्कर गृह्यसूत्र १.१६)

: **(अर्थ = ''(हे शिशो !) तू दगडासारखा टणक हो! तू परशू हो! तू सुवर्णासारखा शुद्ध व अपराजित हो! खरोखर 'पुत्र' या नांवाने (नात्याने) तू माझा आत्माच आहेस! तू शंभर (१००) वर्षे जग!'')**

– पुत्र–जन्माने कुल उज्ज्वल होते, वाढते. म्हणून सर्वजण पुत्रप्राप्तीची इच्छा बाळगतात. अशा वेळी, पुत्राला जन्म जी माता देते, तिचा गौरव, स्तुती, प्रशंसा होणे स्वाभाविकच आहे. म्हणून **'जातकर्म'** विधीत, बाळाचा पिता, बाळाच्या आईची प्रशंसा, पुढील मंत्र उच्चारून करीत असतो. :–

–**''इडाऽसि मैत्रावरुणी वीरमजीजनय: ।**
**सा त्वं वीरवती भव याऽस्मान् वीरवतो ऽ करत् ।।**

: (इडा = इरा, इला, पृथ्वी, शूद्रा, मद्रा, भद्रा, क्ष्मा, क्षमा.)

: (पार. गृ. सू. १.१६)

: **(अर्थ = ''तू इडा आहेस. तू मित्रावरुणांची कन्या आहेस. तू वीरमाता आहेस. कारण, तू वीरपुत्राला जन्म दिलास. ज्या तू आम्हां लोकांना वीरपुत्र दिलास, अशी तू वीरवती हो !'')**

* **नालच्छेदन** : वरीलप्रमाणे मंत्रोच्चारण, विधी झाल्यावर मुलाचे नालच्छेदन करतात. बाळंतीण माता मुलाला स्तनपान देते.
- त्याआधी– मुलाचा पिता,
- "**इमां कुमारो जरां धयतु....!**" हा मंत्र म्हणतो.
: मग पिता एक जलपूर्ण पात्र बाळंतिणीच्या उशाशी ठेवून म्हणतो, –
- "**हे आपोदेवींनो ! ज्याप्रकारें तुम्ही देवांसह विश्वाची देखभाल करीत आहात, त्याचप्रमाणे या सूतिकागृहात असलेल्या बाळ व बाळंतीण यांचीही देखभाल करा !**"

- '**ब्रह्मपुराण**' व '**आदित्यपुराण**' यांत **पुत्र–जन्माविषयी** सांगितले आहे, ते असे आहे :–
- "घरात पुत्र–जन्म झाल्या झाल्या त्याचा '**जातकर्मसंस्कार**' पाहण्यासाठी देव व पितर त्या ठिकाणीं येतात. त्या दिवशी पुत्राच्या पित्याने सुवर्ण (सोने), भूमी, गाय इ. दाने द्यावीत.
- व्यासाच्या मताप्रमाणे, पुत्रजन्माच्या रात्रीं दिलेले दान अक्षय्य पुण्य देणारे होते.

* पुत्र–जन्माविषयीच्या लौकिक आचारांमध्ये–
- वाजंत्री वगैरे मंगल वाद्ये लावतात;
- दीपोत्सव करतात,
- साखर वाटतात. किंवा पेढे वाटतात.

* *

## * (२) : जन्म–पत्र : लेखन/श्रवण : (जन्मपत्रिका) :

: (भा.सं.को. ३/पृ. ५४३–५४४)

१. मूल (मुलगी/मुलगा) जन्माला आल्यानंतर त्याच्या जन्मकालीं असलेले तिथी, नक्षत्र इत्यादी, योग, त्यांची घटी, पळे, तत्कालीन लग्न आणि ग्रहस्थिती या गोष्टींचे जे पद्धतशीर लेखन करून ठेवतात त्याला जन्मपत्र/जन्मपत्रिका असे म्हणतात.

२. – भविष्यज्ञान, जीवनातील अनुकूल–प्रतिकूल कालाचे ज्ञान,
: ग्रहांचे गोचर भ्रमण, शुभ–अशुभ योग,
: विवाहप्रसंगीं वधू–वरांचे गुणमेलन,
: ग्रह–बाधा–निवारणार्थ उपायज्ञान, इत्यादी कामांसाठी
– जन्मपत्रिकेचा उपयोग करतात./उपयोग होतो.

३. 'जन्मपत्रिका' हा व्यक्तीच्या जीवनाचा आरसाच होय.

४. जन्मपत्रिकेत प्रारंभीं– प्रथम श्रीकार, मंगल श्लोक, ग्रहप्रार्थना इ. लिहून मग त्या दिवसाचे पंचांग लिहितात.

५. नंतर–जन्मकालची घटिका – पळे,
मातृनाम, पितृनाम, गोत्र, अवकहडा चक्र, घातचक्र यांच्या आधाराने -
– जन्मनक्षत्र, त्याचा चरण कितवा (१,२,३,४),
– योनी (देव, मनुष्य, राक्षस),
– राशिस्वामी,
– घाततिथी – (यांची नोंद करण्यात येते.)

**(४) (उत्तर दिशा).**

**– उभा विधि–ज्ञाता. याने म्हणावे– 'बहिश्वास'.**

**– उभा विधि–ज्ञाता. याने म्हणावे–'नि:श्वास.' (३) (पश्चिम दिशा)**




**– उभा विधि–ज्ञाता. याने म्हणावे– 'श्वास'. (१) (पूर्व दिशा)**

**– उभा विधि–ज्ञाता. याने म्हणावे– 'प्रतिश्वास'.**

**(२) (दक्षिण दिशा).**

– घातवार, इ. गोष्टी लिहितात.
– डाव्या हाताला राशि–कुंडली,
उजव्या हाताला लग्न कुंडली. – एकरेषेत लिहितात.
अंतीं 'शुभं भवतु' हा आशीर्वाद लिहितात.

६. कुंडलीतील ग्रहांच्या कमी–अधिक बलानुसार त्या व्यक्तीचे भविष्य ज्योतिष्याला सांगता येते.

७. मूल जन्मल्यापासून एक महिन्याच्या आत, त्याची 'जन्मपत्रिका' करू नये, असा संकेत आहे, याला आधार कोणता? कोणत्या कालखंडापासून तो अस्तित्वात आला हे माहीत नाही. त्यामुळे याची सत्यता / ग्राह्यता / व्यवहार्यता संशयग्रस्त राहते.

* *

# १५. सूर्यवंश : द्वितीयार्ध :

– कवींद्र परमानंद/ : (पान ६७–६८)

**(अ) संभाजीराजांचे मनोनिश्चय :**

**: छत्रपती शिवाजी महाराजांस शंभूराजे मनोनिश्चय** ऐकवितात-

**१) आदिशन्ति यदेतस्मै पिता माता गुरुस्तथा ।**
**तदनेन विधातव्यं कदाचिदपि नान्यथा ।।** ९५

= पिता, माता आणि गुरू हे जे करावयास सांगतात, तेच त्याने (पुत्राने) करावे. कधीही त्यांनी सांगितल्याहून वेगळेच काही करू नये.

**२) निशम्याश्रुतपूर्वम् हि भवदीयमिदं वच: ।**
**चिरेण जगतीपाल जनयित्री मया स्मृता ।।** ९६

= राजे ! (शिवाजी महाराज/पिताश्री !) आपले हे बोलणे जे पूर्वी कधीच ऐकले नव्हते ते मी याक्षणीं ऐकले आणि मला (माझी) आई आठवली.

: (चिरेण–बहुधा/वोऽचिरेण/अचिरेण/लगेच.).

**३) न पिता न पुनर्माता न भ्रातापि सहोदर: ।**
**नियतिर्नियतं हेतुरसुखस्य सुखस्य च ।।** ९७

= आई, वडील, सख्खा भाऊ किंवा अगदी नशीब यांपैकी कुणीच (आपल्या) सुखाचे किंवा दु:खाचे कारण नसतो.

**४) भवानेवावनिं सर्वां प्रशास्तु शतश: समा: ।**
**स्वाराज्येऽपि न रज्येत त्वद्वियुक्तस्य मे मन: ।।** ९८

= (महाराज पिताश्री !) आपणच शेकडो वर्षे पृथ्वीवर राज्य करा. (पण) आपण नसलात तर स्वराज्यातही माझे मन लागणार नाही.

**५) येनार्जितमिदं राज्यमर्जयिष्यति चापरम् ।**
**स भवानस्तु मे नित्यमस्तु वा मास्तु वापरम् ।।** ९९

= ज्याने हे राज्य मिळविले आणि जो उद्या दुसरेही मिळवील, अशी व्यक्ती माझ्या लेखीं तरी सदा सर्वदा आपणच असा ! हे राज्य असो की अन्य कोणतेही !

६) समर्था एव जायन्ते समर्थानां कुले नराः ।
न बीजगुणमुज्झन्ति जातु दीपा इवामु राः ।। १००.

= सामर्थ्यसंपन्नांच्या कुळात सामर्थ्यसंपन्नच पुरुष जन्मास येतात. दीप स्वतः प्रकाशमान होण्याचा मूलभूत गुणधर्म सोडून देत नाहीत.

७) असमर्थेसुते पित्रोर्वात्सल्यमधिकं यदा ।
स एव सचिवैः सार्द्धम् प्रशास्ति पृथिवीं तदा ।। १०१.

= पुरेशा सबळ नसणाऱ्या मुलाबद्दल बापाला जेव्हा अधिकच प्रेम वाटते, तेव्हा तो सचिवांची मदत घेऊन राज्य चालवितो. (शब्दशः पृथ्वीचे अनुशासन करतो.)

८) असमर्थः समर्थाच्चेत्समर्थश्चासमर्थतः ।
तर्हि तद्धेतुदोषेण तावभव्यावुभावपि ।। १०२.

= साम्यर्थ्यशाली आई-बापांपासून सामर्थ्यरहित मुलगा जन्मास आला आणि सामर्थ्य नसणाऱ्या आईबापांपासून सामर्थ्यवान मुलगा जन्माला आला तर ते दोघेही कारणाच्या (जन आणि जननी या उभयतांच्या) दोषांमुळे असे घडून आले, असे असत नाही.

९) यस्मादुत्पद्यते यस्तु तदन्यः स न सर्वथा ।
अत एतद्विभागार्था व्यवहारकथा वृथा ।। १०३.

= जो ज्याच्यापासून निर्माण होतो, तो सर्वस्वी त्याच्याहून वेगळा नसतो. त्यामुळे त्या दोघांमध्ये भेद करणाऱ्या व्यवहारातील गोष्टी वायफळच (व्यर्थच) ठरतात.

१०) याचते पितरं यस्तु पित्र्यमर्थम् सुतः स न ।
न प्रयच्छति यस्तस्मै तस्य तं स पितापि न ।। १०४.

= जो मुलगा वडिलांपाशी वडिलार्जित संपत्तीची मागणी करतो, तो मुलगाच नव्हे !

आणि जो मुलाला त्याच्या वाट्याचं/हक्काचं धन देत नाही, तोसुद्धा बाप नव्हे !

**११) आद्यूनस्य महाराजगृहा: स्वेऽपि सुदुर्भरा: ।**
**विजिगीषोऽस्तु सुभटा समग्रा सागराम्बरा ।।** १०५.

= राजे ! हावरट, खादाड, अधाशी माणसाला स्वत:चे घर सांभाळणे सुद्धा मोठे कठीण असते. पण विजिगीषु राजा मात्र सगळी पृथ्वी सहज आणि नीट सांभाळतो ; (आद्यून = खादाड, अधाशी.)

संपूर्ण सागरावर आणि आकाशातही जय–विजयांची अजेय, अजिंक्य आकांक्षा बाळगणारा समर्थ योद्धा या रूपातच विहार करीत राहतो.

**१२) कातरस्य कर: संस्था: (करस्थास्तु) समस्ता अपि सिद्धय: ।**
**सम्पदश्च यथा व्यर्थतामुपागता: ।। : (किंचित बदलून.).** १०६.

= भित्र्या माणसाच्या हातीं असलेल्या सगळ्या सिद्धी आणि संपत्ती म्हणजे त्यांचे चिरंतन विनाशास पोहोचणेच होय.

**१३) धैर्यमात्रसहायस्याप्यसहायस्य भूपते: ।**
**छेत्तु: प्रजाभयस्योच्चैर्वशे वर्वत्यसौ धरा ।।** १०७

= प्रजेचे भय नाहीसे करणाऱ्या आणि केवळ धैर्याचीच साथ संगत असणाऱ्या राजाच्या ताब्यात ही पृथ्वी नेहमी राहते, मग तो एकटा–दुकटा असला तरीही.

**१४) साभिमानं महामानी शिवराज: सुयुक्तिमान् ।**
**समाकलनसञ्जातहर्षोत्कर्षोबभूव स: ।।** १०८

= अतिशय अभिमानी आणि चतुर अशा शिवाजी महाराजांना मोठे कौतुक वाटले आणि (संभाजी राजांचा) हा अभिप्राय लक्षात आल्यामुळे परमानन्द झाला.

**१५) इत्याकर्ण्य गुणाग्रगण्यरचनां शम्भो: शुभंयोर्गिरं**
**मेनेऽमुं स बतावलम्बमुचितं राजा स्वराज्यश्रिय: ।**

= शुभंकर अशा शंभुराजांची अतिशय गुणमयी वाणी ऐकून राजांना वाटले की हाच स्वराज्यश्रीचा योग्य आधार होय.

* *

## १६. : श्रीसंभाजीराजे व केशवपंडित :

### – 'सूर्यवंश'/द्वितीयार्ध : (पृष्ठ १५२)

**: (अध्याय ७ वा/श्लोक १३ ते २२.)**

(१) :(छ. शिवरायांचे निधन झाले.) :

**– ''तथैव शिवराजोऽपि सर्वलोक शिवंकर: ।**
**असर्पदतिवेगेन द्रष्टुं कैलासनायकम् ।।''७.१३।**

: (''त्याचप्रमाणे, सर्व लोकांचे 'शिव' (मंगल, कल्याण) करणारे श्रीशंकरच जसे (छत्रपती महाराजश्री) शिवराज हे सुद्धा, कैलासाचे नायक (नाथ) श्रीशिवशंकर (श्रीशंभुमहादेव) यांच्या दर्शनासाठी (पृथ्वीतलावरून कैलासाचे स्थानीं जाण्यास) अतिवेगाने निघाले.'')

(२) : (छ. संभाजी राजे यांनी 'सम्राट'पदवी धारण केली.) :

**– ''अथो साम्राज्यपदवीं परकुंजरगृंजन: ।**
**शिवराजात्मजो भेजे शंभुराजो गुणोज्वल:।।७.१४।**

: (''शत्रूंच्या हत्तींचा नाश करणारे (सिंहाजसे), गुणांच्या योगाने उज्वलतेने प्रकाशणारे, व श्रीशिवाजी राजांचे पुत्र जे शंभु (संभाजी) राजे, त्यांनी 'साम्राज्य' पदवी धारण केली./'सम्राट' या गौरवाभिधानाने ते प्रसिद्ध झाले.'')

(३) : (केशव पंडित हा शंभूराजांच्या दरबारास आला.) :

**–''त्यक्तामर्षोधृतोत्कर्ष: प्रहर्षपरिभूषित: ।**
**केशव: प्रीणयामास विप्रान् शंभुसभागतान् ।।''७.१६।**

: (केशव पंडिताने मनातला राग टाकून दिला आणि त्याने उन्नतीची स्थिति–गती प्राप्त केली. अतीव आनंदाने शोभिवंत असा तो, छत्रपती श्रीशंभुराजांच्या दरबारीं आला व त्याने विद्वानांना संतुष्ट केले.)

(४) : (केशवपंडितांने १६ महादानांचा प्रस्ताव शंभुराजांपुढे ठेवला.) :

**–''महाषोडशदानानि व्रतानि विविधानि च ।**
**प्रदर्शयामास मुदा शंभुभूपाय धीमते ।।''७.१८।**

= (''केशव पंडिताने १६ प्रकारच्या महादानांचा व व्रताचरणांचा प्रस्ताव श्रीशंभूभूपांच्या पुढे विचारार्थ सादर केला.'')

* **(१६ महादाने** : १. भूमी, २. आसन, ३. जल (पाणी), ४. वस्त्र, ५. दीप (दिवा), ६. अन्न, ७. पेय (पान/पिण्याचा पदार्थ), ८. छत्री, ९. सुगंधी पदार्थ, १०. पुष्पमाला, ११. फळे, १२. शय्या, १३. खडावा/पादत्राणे, १४. गाय, १५. सोने, १६ चांदी– : या सर्वांची दाने करणे.)

(५) : (केशवाने अधर्माचा नाश, धर्माची स्थापना करण्याचे व्रत शंभुराजांकडून पूर्ण केले.)

**– ''अधर्मखंडनं धर्मस्थापनं नियतव्रतः ।**
**केशवो रचयामास हस्तेन नृपतेर्मुहुः ।।''७.१९।**

= (अधर्माचे संपूर्ण उच्चाटण करणे, धर्माची सुस्थापना करणे, ही कामे करण्यासाठी केशवाने नियमित व्रत धारण केले, ती ती सर्व कामे छत्रपती श्रीसंभाजी महाराजांच्या शुभहस्तें त्याने पूर्ण करवून घेतली.'')

(६) : (छ. शंभुराजांच्या निदर्शनास केशवाने अनेक नीतिशास्त्रे आणिली.) :

**– ''नीतिशास्त्राण्यशेषाणि दर्शयित्वा नरेश्वरे ।**
**नीतीः संस्थापयामास शाश्वतीर्धरणीतले ।।''७.२०।**

= (''नरेश्वर छत्रपती श्रीसंभाजी महाराजांच्या निदर्शनास केशवाने अनेक विविध नीतिशास्त्रे (ग्रंथ) आणले. आणि या भूतलावर छत्रपती शंभुराजांच्या द्वारा शाश्वत नीतितत्त्वे रूढ केली, प्रचारात आणिली.)

(७) : (केशवपंडित स्वतः शंभुराजांची सुंदर अद्‌भुत चरित्रे लिहीत असे.) :

**– ''अभूत्प्रियसखो गुणैः शिवनृपात्मजस्योच्चकैः ।**
**विंचित्रचरितावलिं विरचन्सदा केशवः ।।''७.२२।**

= (''छत्रपती श्रीशिवाजी महाराजाच्या पुत्रांचा (छत्रपती श्री संभाजी महाराज यांचा) तो केशव, आपल्या सद्‌गुणांनी प्रिय सखा (मित्र/सुहृद) बनला होता. तो केशव नेहमी (स्वत:) 'श्रीशंभू राजांच्या सुंदर विविध चरितावली' रचीत असे, लिहून काढीत असे.'')

* *

## ■ 'बुधभूषण' विवेचन :

■ **'बुधभूषण'** : ('Preface' & 'Introduction'/) :

संदर्भ – (प्रस्तावना : पृष्ठे ९ ते १५) : प्रो. एच. डी. वेलणकर ('Journal of Bombay Branch of Royal Asiatic Society, Bombay. (A.D. 1925) – मधील 'प्रस्तावना' /इ.स. १९२६.)

**: आकलन.**

■ **सारांशत:**

१/ 'बुधभूषण'चे हस्तलिखित प्रथम प्रो. एच. डी. वेलणकरांच्या हातीं लागले. त्यावेळीं ते, 'बॉम्बे ब्रँच ऑफ रॉयल एशियाटिक सोसायटी', मुंबई–१ (फोर्ट) येथे –

– 'A Descriptive Catalogue of Sanskrit & Prakrit Manuscripts' of the Bombay Branch of Royal Asiatic Society.' च्या कार्यात कार्यमग्न होते. (इ.स. १९२५).

२/ प्रस्तावनेत त्यांनी 'बुधभूषण'च्या तीनपैकी पहिल्या अध्यायातील श्लोक १ ते ६ या श्लोकांतील गणेश, शिव, गुरु शंकर, पार्वती यांच्या 'वंदना' वगळून – श्लो. ७ ते १७ या ११ श्लोकांचे इंग्रजी भाषांतर छापले आहे. या श्लोकांत शाहाजी ते संभाजी, या भोसले वंशजांचा गुणगौरव आहे. (इतर तपशील इतरत्र दिलाच आहे.).

३/ 'Preface' मध्ये प्रा. वेलणकर नमूद करतात की, – त्यांना Mr. C.A. Kincaid, C.I.E. आणि कै. रावबहादूर पारसनीस या दोघांनी (प्रो. वेलणकरांना) 'बुधभूषण'चे हस्तलिखित उपरोक्त संस्थेच्या हस्तलिखित संग्रहालयात उपलब्ध असल्याचे सांगितले.

४/ – प्रो. वेलणकर इ. स. १९२६ मध्ये ('बुधभूषण'च्या 'प्रस्तावने'मध्ये (पृ. १२ वर) म्हणालेत–

: 'As regards the authorship of the work, the general opinion/of the reader of the 'Maratha History' is against ascribing

any literary activities to Prince Sambhaji (the son of Shivaji the Great). The writers of the 'Chronicles' ('बखरी') of the 'Maratha History', both old and new, (up to 1926 A.D.) leave an impression on the mind of the reader that 'Sambhaji though brave, was incapable of anything worthy of praise.

There is, however, nothing in them to show that Sambhaji was illiterate.'

: ''बखरींत याविषयीचे थेट संदर्भ उपलब्ध नसणार याचे कारण त्यांना विशिष्ट काळाच्या, विशिष्ट घटनांचेच केवळ (तत्कालीन सत्ताधाऱ्यांचे आज्ञांकित) धोरणच राबविणे होते. परंतु आपणांस तुरळक जे संदर्भ सुदैवाने उपलब्ध होतात त्यावरून हे स्पष्टपणे दिसून येते की, ...'and as a matter of fact we do get some from which it is possible to conclude that not only had Sambhaji received education at the hands of learned Pandits, but he had also taste for 'Sanskrit literature' and, was occasionally in the habit of writing poetry.

(१) 'चित्रगुप्त बखरी'मध्ये (पृ. ७५) अशी नोंद आहे की, शिवाजी महाराज व संभाजीराजे आग्रा येथून निसटून आले त्या वेळीं वाटेत संभाजींना/पृ. ७२) गुरूंच्या घरी ठेवण्यात आले होते. तेथे त्यांनी संभाजींना अनेक ग्रंथ, अनेक विषय शिकविले होते. उदा. १. सारस्वत (व्याकरण), २. अमरकोश, ३. रघुवंश, ४. सिद्धान्तकौमुदी, ५. मुक्तावली, इ. इ. आणि – 'Sambhaji bacame very clever.'

–''...संभाजी राजे यांस (काशीपंत) व्युत्पत्तीची विद्या सांगों लागले. सारस्वत, अमरकोश व रघुवंश व सिद्धान्तकौमुदी व मुक्तावली व आणखी व्युत्पत्ती ग्रंथांत संभाजी राजे यांसि प्रवीण केलें. बहुत चतुर जहाले.''

: (चित्रगुप्त बखर/पृ. ७५)

(२) ''मराठा साम्राज्याची छोटी बखर'' – मध्ये (पृ. ३२) अशी नोंद आहे की, – ''संभाजी राजे मथुरा येथे काशीपंतांकडे एक वर्ष राहिले.'' अर्थात बखरींनुसार, त्या काळात संस्कृत भाषाज्ञान संभाजी राजांना झाले होते, हे मानता येते.

: (वेलणकर/बु.भू. प्रस्ता. पृ. १३)

(३) '९१ कलमी बखर' (पृ. २०) प्रमाणे – 'उमाजी पंडित is said to

have been appointed to teach the prince who was kept at (शृंगारपूर)Shringarpur.' : (तत्रैव/पृ. १३).

– ती नोंद पुढीलप्रमाणे आहे :– (पृ. २९/कलम ५८) :

: ''त्या उपर संभाजी राजे यांजवर ईतराज राजे (शिवाजी) जाले. श्रीघारपुरीं ठेविले. पढायास उमा पंडित ठेविले होते.''

: (संपा. वि. का. राजवाडे/१९३०).

(४) किंकेड/पारसनीस – 'History of Maratha People./Part. II, (p.58) मध्ये, – संभाजी राजांच्याविषयी करण्यात आलेल्या शिक्षणाच्या व्यवस्थेविषयीची अशी नोंद आहे. –

: ''–केशव पंडित अध्यक्ष (दानाध्यक्ष) यांच्या साथीने संभाजीराजांनी (संस्कृत) 'वाल्मिकी रामायण' वाचले होते. त्यांना इ. स. १६८४ मध्ये संभाजी राजांनी १६०० चांदीची नाणी (लहान लाडीस) दिली होती.–''

(५) 'The king Sambhaji Maharaja was moreover no mean versifier.' (संभाजी राजे सामान्य/साधारण प्रतीचे कवी/पद्यरचनाकार नव्हते. म्हणजेच ते उच्च दर्जाचे साहित्यिक होते.)

५/ ''भलेभले शिकले सवरलेले विद्वान लेखक (Learned authors) देखील, ''संभाजी राजे हे संस्कृत ग्रंथकार कवी नव्हते,'' असे म्हणताना याबाबत 'त्यांना' माहीत असलेले संदर्भ/साधने देत नाहीत.'' : (ते कां ?)

६/ 'All this, I hope, is sufficiant to prove that, the King Sambhaji was the real compiler (संकलक/संयोजक/संकल्पक मांडणीकार ?) of the book before us."/i/e. **'बुधभूषण'**. : (तत्रैव, पृ. १४)

: (to compile = to gather together and arange in order for better understanding.)

संकलन करून त्याची उपयोगी पडेल अशी रचना स्वप्रतिभेने करणे ; लागोपाठ भर टाकून वाढविणे.)

: (''छ. संभाजी महाराज हेच 'बुधभूषण'चे स्वत: खरे संकलक रचनाकार लेखक होते हे सिद्ध करण्यास वरील सर्व विवेचन पूर्णत: समर्थ व पुरेसे आहे, असे मी मानतो, आशा बाळगतो.)'' : (वेलणकर/पृ. १४).

–"He may have been assisted by his Pandits, in the task of selecting and arranging the quotations of which the work ('बुधभूषण') consists, but he was the principal figure.'

: (प्रो. वेलणकर/प्रस्ता./पृ. १४)

**■ विषय–प्रवेश :**

/१/ मालोजी राजे भोसले यांचे पणतू, शाहाजी महाराज भोसले यांचे नातू, छत्रपती श्रीशिवाजी महाराज भोसले यांचे ज्येष्ठ सुपुत्र छत्रपती श्रीसंभाजी महाराज–विरचित 'बुधभूषण' या नांवाचा एक राजनीतीविषयीचा ग्रंथ उपलब्ध आहे.

रॉयल एशियाटिक सोसायटी, मुंबई यांच्या संग्रहालयात, 'डॉ. भाऊ दाजी यांचा हस्तलिखित संग्रह' जतन करून ठेवण्यात आलेला आहे; त्या संग्रहात हा 'बुधभूषण' ग्रंथ (एक हस्तलिखित प्रत.) उपलब्ध आहे. हे हस्तलिखित प्रो. हरी दामोदर वेलणकर यांनी संपादित केले, ते डॉक्टर भांडारकर ओरिएंटल रीसर्स इन्स्टिटयूट, पुणे या संस्थेने पुस्तकरूपाने इ. स. १९२६ मध्ये प्रकाशित केले आहे; त्याचे स्वरूप पुढीलप्रमाणे आहे. :–

आकार : रॉयल/ पृष्ठे : (१६+९६+१०) = १२२. प्रारंभीं संपादकांचे मनोगत १ पान; प्रस्तावना (इंग्रजी/Introduction) ७ पाने, मूळ संस्कृत श्लोक ८८४ : शेवटी 'Notes' (नोंदी/टीपा) मध्ये – अध्याय २ रा मधील (६३०) श्लोकांपैकी काही श्लोकांचे उपलब्ध ते संदर्भ व पाठभेद नोंदविले आहेत. इ.स. १९२१ मधील एका लेखात, ''–हे हस्तलिखित २८० वर्षांपूर्वी लिहिलेले असावे,'' असे प्रो. वेलणकरांनी म्हटलेले आहे. (हस्तलिखिताचे बाह्यांग व त्यातील अक्षरांच्या विशिष्ट वळणावरून हे त्यांनी व्यक्त केलेले मत आहे.) : ('महाराष्ट्र साहित्य', पुस्तक ३ रे, अंक ५ व ६ वा, पृ. १४५ ते १४८, डिसें. १९२१)



■ **'लेखक' कोणास म्हणावे ? :**

'लेखक' या शब्दाची व्याख्या प्रस्तुत 'बुधभूषण' या ग्रंथात पुढीलप्रमाणें दिलेली आहे. :-

–"**मेधावी वाक्पटुर्धीमांल्लघुहस्तो जितेन्द्रियः ।**
**शस्त्र–शास्त्र–परिज्ञाता एष 'लेखक' उच्यते ॥**" (बु.भू. २.२४५)

: (पाठभेद / १. धीमान् / 'धीरः' । 'शाङ्गर्धरपद्धती',
श्लो. क्र. १३३६).

: ('लेखक' म्हणजे) – "जो (वैचारिक, चिंतनात्मक) धारणासंपन्न (='मेधावी'), बोलण्यात चतुर, बुद्धिमान, हलक्या हाताचा (हाताने जलद गतीने/ भरभर लिहू शकणारा), इंद्रियांना वश करून त्यांना ताब्यात ठेवणारा, शस्त्र आणि शास्त्र या दोन्हींचाही उत्तम जाणकार असणारा, असा लेखक हा, 'उत्तम लेखक' मानण्यात येतो." : (शा. प. १३३६).

**/२/ : ('बुधभूषण') : हस्तलिखिताचे स्वरूप :**

१) एकंदर पाने : ६७ .
२) ओळी : प्रत्येक पानावर ९ किंवा १० ओळी.
३) आकार : ९ ॥ (साडे नऊ) इंच लांब व ५ ॥ (साडे पाच) इंच रुंद या आकाराचे प्रत्येक पान आहे.
(एकूण पाने ६७).
४) अध्याय, विषय, व श्लोकसंख्या : (स्थूलपणें) :–
एकूण अध्याय ३ आहेत.

१. अध्याय १ ला – १९५ श्लोक. (भोसले–वंशज–गौरव, दैवतांच्या स्तुती, विविध प्रकारच्या अन्योक्ती.)
२. अध्याय २ रा – ६३० श्लोक. (राजनीतीच्या विविध (सर्व) अंगांचा (१ श्लोक द्विरुक्त/= ६२९) : सविस्तर/सतपशील परिचय.).
३. अध्याय ३ रा – ०५९ श्लोक. (प्रकीर्णनीती/सामान्य उपदेश.).

: एकूण – ८८४ श्लोक.

: (श्लो. २.५५० चा पुनरावृत श्लो. ३.३०) :– १
= ८८३

(१) – अध्याय पहिला मध्ये प्रारंभी मंगलाचरणाचे एकूण ६ श्लोक (देवता वंदने) आहेत. :–

(१) श्रीगणेश (श्लोकांक १);
(२) श्रीशंकर (श्लोकांक २ ते ४);
(३) श्रीपार्वतीदेवी (श्लोकांक ५ व ६).

– त्यानंतर पुढे – भोसले–वंशजांचा गौरव आहे. :– (श्लो. ७ ते १५) :

(१) श्रीशाहाजी महाराज (श्लोकांक ७).
(२) छत्रपती श्रीशिवराय (श्लोकांक ८ ते १३/ एकूण ६ श्लोक).
: (शिवाजींच्या स्वराज्यस्थापनेच्या ध्येयाचे मार्मिक व लक्षात ठेवण्यायोग्य केलेले वर्णन.).
(३) (रायगड–वर्णन) : (श्लोकांक १४),
(४) श्रीशंभु राजे : वर्णन : (श्लोकांक १५),
(५) 'बुधभूषण' – ग्रंथ–रचना : (श्लोकांक १६ व १७)
– श्रीभवानीदेवीची स्तुती – (श्लोकांक १८ ते २८/ एकूण ११ श्लोक).

– त्यानंतर पुढे – अनेक (सुमारे १०) दैवतांची स्तुती, प्राचीन नमस्कृती, आशिष (देवता–स्तुती) आहेत.
(श्लोकांक १९ ते ६१).

– त्यानंतर पुढे – 'अन्योक्ती' विभागात – अनेक देवता (सूर्य, चंद्र, वायू, मेघ), काही (१२) पक्षी/कीटक; काही (२०) वृक्ष व लता; तसेच विविध विषयांवरील अन्योक्ती आहेत. (श्लोकांक एकूण १३४)

(२) अध्याय दुसरा मध्ये – राज्याची ७ अंगे, ६ गुण, राजा, अमात्य, राजपुत्र, कोश, देश, राष्ट्र, दुर्ग (६ प्रकार), मित्र, अश्व, हत्ती, सैन्य (६ प्रकारचे/,चतुरंग इ.), सेनापती, हेरांची लक्षणे, अशा सर्वविध अंगांची सविस्तर वर्णने आहेत.

प्रस्तुत ग्रंथींही हे, 'अनुक्रमणिका' मध्ये तपशिलाने नोंदविलेले आहे.

■ (एकूण श्लोक ६२९) : (श्लोकसंख्या ६३२/?? ।। पाहा – 'शिवाजींची राजनीती' /पृ. ४२४/ – भा. वा. भट / १९४१) : – ही विधाने कां केली गेलीत ?

(३) अध्याय तिसरा मधील – पहिल्याच श्लोकामध्ये ('बुधभूषण') या ग्रंथाच्या रचनेच्या उद्देशाबाबत छ. संभाजी महाराजांचे प्रतिपादन असे आहे.:

– ''**उक्त्वा भूरिविभेदां 'बुध'–संतुष्ट्यै 'राजनीतिम्' अनवद्याम्।**
**संप्रति, 'मिश्रकनीति' र्विबुधविनोदाय तन्यते शिरसा ।।''**

: (बु.भू. ३–१)

(अर्थ) = ''–निर्दोष राजनीतीचे पुष्कळ प्रकार **नृपतींच्या समाधानासाठी** सांगितल्यानंतर, आता त्यांच्या मनोविनोदासाठी आम्ही मिश्रकनीतीची बुद्धिपूर्वक (हेतुतः/मुद्दाम विशिष्ट/ विशेष उद्देशाने हेतुपूर्वक) रचना करीत आहोत.'') : (३.१)

– अध्याय ३ रा/ मिश्रकनीतीचे फक्त ५९ श्लोकच संबंधित हस्तलिखित प्रतीत उपलब्ध आहेत. त्याहीपुढे काही श्लोक अथवा प्रकरण/ प्रकरणे मूळ ग्रंथात असणे संभवनीय आहे.

### /३/ 'बुधभूषण' ग्रंथाचा रचनाकाल :–

: ('बुधभूषण' मधील श्लोकांधारें)

(१) –''**श्रौतं धर्ममवाप्य सद्भिरुदितम् 'राजाभिषेके' परम्।**
**छत्राद्यैर्नृपलक्षणैरनुदिनं सिंहासने राजते ।।** (बु.भू. १.१२ ।।)

= (''सज्जनांनी घालून दिलेल्या श्रौत (वैदिक। श्रुती = वेद।) धर्माचा अवलंब करून श्रीशिवरायांनी **'राजाभिषेक' (स्वतःचा)** करविला. छत्र–चामरे आदि राजचिन्हांनी मंडित (विभूषित) असे ते श्रीशिवराय छत्रपती (राजछत्राने विभूषित अशा) राजसिंहासनावर शोभायमान विराजू लागले.'') : (१.१२)

: (म्हणजेच छ. शिवरायांचा राजाभिषेक सोहळा संपन्न झालेला होता, त्या कालानंतरच्या काळात इ. स. १६७४ जून नंतर छ. संभाजी महाराज यांनी स्वतःच्या वय वर्षे१७ नंतर व संभाजीराजे स्वतः सत्तेवर आल्यानंतर पर्यंतच्या काळात 'बुधभूषण' हा राजनीतिग्रंथ लिहिला आहे, तो पितृप्रेरणेनेच होय, हे निर्भ्रान्त सिद्ध होत आहे.)

(२) –''**विविच्य शास्त्राणि** पुरातनानामादाय **तेभ्य:** सोयमर्थम् ।
**करोति सद्ग्रंथममुं नृपाल: स शंभुवर्मा**, 'बुधभूषणाख्यम्''॥

॥ बु.भू. १.१६ ॥

= (''प्राचीन विचारवंतांनी प्रणीत केलेल्या शास्त्रांचे (राजनीतींचे) (चिकित्सक, विवेकी) विवेचन करून, त्यांतून योग्य तो (स्वीकारण्यायोग्य) अर्थ घेऊन (आम्ही) राजे शंभुवर्मा यांनी 'बुधभूषण' नांवाचा हा महत्त्वाचा ग्रंथ लिहिला आहे/रचीत आहोत.'') : (बु.भू. १.१६)

–१. : उपरोक्त 'बुधभूषण'चे श्लोक क्र. १–१२ व १–१६ यांच्या आधारें असे दिसून येते की, 'बुधभूषण' हा ग्रंथ छत्रपति श्रीशिवाजी महाराजांच्या 'राजाभिषेक सोहळ्या'च्या संपन्नतेनंतर (इ.स. १६७४ जून ६ नंतर) जसे – 'सिंहासने राजते।' : (वर्तमानकालीन क्रिया : 'राजते !') : आणि 'नृपाल: स शंभुवर्मा' – यावरून, छ. श्रीसंभाजी महाराज स्वत: सिंहासनस्थ ('राजाभिषिक्त') झाल्यानंतर (इ.स. १६८१) या काळापर्यंत लिहिण्यात आला आहे.

–२. : **''बुधभूषण'चा रचना–प्रारंभ – इ.स. १६७७ ऑक्टो. पूर्वी झाला असावा.''** : (वा. सी. बेन्द्रे/'छत्रपति संभाजी महाराज'/पृ. ३७).

खुद्द शाहाजी महाराज व छ. शिवाजी महाराजांना संस्कृत भाषेची विशेष/बरीच आवड होती, संस्कृतात लक्षणीय गती होती. छ. शिवाजी महाराजांनी विश्वेश्वर भट्ट (उर्फ गागाभट्ट) यांजकडून दोन संस्कृत ग्रंथ करविले आहेत.

१. 'शिवद्युमणिदीपिका', (धर्मशास्त्रासंबंधी ग्रंथ)/तोच, 'दिनकरोद्योत).
२. 'शिवार्कोदय' (श्लोकवार्तिक टीका/ मीमांसा संबंधी ग्रंथ).

छ. संभाजी महाराजांनी, मिर्झा राजे जयसिंह यांचे पुत्र, अंबरचे राजे रामसिंह यांस लिहिलेले एक **संस्कृत पत्रही** (नोव्हें./डिसें. १६८२ चे) उपलब्ध झाले आहे. : ('राजस्थान पुराभिलेखागार,' बिकानेर)

तसेच – बाकरे शास्त्री यांस छ. संभाजी महाराजांनी दिलेले एक संस्कृत दानपत्रही उपलब्ध आहे. त्यात त्यांनी स्वत:च्या विद्वत्तेबद्दलचा पुरेसा परिचय स्वाभिमानपूर्वक नोंदविलेला आहे.

तसेच – '**समयनय**' ग्रंथात (**संपा. डॉ. प्र. ग. लाळे, पुणे**) गागाभट्टांनी पूर्ण आदर व विनयपूर्वक छ. संभाजी महाराजांबद्दल ३ श्लोकांत वर्णिलेली थोरवी असून तो ग्रंथ त्यांनी छ. संभाजी महाराजांनाच सादर केलेला आहे.

: (श्लोकांक : २/२६७/२६८)

■ **'सूर्यवंश' (उत्तरार्ध) :**

(संपा. गो. स. सरदेसाई) मध्ये (पृ. १५१ ते १५३/सेक्शन ४ था/ अध्याय ७ वा/ श्लो. १ ते २३)– 'केशव पंडित–माहात्म्य' कवींद्र कवींनी वर्णिले आहे. त्यात छ. संभाजी महाराजांच्या संबंधात पुढीलप्रमाणे गौरवपूर्ण उल्लेख आहेत. :– : (पृ. १५२)

(१) –''**अथो साम्राज्यपदवीं परकुंजरगृञ्जन: ।**

**शिवराजात्मजो भेजे शम्भुराजो गुणोज्ज्वल: ।।'' ७.१४ ।।**

= (शत्रूंच्या हत्तींचा नाश करणारे (सिंहाजसेच काय पण प्रत्यक्ष सिंहच), गुणांच्या योगाने उज्ज्वलतेने प्रकाशणारे, व छ. श्रीशिवराजांचे पुत्र जे छ. शंभु (संभाजी) राजे, त्यांनी 'साम्राज्य' पदवी धारण केली.)

: ('सम्राट' म्हणून ते प्रसिद्ध झाले./ 'समस्त– सामन्त– शिरोवसन्त: ।').

(२) –''**नीतिशास्त्राण्याशेषाणि दर्शयित्वा नरेश्वरे ।**

**नीती: संस्थापयामास शाश्वतीर्धरणीतले ।।'' (७–२०)**

= ('नरेश्वर छत्रपती श्रीसंभाजी महाराजांना अनेकानेक नीतिशास्त्र (राजनीती/दंडनीती) विषयक ग्रंथ दृष्टोत्पत्तीस आणून, नजरेखालून घालावयास लावून केशव पंडित यांनी या भूतलावर, छ. श्रीसंभाजी महाराजांच्या कर्तृत्वाच्या द्वारा शाश्वत नीतितत्त्वे रूढ केली; प्रचारात व आचरणात आणवून कार्यवाहीत उतरविली.'')

(३) ''**अधर्मखण्डनं धर्मस्थापनं नियतव्रत: ।**

**केशवो रचयामास हस्तेन नृपतेर्मुहु: ।।'' (७.१९)**

= (''अधर्माचा नायनाट करणे, धर्माची सुस्थापना करणे, ही कामे करण्यासाठी केशवपंडित यांनी नियमित व्रत धारण केले/कर्तव्यपूर्तीचा निश्चय केला, आणि ती ती सर्व राजकर्तव्ये छत्रपती नृपती श्रीसंभाजी महाराज यांच्या शुभहस्तें पूर्ण करवून घेतली.'')

* *

## ■ /१८/ छ. संभाजी महाराजांचे शिक्षण :

– ''छ. शिवाजी महाराजांनी संभाजी महाराजांना राज्यव्यवहारोपयोगी व वाङ्मयीन बरेच शिक्षण दिले होते, हे सिद्ध आहे.''

: (वा. सी. बेन्द्रे/ संभाजी, पृ. ३८)

■ छ. संभाजींनी शास्त्रांचा अभ्यास केला होता. आधार–

: (राहजीपंतांविरुद्धच्या एका तक्रारीतील उल्लेख/ त्यात वादी हा, छ. संभाजी महाराजांस लिहितो की,) :–

–''**साहेब सर्वज्ञ, शास्त्रार्थाचा अर्थ स्वता पंडिताचा निशा होय ऐसा करिताती. ऐसे असोन माझे पारिपत्य होत नाही.**''

: (ही तक्रार, छ. संभाजी महाराजांनी हे भांडण प्रल्हाद नीराजी व कवि कलशकडे सोंपविल्याचे सांगितल्यावरून केली आहे. हे लक्षात घेतले तर **छ. संभाजी राजे शास्त्रज्ञाते होते, असे इतर सर्वही जाणत होते, यात शंका धरण्याचे कारणच राहत नाही.**)

: (बेन्द्रे/छ. संभाजी/पृ. ३८/१९६०)

■ **छ. संभाजी महाराज स्वत:च्या 'बुधभूषण' ग्रंथात स्वत:विषयी हेच म्हणालेत :–** : (बुधभूषण)

**(१) – ''तस्यात्मज: (शिवराजस्यात्मज:) शंभुरिति प्रसिद्ध: ।**
**समस्तसामन्तशिरोवसंत: । (वतंस: ।)**
**य: काव्य–साहित्य–पुराण–गीत–कोदंडविद्यार्णव–पारगामी ।।**
**।।१–१५।।**

**(२) :विविच्य शास्त्राणि पुरातनानामादाय तेभ्य: खलु सोयमर्थम् ।।**
**करोति सद्ग्रंथममुं नृपाल: स शंभुवर्मा 'बुधभूषणाख्यम्' ।। १.१६ ।।**

**(३) : विविच्य सन्त: कृतिमस्मदीयां, गृह्णन्तु सच्चासदसच्च त्यजन्तु ।**
**क्षीरावियुक्तं परिह्रत्य नीरं क्षीरं भजन्ते खलु राजहंसा:'' ।। १.१७ ।।**

= ('(१) त्यांना (छ. श्रीशिवाजी महाराजांना) 'शंभू' नामक एक विख्यातकीर्ती पुत्र आहेत. ते सर्व सामन्त राजांच्या मस्तकांवर

**(सर्वांमध्ये ऋतुश्रेष्ठ)**

**'वसंत ऋतू'** प्रमाणे शोभायमान आहेत. (**'समस्तसामन्तशिरोवसन्तः ।'**)

: काव्य, साहित्य, पुराणे, संगीत, धनुर्विद्या या विद्यारूपी सागरांना ते पार करून गेले आहेत. (अर्थात, ते ह्या सर्व विद्यांमध्ये निपुण, पारंगत, विशारद, प्रवीण, कुशल, निष्णात, ज्ञाते आहेत.) **धनुर्विद्येचे महासागर जे 'अर्णव' म्हणजे 'सूर्य' व 'इंद्र' तसेच 'वरुण' व 'विष्णू' यांनाही मागे टाकून पुढे गेलेले असे आम्ही संभाजी राजे आहोत.**

(२) ''प्राचीन ज्ञानी/ज्ञात्या जनांनी, विद्वानांनी, अनुभवाच्या आधारें प्रचारात आणलेल्या शास्त्रांचे यथायोग्य विवेचन करून, त्यांतून योग्य तो अर्थ–बोध घेऊन (आम्ही राजे शंभुवर्मन् यांनी) हा 'बुधभूषण' नांवाचा, महत्त्वाचा ग्रंथ लिहिला आहे.

(३) : (छ. संभाजी राजे, जाणकार विद्वानांना उद्देशून म्हणतात की) :– या आमच्या 'बुधभूषण' ग्रंथाचे, जाणत्या त्या त्या सर्व विद्वानांनी परिशीलन करून, त्यातील सदंश (सत्+अंश/ चांगला व उपयुक्त, हिताचा भाग/बोध) ग्रहण करावा, आणि असत् अंश (असदंश) टाकून द्यावा. 'नीर–क्षीर' (पाणी आणि दूध) यांच्या मिश्रणातील पाणी ते ते दूर करून/वगळून; राजहंस पक्षी फक्त दूध तेवढेच ('नीर–क्षीर–विवेक' –न्यायाने) स्वीकारीत असतात.

: (त्याच न्यायनीतीचा अवलंब जाणत्यांनी आमच्या प्रस्तुत 'बुधभूषण' ग्रंथाविषयीही करावा.)

**

## ❑ छ. श्रीसंभाजी महाराज :

१/ ''छ. संभाजी महाराजांच्या राजकारण व युद्धकुशलतेबद्दल अधिक लिहिण्याची जरूर नाही. दिल्लीपतीच्या सर्व शक्तिसामर्थ्याला सतत तोंड देऊन हिंदवी स्वराज्याचे रक्षण कर्तव्यनिष्ठेने, कीर्ती संपादून करून दाखविल्याने छ. संभाजींच्या उच्च संस्कृतीचा व श्रेष्ठ संस्कारांचा जसा सहज बोध होतो, तशीच भाडोत्री शक्तिसामर्थ्यापेक्षा स्वराज्यातील राष्ट्रसंघटना कशी बलवान व तेजस्वी ठरते याचीही साक्ष पटते.''

: (छ. संभाजी महाराज/ वा. सी. बेन्द्रे/ पा. २४३/ आ. १/ १९६०)

२/ ''कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन।' – या मनोवृत्तीने ज्यांना आपल्या कारकीर्दीचा – कदाचित आपल्या सर्व आयुष्याचा (पत्नी व पुत्र यांच्या भावी उभ्या आयुष्याचा, बंधू व भावजयींच्या रणसंग्रामोन्मुख आयुष्यांचाही) क्षण नि क्षण वेंचावा लागला, ज्यांना राजभोग तर राहोतच, परंतु सामान्य गृहसुखाच्याही लाभास विन्मुख राहून एका मोठ्या परचक्राला तोंड देण्यासाठी, कर्तव्यनिष्ठेने/ स्वराज्यनिष्ठेने सतत झगडत राहावे लागले; ज्यांनी, ''स्वधर्मेनिधनं श्रेय: परधर्मोभयावह: ।'' – याची अति तेजस्वी जाणीव करून देऊन महाराष्ट्राच्या प्रतिकारांतील चैतन्य जागृत राखले त्या छ. संभाजी महाराजांची (कर्तृत्वदखल कृतज्ञतापूर्ण सजग डोळसपणें घेतली न जाता) इतिहासात फक्त दूषणास्पद म्हणून कां जमा केली?''

: (तत्रैव, प्रास्ता. पृ. १)

– (तर, इतिहासविषयक या देशातील अपक्व (मतीच्या) जनांचे गाढ अज्ञान होय.)

३/ –''धर्मांध परचक्राला तोंड देण्यात सुलतानी शाह्यांच्या मदतीची अपेक्षा करताना संभाजी महाराजांना कितीतरी अडचणींची जाणीव झाली असेल, व आपल्या तोलास न झेपणाऱ्या बलशाली मोगली सुभ्यांच्या जोडीला एवढ्या मोठ्या शक्तीनिशी खास बादशहा औरंगजेबच, आपल्या कर्तृत्ववान व शूर मुलांसह उतरलेला पाहून, त्याला शरणागती न देण्याचा निग्रह करणे म्हणजे हा श्रेष्ठ मनोधैर्याचा किती (अत्युच्च) उत्कट नमुना आहे, याची कल्पना केली तर छ. संभाजींविषयक तत्कालीन वस्तुस्थितीचा सहज बोध होऊ शकतो..''

: (तत्रैव/ प्रस्ता. पृ. २)

४/ ''बखरींच्या, उत्तरमुख्यप्रधानकीकालीन लेखनकालासमयींच्या वर्ण-आश्रम-धर्म-पद्धतींतील विचार-आचारांतील वैगुण्येही बखरींच्या पूर्वग्रहदूषित व विशिष्ट वळणाला, छ. संभाजी महाराजांच्या विषयीच्या इतिहासलेखनाला जबाबदार आहेत.''

: (तत्रैव/ पृ. २)

५./ ''आदिलशाही (विजापूर) व कुतुबशाही (गोवळकोंडे) यांसारख्या, काही शतकांच्या जुन्या (पुरातन) शाह्या ज्या औरंगजेबाने थोड्याच (एक वर्षाहूनही कमी) अवधीत सहज धुळीस मिळविल्या (सन १६८५ व १६८६ अनुक्रमें) त्या औरंगजेबाला छ. संभाजी महाराजांच्या मृत्यूपर्यंत तरी (१४ मार्च १६८९) महाराष्ट्र/ मराठा स्वराज्यापासून दूरच (आपली पावले) रोखून राहावे लागले होते, ही काही आपोआप घडून आलेली घटना खास नव्हती.

औरंगजेबासारख्या निष्णात नाणावलेल्या वृद्धकपी शूर सेनाध्यक्षाला आपल्या हालचालींतील व्यंगांची सतत जाणीव होत राहावी, व सहजसाध्य मानल्या गेलेल्या ध्येयसृष्टीत बिकट परिस्थितीचे जाळे उभारलेले पाहून सतत त्रागा करीत राहावे लागावे, ही (तर तशी) काही, मोगलांवर कोसळलेली दैविक आपत्ती खास नव्हती.

छ. संभाजी महाराज यांना प्रत्यक्ष कैद करून आणलेले पाहताच, पैगंबराने (च जणू काही/जशी की) आपणांवर (औरंगजेबावर/मोगलांवर/ मोंगल सल्तनतीवर) मोठीच (युगदुर्लभ) खैर करून आपली लाज राखली, असे वाटून औरंगजेबाने तात्काळ तख्ताखाली उतरावे व परमेश्वराच्या अकालीं प्रार्थनेची घाई करावी ही एकच गोष्ट छत्रपती संभाजी राजांच्या शक्तिसामर्थ्याची आणि उज्ज्वल तथा उत्कृष्ट राजकीय आणि युद्धविषयक कौशल्याची साक्ष पटवीत नाही काय?''

: (तत्रैव / प्रास्ता. पृ. २)

६/ ''संभाजी महाराजांनी जशी आपल्या अगदी बालपणापासून कर्तव्यनिष्ठा जागृत राखली; स्वत:च्या कारकीर्दीत छत्रपतींचा राजधर्म श्रेष्ठ युद्ध-न्यायनीति-व्यवहार कौशल्याने जोपासला, आणि आपल्या आचरणाने व सुखोपभोगांची पर्वा न करता गीतेच्या 'कर्मण्येवाधिकारस्ते' चा 'ज्वलज्जहाल'

आदर्श आपल्या तरुण शूर सांगातींच्या समोर ठेवून सम्राटापुढे यत्किंचितही मान न तुकविता तीव्र निग्रहाने व कंटकवृत्तीने अमानुष हाल सोसताना देखील अभिषिक्त राजाचा राजधर्म, व हिंदवी स्वराज्यातील स्वधर्म हेच आचार श्रेष्ठ मानून, 'स्वधर्मेनिधनं श्रेयः।' ही शिकवण स्वतःच्या आचरणात अद्वितीयपणें दाखविली, आणि पूर्ण समाधानाने व स्थितप्रज्ञतेने शूरांचा स्वर्ग गांठला.''

: (तत्रैव / पृ. ६२०) कैद व मृत्यू / प्रकरण २१ वे)

■ **छ. संभाजी महाराजांविषयी : एकूणात काय, तर –**

: एकूणात, छ. संभाजी महाराज यांस 'पाच विद्या' अवगत होत्या, हे स्पष्ट आहे.

: सारांश –

.. हिंदवी स्वराज्याच्या इमारतीला भूमी तयार करून देणारे शाहाजी महाराज,

.. स्वराज्याची सशास्त्र इमारत उभारणारे छत्रपती श्रीशिवाजी महाराज,

.. व त्या इमारतीवर भयंकर आपत्ती कोसळली असताना देखील तिला तोंड देऊन व नूतन पिढीतही तोंड देण्यास चैतन्य, सामर्थ्य व शिस्त पेरून सांभाळ करणारे छ. संभाजी महाराज;

– हे सर्व लहानपणापासून आपल्या अभ्यासाने व अनुभवाने पूर्ण सुसंस्कृत, सुविद्य, राज्यव्यवहारकुशल व युद्धविद्यानिष्णात झालेले होते यात शंका नाही.

: शिवकालीन मराठमंडळ समजाविले जाते तितके निरक्षर व अशिक्षित खास नव्हते.

: उत्तर (पेशवा) मुख्यप्रधानकालीन लेखक त्यांच्या समकालीन, म्हणजे उत्तर (पेशवा) मुख्यप्रधानकालीन निकृष्ट झालेल्या वस्तुस्थितीचे चित्र आपल्या लेखनांत उमटवितात इतकेच !!

: (बेन्द्रे/ छ. संभाजी/ पृ. ३९/ १९६०)

: (कंसातील मजकूर संपादकीय.)

* *

■ **मराठ्यांचा झुंजार व विजयी इतिहास काय बोलेल ? :**

– '' मराठ्यांच्या विषयी गैरसमज बाळगणारा मुसलमान इतिहासकार काफीखान, छ. संभाजींस 'छ. शिवाजींपेक्षा सवाई' समजतो ; याचा उलगडा छ. संभाजींच्या चरित्राने होतो. मराठ्यांच्या इतिहासातील एका अभिमानास्पद कालखंडाच्या पार्श्वभूमीवर एक उज्ज्वल, दिव्य व भव्य अशी पोलादवक्षी (क्षत्रपती त्या छत्रपती) संभाजींसारखी व्यक्ती उभी आहे, हे पाहून त्या कालखंडाचा कार्यकारणभाव उघडकीस येतो, आणि त्या इतिहासाची उपपत्ती लागते.

छ. संभाजी महाराजांच्या नंतरचा, औरंगजेबाच्या निराशामय, अंतापर्यंतचा मराठ्यांचा झुंजार व विजयी इतिहास आता बोलू लागेल की–

''धर्मनिष्ठ', 'राजकारण धुरंधर' ('बुधभूषण') मुत्सद्दी व सेनापती छत्रपती संभाजी महाराज– हीच माझी प्रेरक शक्ती आहे !''

: (बेन्द्रे/ छ. संभाजी/ प्रस्ता. २/ – (तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, वाई/ १९६०)

■ "Sambhaji followed the footsteps of his father (Shivaji with perhaps more zeal and vigour.

: His period was full of struggle and strife.

: Extraordinary power and great determination was the need of the day.

: The great enemy was at his doors, and had practically surrounded his Raj.

: It is no wonder if he loved to celebrate all the ceremonies of the Goddess to aquire the protection of the divine ( ''शक्ती'') Shakti/power."

– (V.S. Bendre/'दंडनीती'/ पृ. ६७ /प्रस्ता./ १९४३).

* *

# /१९/ छत्रपती श्रीसंभाजी महाराज आणि राजनीती : 'बुधभूषण' । :

१/ छ. श्रीसंभाजी महाराज भारतीय राजनीती शिकले होते, हे केशव पंडिताने 'दंडनीती'मध्ये नमूद केले आहे.

२/ 'बुधभूषण'मधील श्लोक सांगतात की, त्यांचा संचार सुमारे ४० ग्रंथांशी सलगी करणारा आहे.

३/ 'सूर्यवंश' – उत्तरार्ध ('परमानंदकाव्यम्') (सेक्शन ४ था/अध्याय ७ वा/श्लोक २० वा/पृ. १५२) मध्ये 'केशवपंडित'–माहात्म्य वर्णिले आहे; त्यात असे स्पष्ट नमूद केले आहे की, ''त्यांनी अनेकविध (राज)नीतिशास्त्र ग्रंथ छ. श्रीसंभाजी राजांच्या निदर्शनास आणून दिले.''

– **''नीतिशास्त्राण्यशेषाणि दर्शयित्वा नरेश्वरे ।**
**नीती: संस्थापयामास शाश्वतीर्धरणीतले ।।''**

: (सू.वं./उत्तरार्ध – ७.२०/पृ. १५२)

४/ छ. संभाजी महाराज स्वत:ही सांगतात की, ''आम्ही राजनीतीवरील अनेक ग्रंथ अभ्यासले व त्यांतील निवडक भाग स्वीकारला व त्याची आमच्या परीने आम्ही मांडणी केली आहे. यातील तुम्ही 'नीर–क्षीर' न्यायाने योग्य ते स्वीकारा.'' : (बु.भू. १.१५,१६,१७)

– **तस्यात्मज: शंभुरिति प्रसिद्ध: 'समस्त सामन्त शिरोवसंत: ।'**
**य: काव्य–साहित्य–पुराण–गीत–कोदण्डविद्यार्णव–पारगामी ।। (१.१५)**

– **विविच्य शास्त्राणि पुरातनानामादाय तेभ्य: खलु सोयमर्थम् ।**
**करोति सद्ग्रंथममुं नृपाल: स शम्भुवर्मा 'बुधभूषणाख्यम्' ।। (१.१६)**

– **विविच्य सन्त: कृतिमस्मदीयां गृहणन्तु सच्चासदसच्चे: यजन्तु ।**
**क्षीरावियुक्तं परिहृत्य नीरं, क्षीरं भजन्ते, खलु राजहंसा: ।। (१.१७)**

।। बुधभूषण. १.१७ ।।

– असा हा 'बुधभूषणग्रंथ' जिज्ञासू व चोखंदळ वाचकांच्या मनोव्यापारांशी व आचरणांशी भावी मार्गदर्शनाकरिता उचित ती सलगी करून राहो, एवढेच मागणे जगन्नियंत्याजवळ आहे. आणि –

।। 'छ. श्रीसंभाजी महाराज : राजनीती' :

- हा ग्रंथ अर्थातच 'श्रीशंभु छत्रपतीं'च्या '**समस्त सामंत शिरोवसंत**' आणि धनुर्विद्येचे निष्णात सूर्य व इंद्र आणि वरुण व विष्णू यांनाही मागे टाकून पुढे गेलेल्या छ.संभाजी राजांच्या रूपाचे चरणस्मृतींस समर्पित करीत आहोत.

* (२) : **छ. संभाजी महाराजांचे पत्र, राजे रामसिंहांस : (संस्कृत) :**

: (औरंगजेब व त्याची सत्ता नष्ट करण्याची योजना.)

– /नोव्हें. १६८२/१६८३)

– हे पत्र (संस्कृत), व त्याचे अनुवाद : (इंग्रजी) : (प्रकाशित व उपलब्ध)

: (साधनग्रंथ व अनुवादक) :

* (ब) **इंग्रजी भाषांतरे : (Prose Traslations)** : (४)

(1) "A Volume of Studies In Indology," - (p. 390).

- Presented to Prof., P.V. Kane/1941/Sardesai, G.S.

(२) (वरील ग्रंथातील इंग्रजी भाषांतर छापले आहे./सरदेसाई, गो.स.

– ''छ. संभाजी स्मारक ग्रंथ''/–डॉ. पवार, जयसिंगराव/१९९०/आ. १. पृ. ४९७–५००. (मूळ संस्कृत + इंग्रजी भाषांतर).

(3) 'House of Shivaji'/Dr. Sir Jadunath Sarkar 1955/ Pp. 201-203.

(4) 'Chhatrapati Sambhaji'/Dr. Sou. Gokhale Kamal, Edn.I/1978/Pp. 59-61.

# २०. छ. श्रीसंभाजी महाराज-विरचित

## : दैवतस्तुती व भोसले वंशज माहात्म्य :

: (बुधभूषण अध्याय १ ला)

।। श्रीगणेशाय नमः ।। श्रीनृसिंहाय नमः ।।

श्रीगणेश व श्रीनृसिंह यांना नमन असो !

* गणेशवंदना

**१.१ : देवदानवकृतस्तुतिभागं हेलया विजितदर्पितनागम् ।**
**भक्तविघ्नहनने धृतर(य)त्नं तं नमामि भवबालकरत्नम् ।।**

**अन्वय :** देवदानवकृतस्तुतिभागं, हेलया विजितदर्पितनागं,
भक्तविघ्नहनने धृतयत्नं, तं भवबालकरत्नं नमामि ।

**अर्थ :** "'ज्याची स्तुती करण्यामध्ये देव आणि दानव दोघेही स्वत:ला भाग्यवान समजतात; मत्त हत्तीला ज्याने लीलया वठणीवर आणले, जो भक्तांची संकटे दूर करण्यासाठी (सतत) प्रयत्नशील असतो, श्रीशंकराचा रत्नांसारखा तेजस्वी असा 'गणपती' नामक पुत्र, त्यास मी (आम्ही छ. संभाजी महाराज) वंदन करतो.

= I bow down before the jewel like son of "Shiva" (i.e. Ganesha). The Gods and the demons have participated in his eulogy. He had subdued the intoxicated elephant, very easily. He always tries to kill (i.e. remove) the obstacltes of the devotees.

* श्रीशंकरवंदना

**१.२ : शशाङ्कमौलिं भसितेन भासुरं पञ्चाननं शैलसुताधिनाथम् ।**
**त्र्यक्षं गिरीशं दशबाहुमण्डितं कुबेरमित्रं सततं नमामि ।।**

**अन्वय :** शशाङ्कमौलिं, भसितेन भासुरं, पञ्चाननं, शैलसुताधिनाथं,
त्र्यक्षं, गिरीशं, दशबाहुमण्डितं, कुबेरमित्रं सततं नमामि ।

**अर्थ:** ज्यांच्या मस्तकावर चंद्र (विराजित) आहे, भस्म धारण केल्यामुळे जे स्फटिकाप्रमाणे चमकदार दिसतात, ज्यांना 'पांच मुखे' आहेत, जे पर्वतकन्या पार्वतीचे पती होत, जे त्रिनेत्रधारी आहेत, जे पर्वतांचे अधिपती आहेत, जे दशबाहुमंडित आहेत आणि जे कुबेरांचे मित्र आहेत. अशा त्या श्रीशंकरांना मी (आम्ही छत्रपती संभाजी महाराज) नित्य प्रणाम करतो.

= I always salute Shiva (the lord of the mountain - Himalaya). He bears the crescent (a digital form of the moon) on his head (i.e. forehead/'भालचंद्र') (crest). He shines with sacred ashesh. He has five faces. He is the consort of the daughter of the mountain. ('Parvati'). He has three eyes. He is adorned with ten arms, and is the friend of Kubera.

.......................................................................

* टीप : (१) **श्रीशंकराची पाच मुखे** = १. सद्योजात, २. वामदेव, ३. अघोर, ४. तत्पुरुष, ५. ईशान. (२) **श्रीशंकराची पाच 'मुखे' म्हणजे = 'पंचमहाभूते'** :- १. पृथ्वी, २. आप, ३. तेज, ४. वायू, ५. आकाश - यांची प्रतीके होत. श्रीशंकराच्या पाच मुखांची नांवे व त्यांच्या दिशा पुढीलप्रमाणे आहेत :- १) **महादेव (मुख) :- पूर्व दिशा**, २) भैरव (मुख) : दक्षिण दिशा; ३) नंदिवक्त्र (मुख) : पश्चिम दिशा, ४) उमा-वक्त्र (मुख) : उत्तर दिशा, ५) सदाशिव (मुख) : ऊर्ध्व दिशा.

**श्रीशंकरांचे 'महादेव'** हे पूर्वदिशेचे मुख **'त्रिनेत्र'युक्त** म्हणजे- १. सूर्य, २. चंद्र, ३. अग्नी- या त्रिनेत्रांनी युक्त आहे.

.......................................................................

**१.३ :** **विरिञ्चिविष्णुवन्दितं नगाधिराजकन्यका-**
**विभूषितार्धविग्रहं प्रभूतबन्दिसंस्तुतम् ॥**
**लसज्जटातटस्फुरत्सुरापगाविनि:सर-**
**द्विशुद्धवारिशीतलं नमामि चन्द्रशेखरम् ॥**

**अन्वय :** विरिञ्चिविष्णुवन्दितं, नगाधिराजकन्यकाविभूषितार्धविग्रहं,
प्रभूतबन्दिसंस्तुतं, लसज्जटातटस्फुरत्सुरापगाविनि:सरद्वि-
शुद्धवारिशीतलं चन्द्रशेखरं नमामि ।

**अर्थ :** श्रीब्रह्मा व श्रीविष्णू हेही श्रीशंकरांस वंदन करतात. श्रीशंकरांच्या शरीराचा अर्धा भाग, हिमालय पर्वतराजाची कन्या जी पार्वती, हिने विभूषित केलेला आहे. (म्हणूनच ते, 'अर्धनारी-नटेश्वर' होत.) असंख्य चारण-गण (भाट, स्तुतिपाठक), हे त्यांची स्तुती करतात. तेजोयुक्त जटांमधून वाहत असलेल्या देवनदी गंगेच्या शुद्ध जलामुळे ज्यांचे शरीर (ते स्वत:) शीतल असते. अशा त्या चंद्रमौळी श्रीशंकरांस मी (आम्ही छत्रपती संभाजी महाराज) वंदन करतो.

= I salute the moon crested deity who is saluted (venerated) by Brahman ('ब्रह्मन्') and Vishnu (विष्णू). Half of his body is adorned with the daughter of a king of mountains (i.e. Parvati). He is praised by many minstrels. He (i.e. his body) is curled by pure water flouring from the divine river (i.e. Ganga), occupies (like shining on) the sides of the bright matter hair (of Shiva).

**१.४ : अज्ञानकृष्णसर्पेण दंशिता भुवि मानवा: ।**
**तेषां जीवनहेत्वर्थम् नौमि जाङ्गुलिकं गुरुम् ।।**

**अन्वय :** भुवि मानवा: अज्ञानकृष्णसर्पेण दंशिता: ।
तेषां जीवनहेत्वर्थं जाङ्गुलिकं गुरुं नमामि ।

**अर्थ :** अज्ञानरूपी कृष्णसर्पांनी या पृथ्वीवरील ज्या मानवांना दंश केला आहे (जे अज्ञानमूर्च्छेमुळे ज्ञानांध बनून जगत आहेत) त्यांना ज्ञानसंजीवनीदत्त जीवनदान प्राप्त व्हावे या हेतूने मी (आम्ही छत्रपती संभाजी राजे) सकल जगताचे जे **'गुरु' आणि जांगुलिक म्हणजे 'सर्पविषवैद्य'** (सर्पविषतज्ज्ञ, सर्पांना वश करणाऱ्या) अशा त्या श्रीशंकरांस आम्ही वंदन करतो.

= I pay obeisance to my 'गुरु'/Guru/(Shiva); who is also the serpent- physician, for the sake of (i.e. for protecting) the life of those human beings, who are stung by the black serpent in the

form of ignorance.

* **श्रीपार्वती-वंदना**

१.५ : **या भवेक्षणचकोरचन्द्रिका शांभवी**
**निजजनस्य पालिका ।**
**या तुषारगिरिराजकन्यका सा ममास्तु**
**शुभकालमालिका ।।**

**अन्वय :** या भवेक्षणचकोरचन्द्रिका, या निजजनस्य पालिका, या तुषारगिरिराजकन्यका सा शाम्भवी मम शुभकालमालिका अस्तु ।

**अर्थ :** या संसाररूपी नेत्रांच्या चकोरपक्ष्यांना चंद्रिकेप्रमाणे जी नित्य आनंददायिनी आहे, जी श्रीशिव-पत्नी आपल्या समग्र भक्तांचे (निजजनांचे) रक्षण करते. अशी ती हिमालयपुत्री, गिरिराजपुत्री श्री पार्वतीदेवी माझ्यासाठी कल्याणप्रद आणि शुभकालाची एक मालिकाच बनून राहो !

= (She) who has become moonlight to the bartavelle (Greek partridge) eyes, 1. (of lord Shambhu), who (is) the daughter of snow (covered) king (of) mountains, 2. (Himalaya mountain), who is guardian of those devotad to her, that Shambhavi (wife of lord Shambhu) may remain my string of prosperous (successful) moments.

.....................................................................

* Notes : (1) Chakora (चकोर) is a type of bird (bartavelle or Greek partridge stated by Molesworth in his Marathi English Dictionary, 2nd edition, 1857).

It is a centuries - old belief in india that Chakora subsists upon the moon-beams. There Chakora and moon (with its beams) are a common example quoted in Sanskrit and other Indian languages; to repersent subtle attraction.

(2) The great Himalaya Mountian was often mentioned as the "king of mountians". It is stated in Indian Mythological Tradition

that Parvati is the daughter of the Himalaya Mountain and she then married Lord Shankara (other name Shambhu/' 'शम्भु').

.................................................................

**१.६ : सर्वदेवमयीमीशां नौमि भूषासमन्विताम् ।**
**यस्याः कटाक्षमात्रेण जायन्ते विबुधा नराः ॥**

**अन्वय : यस्याः कटाक्षमात्रेण नराः विबुधाः जायन्ते,**
**(तां) सर्वदेवमयीं, भूषासमन्वितां ईशां नौमि । (नमामि) ।**

**अर्थ :** जिच्या केवळ नुसत्या कृपाप्रसादपूर्ण, ज्ञानसिंधुस्नेहार्द्र, क्षणकालिक नेत्रकटाक्षानेच माणसे बुद्धिमान, शहाणी होत असतात अशी ती सर्व देवदेवतांना स्वतःमध्ये धारण करणारी 'सर्वदेवमयी' अशी विविध अलंकारांनी विभूषित, शक्तिरूपिणी दुर्गा, श्रीशिवपत्नी ईशादेवी हिचे मी (आम्ही छत्रपती संभाजी राजे) स्तवन करतो.

= I salute the wife of Isha (ईश) (i.e. Isha / ईशा / पार्वती / Parvati), who incorporates all the deities in herself, who is adorned with ornaments. Just by her glance men become wise.

*** भोसलेवंशजस्तुति –**

**१.७ : भृशबलान्वयसिन्धुसुधाकरः प्रथितकीर्तिरुदारपराक्रमः ।**
**अभवदर्थकलासु विशारदो जगति शाहनृपः क्षितिवासवः ॥**

**अन्वय : जगति भृशबलान्वयसिन्धुसुधाकरः, प्रथितकीर्तिः,**
**उदारपराक्रमः अर्थकलासु विशारदः, क्षितिवासवः,**
**शाहनृपः अभवत् । भृशलान्वयः । = भौशलः ।**

**अर्थ :** अत्यंत सामर्थ्यशाली अशा भृशबल (भोसले) राजवंशीय महासागरातून चंद्राप्रमाणे उदय पावलेले श्रीशाहाजी महाराज हे पृथ्वीवरील जणू इंद्रच होऊन गेले. त्यांची कीर्ती, महती आणि पराक्रम सर्वदूर प्रसिद्धी पावली होती. ते एक कुशल राजनीतिज्ञ आणि अर्थ व कलांमध्ये विशारद (निष्णात) होते.

= There was a king called Shaha (Shahaji), who was the Indra of the Earth, who was skilled in Politics and Fine Arts, whose deeds were brave and noble, whose fame was extensive and

who was the Moon rising from the midst of the ocean in the form of the family of 'Bhrishabalas'; (i.e.,Bhosales)

..................................................................................

* भृशबलान्वय = भृश+बल+अन्वय !

**'भृश + बल (=सैन्य) + अन्वय'**

'प्रख्यात श्रेष्ठ सेनाधिपति–वंशीय' भोसले.

..................................................................................

*** श्रीशाहाजी व श्रीशिवराय यांचा गौरव !**

१.८ : **येनाकर्णविकृष्टकार्मुकचलत्काण्डावलीकर्तित–**
**प्रत्यर्थिक्षितिपालमौलिनिवहैरभ्यर्चि विश्वंभरा ।**
**यस्यानेकवसुंधरापरिवृढप्रोत्तुङ्गचूडामणे:**
**पुत्रत्वं समुपागत: शिव इति ख्यात: पुराणो विभु: ।।**

**अन्वय :** येन आकर्णविकृष्टकार्मुकचलत्काण्डावलीकर्तितप्रत्यर्थि–
क्षितिपाल–मौलिनिवहै: विश्वंभरा अभ्यर्चि, यस्य
अनेकवसुंधरापरिवृढप्रोत्तुंगचूडामणे: पुत्रत्वं समुपागत:
पुराण: विभु: शिव: इति ख्यात: ।

**अर्थ:** कानापर्यंत प्रत्यंचा ताणलेल्या धनुष्यातून **श्रीशाहाजी महाराज (शाहाजी मालोजी राजे भोसले)** (शत्रूंवर) बाणांचा वर्षाव करीत असत. त्यांनी शत्रूराजांच्या (कापून टाकलेल्या) मस्तकांच्या राशींनी पृथ्वीची पूजा केली होती. पृथ्वीचे अधिपती असे जे अनेक राजे होते, त्या सर्वांचे मुकुटमणी असे शाहाजी महाराज शोभत होते. 'सनातन' असे सर्वव्यापी श्रीभगवानच **श्रीशाहाजीराजांचे पुत्र** म्हणून जन्माला आले; ते पुढे, **(शिव) 'शिवाजी'** या नांवाने चिरंतन कीर्तिमान झाले.

= Who worshipped the earth with an offering of the miltitudes of the heads of hostile princes, which were severed (from their trunks) by a volley of arrows discharged from his bow, which was drawn right upto the ear- to him, the lofty crest jewel of numerous princes, was born the primeval Lord (i.e. Vishnu) as his son, known widely by the name 'Shiva'; (Shivaji).

**✻ श्रीछत्रपती शिवराय-गौरव !**

**१.९ : कलिकालभुजंगमावलीढं निखिलं धर्ममवेक्ष्य विक्लवं यः ।**
**जगतः पतिरंशतोवतापोः(तीर्णः)**
**स शिवच्छत्रपतिर्जयत्यजेयः ।।** : (औपच्छांदसिक)

**अन्वय** : यः कलिकालभुजंगमावलीढं निखिलं विक्लवं धर्मम् अवेक्ष्य जगतः पतिः अंशतोवतीर्णः सः अजेयः शिवच्छत्रपतिः जयति ।

**अर्थ :** पृथ्वीवर **'संपूर्ण धर्म'**च कलिकालरूपी सर्पाने ग्रासलेला आहे, हे पाहून जे व्याकुळ झाले ; आणि ज्या जगदीश्वराने अंशावतार धारण केला, असे ते अजिंक्य **श्रीशिवछत्रपती** (सदा) विजयी होवोत !

= Victorious is Shiva (Shivaji), the invincible Chhatrapati, (Lord of the umbrella), who is (none but) the lord of the world (i.e. God Vishnu) who has assumed a partial incarnation, having seen the whole religion in distress, as it was bitten by the venomous serpent in the form of the Kali age.

**१.१० : येन क्षोणितले कलावविकले बुद्धावतारं गते**
**गोपालेखिलवर्णधर्मनिचये म्लैच्छैः समासादिते ।**
**भूयस्तत्परिपालनाय सकलाञ्जित्वा सुरद्वेषिणः**
**स्वे स्वे वर्णपथे चिरेण विहिता विप्रादिवर्णाः क्रमात् ।।**

**अन्वय :** येन क्षोणितले कलावविकले बुद्धावतारं गते गोपाले-
अखिलवर्णधर्मनिचये म्लेच्छैः समासादिते, सकलान्
सुरद्वेषिणः जित्वा भूयः तत्परिपालनाय विप्रादिवर्णाः
स्वे स्वे वर्णपथे क्रमात् चिरेण विहिता ।

**अर्थः** या धरतीवर कलियुग पूर्णपणे अवतरले होते. बुद्ध अवताराची समाप्ती झाली होती. सर्व धर्मांचा जणू काही राशीच असा कृष्णावतारही संपून गेला होता. सर्वत्र म्लेच्छांनी काहूर माजविले होते. अशावेळी देवाधर्मांचा द्वेष करणाऱ्या लोकशत्रूंना जिंकून पुन्हा पृथ्वीचे रक्षण करण्याच्या हेतूने त्यांनी **(छत्रपती श्रीशिवरायांनी)**

सर्व लोकांना (विद्वज्जनादि सर्वांना) आपापल्या कर्तव्यकर्मांच्या व्रतांच्या परिपूर्तीच्या मार्गी लावले.

= Shiva(Shivaji) - who in the course of the Buddha incarnation of Gopala, while Kali was yet in his full strength on earth, (lit. had not yet declined), set up all the peoples on a firm foundation in their respective walks of life, by vanquishing the enemies of the gods,-with a view to protect and revive the mankind religion, which had been violently disturbed by the Mlechchas.

**१.११ : आकर्णाटकदेशतो गिरिवरे सह्येप्यसह्ये परै–**
**दुर्गाणि क्षितिपालनाय नृपतेर्योबागलाणावधि ।**
**आकृष्णातटमासमुद्रमभित: कृत्वा कृती दुर्गमे**
**दुर्गेरायरिसंज्ञकेविजयते भूमीभृतामग्रणी: ।।**

**अन्वय:** आकर्णाटकदेशत: बागलाणावधि परै: असह्ये अपि सह्ये गिरिवरे दुर्गाणि क्षितिपालनाय (कृत्वा) आकृष्णातटम् आसमुद्रम् अभित: कृती कृत्वा रायरिसंज्ञके दुर्गमे दुर्गेय: भूमीभृताम् अग्रणी: नृपति: विजयते ।

**अर्थ:** कर्नाटक देशापासून ते बागलाण देशापर्यंतचे अभेद्य दुर्गच असे अनेक किल्ले छत्रपती श्रीशिवरायांनी सह्याद्री पर्वताच्या उत्तुंग अशा शिखर–माथ्यांच्या भागांवर जागोजागीं बांधून काढले. त्यामागचा उद्देश म्हणजे या पृथ्वीचे रक्षण हा होता. त्यांच्या यशस्वी नेतृत्वाने कृष्णा नदीच्या काठापासून ते समुद्राच्या दिशांसभोवती त्यांनी किल्ले बांधले. विजयी आणि सर्व राजांमध्ये अग्रेसर असे राजे छत्रपती श्रीशिवाजी महाराज रायरी (रायगड) किल्ल्यात (वास्तव्यास) राहिले.

= Having built frotresses for the protection of the earth on the best of the mountains inaccessible to the enemies, though called 'Sahya', between Karnataka on the one hand and Bagalana on the other and between the river Krishna and the ocean western, he, the foremost among the kings, reigns victorious in the inaccessibe fort called Rairi (or Raigad).

**१.१२ : आपूर्वाचलपश्चिमाम्बुधिमथाप्यासेतुशीताचलं**
**निर्जित्यावनिमण्डलं च करदीकृत्याखिलान्भूमिपान् ।**
**श्रौतं धर्ममवाप्य सद्भिरुदितं राजाभिषेके परं**
**छत्राद्यैर्नृपलक्षणैरनुदिनं सिंहासने राजते ॥**

**अन्वय :** आपूर्वाचलपश्चिमाम्बुधिम् आसेतुशीताचलम् अवनिमण्डलं निर्जित्य, अखिलान् भूमिपान् करदीकृत्य च, श्रौतं धर्मम् अवाप्य राजाभिषेके छत्राद्यैः नृपलक्षणैः सद्भिः उदितं सिंहासनं अनुदिनं परं राजते ।

**अर्थ :** पूर्वेकडील पर्वतांपासून ते पश्चिमेकडील समुद्रांपर्यंत, तसेच दक्षिणेकडील रामेश्वरच्या सेतूपासून ते हिमालयापर्यंत असलेल्या अनेक राजांना छत्रपती शिवरायांनी जिंकून घेतले, जिंकून घेतलेल्या सर्व राजांकडून जिंकलेल्या भूभागाचा शेतसारा म्हणून खंडणी म्हणजे भूखंड वापराबद्दलचा कर घेतली. सर्व राजांना आपल्यासाठी कर देण्यास भाग पाडले. विद्वज्जनांनी घालून दिलेल्या श्रौत(श्रुति=वेद) वैदिक धर्माचा अवलंब करून त्यांनी (**छत्रपती श्रीशिवरायांनी** किल्ले रायगडावर) स्वतःचा **राजाभिषेक** करविला; छत्र–चामरे आदि राजचिन्हांसह ते प्रतिदिन राजसिंहासनावर शोभून दिसू लागले.

= He conquered the whole of the earth from the eastern mountain to the western ocean and from the Ram-Setu (Adam's Bridge-?) to the mountain of cold (i.e. the Himalayas), and made all princes pay tribute to him. Having learnt the duties prescribed by the shrutis declared to him by the learned, he shines, day by day, on his throne, after the Coronation ceremony, by means of such symbols of royalty as the 'Chhatra' etc.

**१.१३ : नानादेशसमागतान् द्विजवरान्येनाभिषेकोत्सवे ।**
**संतर्प्यातुलतोलितैर्बहुधनैर्वस्त्रैर्गजैर्वाजिभिः ।**
**चन्द्रप्रेरितचन्द्रिकेव विमला गेया बुधैर्बन्दिभिः**
**कीर्तिः सर्वदिगन्तरेषु जयिना विस्तारिता भूभृता ॥**

**अन्वय :** येन भूभृता अभिषेकोत्सवे नानादेश समागतान् द्विजवरान् आतुलतोलितैः बहुधनैः वस्त्रैः गजैः वाजिभिः संतर्प्य

चन्द्रप्रेरितचन्द्रिका इव षिमला, बुधैः बन्दिभिः गेया कीर्तिः
सर्वदिगन्तरेषु जयिना विस्तारिता।

**अर्थ :** छत्रपती श्रीशिवाजी महाराजांच्या राजाभिषेक महोत्सवाचे वेळी (श्रीशिवराजाभिषेक संपन्न – ज्येष्ठ शुक्ल १३ (त्रयोदशी) शके १५९६ ता. ६ जून १६७४ श्री शिवराजाभिषेक शक कालगणनेचा प्रारंभ) निरनिराळ्या देशांतून, प्रांतांतून जे श्रेष्ठ विद्वज्जन (द्विजवर) आले होते त्यांना छत्रपतींनी अतुलित (न तोलता, न मोजता) धन देऊन, तसेच वस्त्रे, हत्ती, घोडे यांचीही दाने देऊन संतुष्ट केले. चंद्रबिंबापासून विमल धवल चांदण्याचा प्रसार व्हावा, त्याप्रमाणे त्या जयीविजयी श्रीशिवाजी राजांनी चतुर भाटगणां(शाहिरां)कडून आपली कीर्ती सर्व दिशांना विस्तारविली.

= Who being a victorious prince, satisfied, on the festive occasion of his coronation, the honourable Dvijavaras, (learned persons) who had come from different places, with countless gifts of coins, garments, elephants and horses; and thus spread in all directions his fame, fit to be sung by gods and resembling in its purity, the lustre, which shoots out from the Moon.

**१.१४ : सोयं यस्य गडो नरेन्द्रवहितैः प्रासादहर्म्यैरट्टे (?)**
**म्यरापपा (रम्यैरापण?) चत्वरैश्च परितः पूर्णेः सरोभिर्नवैः ।**
**विद्वद्वैदिकवैद्यवर्यगणकैराद्यैश्च सन्मन्त्रिभिः ।**
**सैन्यैश्चापि चतुर्विधैरगणितैर्भाति प्रतापान्वितैः ।।**

**अन्वय :** सः अयं गडः, नरेन्द्रवहितैः प्रसादहर्म्यैः अट्टैः, रम्यैः आपणैः चत्वरैः च परितः, नवैः सरोभिः पूर्णैः, विद्वत्– वैदिक– वैद्यवर्य– गणकैः आद्यैः, सन्मन्त्रिभिः चतुर्विधैः सैन्यैः च अगणितैः प्रतापान्वितैः भाति।

**अर्थ :** अशा त्या श्रीशिवाजी राजांच्या रायगड किल्ल्यावर सभोवती राजप्रासाद आहेत; ज्यांमध्ये श्रीशिवाजी राजे राहतात. तेथे उत्तुंग व विशाल वास्तू आणि सुंदर बाजारपेठा असणारे चौक आहेत. सभोवती पाण्याने तुडुंब भरलेली बांधीव तळी व सरोवरे आहेत. त्या (राय)गडावर विद्वान्, पंडित, वेदज्ञ, श्रेष्ठ वैद्य, श्रेष्ठ

दर्जाचे कुशल मंत्री, (रथदल, गजदल, अश्वदल, पायदळ अशी चार प्रकारची) चतुरंग दले आणि असीम व अपार पराक्रमी वीरांचे प्रताप या सर्वांमुळे तो रायगड किल्ला शोभायमान झालेला आहे.

= He it is whose fort shines with palaces and mansions in which princes dwell, with arches and beautiful market-squares, with new lakes filled with water all around, with learned priests, physicians and astrologers, with honest hereditary ministers and with the numberless brave armies of four kinds. ('चतुरंग सेना',)

**१.१५ : तस्यात्मजः शंभुरिति प्रसिद्धः समस्तसामन्तशिरोवसन्तः । (वतंसः) ।**
**यः काव्यसाहित्यपुराणगीतकोदण्डविद्यार्णवपारगामी ।।**

**अन्वय :** तस्य समस्तसामन्तशिरोवसंतः आत्मजः, यः काव्यसाहित्यपुराणगीतकोदण्डविद्यार्णवपारगामी शंभुः इति प्रसिद्धः ।

*** श्रीशंभु राजे : आत्मगौरव**
**('यः काव्यसाहित्यपुराणगीतकोदंडविद्यार्णवपारगामी !')**

**अर्थ :** त्या छत्रपती श्रीशिवाजी महाराजांना 'शंभू' नामक एक विख्यातकीर्ती पुत्र आहेत; 'समस्तसामन्तशिरोवसन्त' म्हणजेच सर्व सामंत (मांडलिक अंकित जिंकलेल्या) राजांच्या मस्तकांवर ऋतुराज वसंतऋतूच्या वैभवाप्रमाणे मुकुटमण्यासारखे शोभून दिसत आहेत.

काव्य, साहित्य, पुराणे, गीत, धनुर्विद्या या सर्व शास्त्र–कला–विद्यासागरांना ते पार करून गेले आहेत, अर्थात्, ते या सर्व विद्यांमध्ये निष्णात आहेत.

= His son who is not only the crest jewel of all the fudatory chiefs but also 'Vasanta' - the spring; vernal season; among them (for them) and who is well versed in (lit. has crossed the ocean in the form of) Poetry, Rhetoric, Puranas, Music and Archery, is famous by the name 'Shambhu.'

..........................................................

**❒ टीप : 'ऋतूनां कुसुमाकर: अस्मि अहम् ।' (गीता – १०.३५)**

: जक्षाच्या इतिहासातील पहिले चतुर राजनीतिमुत्सद्दी, दंडप्रणेते, सुदर्शन चक्रधारी भगवान श्रीकृष्णांनी स्वत:ला सहा ऋतूंतील प्रथम (पहिला ऋतू, मधू (चैत्र) व माधव (वैशाख) या दोन महिन्यांतील प्रत्यक्ष 'वसंतऋतू' तो मीच (श्रीकृष्ण) होय, असे म्हटले आहे.

आणि हेच सर्वश्रेष्ठ प्रजानुरागी आणि चिरंतन व शाश्वत वचन राजनीतिपारंगत छत्रपती श्रीसंभाजी राजे यांनीही स्वत:विषयी उच्चारलेले आहे ;

– ''समस्त सामन्त शिरोवसन्त:।'

येथे छत्रपती संभाजींची काव्यप्रतिभा श्रीकृष्णांच्या काव्यप्रतिभेची अनुगामिनी शोभते आहे. हे या छत्रपतींचे अनुपमेयत्व आहे. 'वसंत' या उल्लेखात निहित 'मदन' या शब्दाची भावगर्भ अर्थच्छटाही 'मनमोहन' त्या श्रीकृष्णांच्या व्यक्तित्वाशी जवळीक सांगणारी, सिद्ध करणारी आहे. 'वसंत' व 'मदन' दोघेही 'पीयूषवर्षी' आहेत, अमृताचा वर्षाव करणारे आहेत.

: (cupid/the God of love) : **'वसंत'चे पर्यायी शब्द –**

मन्मथ, कंदर्प, दर्पक, अनंग, काम, कामदेव, मदन, मार, पंचशर, पंचबाण, पुष्पधन्वा, पंचधन्वा, स्मर, मनसिज, रतिपती, मकरध्वज आत्मभू, प्रद्युम्न, शंबरारी, मीनकेतन, झषकेतन, कुसुमेषु अनन्यत्र: ।, इत्यादी १९ नांवे 'अमरकोश' या ग्रंथात उपलब्ध होतात.

सात्वाहन नृपती (इ.स.पू. २५० सुमारे महाराष्ट्र, पैठण राजधानी), 'दक्षिणापथपती', 'राजराज गौतमीपुत्र श्रीसात्कर्णी' हा स्वत:स आपल्या शिलालेखात, 'खतियदपमानमदनस्।' (=''मी दर्प आणि मानयुक्त पंचशरधनुर्धर क्षत्रिय योद्धा मदनच (जसा) क्षत्रिय (नृपती) आहे.'' – असे म्हणवितो.

या दृष्टीने भोसले नृपती हे सात्वाहनांचे वारसदार वंशजच ठरतात.

कंदर्प (मदन) हा जन्मल्याबरोबर मोठ्याने आव्हान देत गरजला होता की,

''कं दर्पयामि ?' =''मी आता कोणाच्या दर्पाचे घमेंडीचे दमन, मर्दन करू ? – ते मला सांगा.'' असा अर्थ घेता पुढील अर्थही ध्यानात घ्यावा लागतो –

– ''मी कोणाचे ठायीं 'मद' (=दर्प) निर्माण करू ?''

**''कं दर्पयामि इति मदाज्जातमात्रौ जगाद च ।**
**तेन 'कंदर्प' नामानं तं चकार चतुर्मुखः ॥''**

जो 'मदन' पर्यायाने तोच 'वसंत' हा सर्वश्रेष्ठ, अजेय, अजिंक्य, सर्वविजेता क्षत्रिय आहे, अद्वितीय धनुर्धर आहे. त्याने भल्याभल्यांना, (ब्रह्मा–विष्णू–महेश यांनाही) जिंकले आहे. तो सर्वांच्या मनांवर अधिराज्य गाजवितो आहे.

प्रभु रामचंद्र, सीतेला म्हणतात, ''**महाराष्ट्र हा मदनाचा देश आहे.**''– म्हणजेच क्षत्रियांचा, शस्त्रधारींचा, योद्ध्यांचा, कुंत/भालाधारींचा देश, याचा अर्थच = मराट्ट, मऱ्हाट्ट = 'क्षत्रिय' हा आहे. (मरः = भूलोक, अट्ट = चक्राकार फलकास्त्र. म्हणून 'मराठा' म्हणजे, 'भूलोकींचे चक्राकार फलकास्त्रच' होत. स्वर्लोकातील चक्राकार फलकास्त्र म्हणजे 'सुदर्शन चक्र', आकाशातील चक्राकार फलकास्त्र म्हणजे 'सूर्यबिंब' ! आणि पृथ्वीतलावरील (या सर्व जगतातील) चक्राकार फलकास्त्र म्हणजे शस्त्रधारी क्षत्रिय योद्धा म्हणजेच 'मराठा' (जनलोकवृंद) होत.

आणि, म्हणूनच सात्वाहन राजा गौतमीपुत्र श्रीसात्कर्णीने उपरोक्त शिलालेखात स्वतःविषयी म्हटले आहे की, –'खतियदपमानमदनस्', 'मी क्षत्रिय राजा, दर्पमान (दर्पसंपन्न) मदन' आहे. (दर्प आणि मान यांनी परिपूर्ण शक्तिशाली (क्षत्रिय) नृपती आहे.)

: ('सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप यांचे कोरीव लेख डॉ. वा. वि. मिराशी, १९७९, प्रका. म. रा. सा. सं. मंडळ, मुंबई लेखविभाग, पृ. ४३ ते ४५)

– त्याचबरोबर तो नृपती स्वतःस – १. 'एकसूरस' (=अद्वितीय शूर योद्धा), २. 'एकधनुधरस' (=अद्वितीय धनुर्धर), ३. 'एककुसस'; अद्वितीय श्रीरामपुत्र राजा 'कुश'; ('एककुशेशयस्, अद्वितीय देवसेनापती स्कंद), ४. 'एक बम्मनस्' अद्वितीय, सर्वश्रेष्ठ प्रजाप्रतिपालक मी आहे, असेही म्हणवितो.

### ❑ संभाजी महाराज यांची जन्मतिथी :

ता. १४ मे १६५७, ज्येष्ठ शु. १२ (द्वादशी) गुरुवार, शके १५७९, हेमलंबी संवत्सर.

: ('श्रीशिवाजी महाराजांची बखर' 'श्रीशिवदिग्विजय', १८९५, बडोदे.
संपा. पांडुरंग रामचंद्र नंदुरबारकर आणि लक्ष्मण काशिनाथ दांडेकर/इ.स. १८९५ (शके १८१७) भाद्रपद शु. ४.

❐ (पृ. २०५).

❐ ''श्रीशिवराय यांच्या ज्येष्ठ पत्नी, शिर्के यांची (??) कन्या सौभाग्यादिसंपन्न सईबाई साहेब यांस पुत्र जाला :–

''शाके पत्रि शशांक, सप्त नवके श्रीहेमलंब्यब्दके।

५ १ ७ ९

← : →

: (अंक वाचन)(=१५) (अंकवाचन) = ७९।= १५७९ शके).

**स्वातौ ज्येष्ठक नाम्नि जनितो (?) राज्ञः शिवाजी स्त्रियः ।।**
**द्वादश्यां शुभलोचनो नरपतिः संभाभिदो, वासरे –'भौमे' पक्षसिते यदीय यशसा व्याप्ताः समस्ता दिशाः ।।१।।**

'' शके १५७९, हेमलंबी नाम संवत्सर–वर्षीं, ज्येष्ठ महिना, शुक्ल पक्ष, (द्वादशी, शु. १२) 'गुरुवारी'. (चुकीची नोंद 'मंगळवारी').
स्वाती नक्षत्र असताना, सईबाई साहेब यांस पुत्ररत्न प्राप्त झाले.''

❐ टीप : (१) वरील श्लोकात 'भौमे'मुळे 'मंगळवारीं' असा शब्द छापला गेला आहे. 'मंगळवारीं' हा 'भौमे' चा अर्थ घेतला गेला आहे. मात्र त्या तिथीला 'मंगळवार' नव्हता; तर– 'गुरुवार' होता.

(२) 'भूमी' (=पृथ्वी)शी संबद्ध (='पृथ्वीचे अपत्य' म्हणून, 'भूमीचे अपत्य' म्हणून, 'भौम', 'भौमे' असा शब्द श्लोकात वरीलप्रमाणे आहे. परंतु – ह्या दिवशी 'स्वाती' नक्षत्र नव्हते. म्हणजेच– 'बृहस्पती' हाही 'भूमीचे अपत्य' बनून, त्याने पृथ्वीची धार काढून ते दूध प्राशन केले. त्यावरून 'भौम'चा 'अर्थ 'बृहस्पतीचा' वार, तो 'गुरुवार', 'गुरुवासर' होय.

* ('शेडगांवकर भोसले बखरी'त – ''शके १५७९, हेमलंबी संवत्सर, ज्येष्ठ शुक्ल १० 'मंगळवार', अशी नोंद आहे, हा वार चूक असून, त्या दिवशी 'गुरुवार' (बृहस्पती वार) होता; आणि – ज्येष्ठ शु. १२.)

..............................................

**१.१६ : विविच्य शास्त्राणि पुरातनानामादाय तेभ्यः खलु सोयमर्थम् ।**
**करोति सद्ग्रन्थममुं नृपालः स शम्भुवर्मा बुधभूषणाख्यम् ।।**

स शम्भुवर्मा नृपालः पुरातनानां शास्त्राणि विविच्य, तेभ्यः अयम् अर्थम् आदाय बुधभूषणाख्यं अमुं ग्रन्थं करोति ।

प्राचीन ज्ञात्यांनी, विद्वानांनी अनुभवांच्या आधारे प्रचारात आणलेल्या शास्त्रांचे यथायोग्य विवेचन करून, त्यांतून योग्य तो (लोकहितकारी) अर्थ–बोध घेऊन (आम्ही राजे शंभुवर्मन् यांनी) प्रस्तुतचा हा **'बुधभूषण'** नांवाचा महत्त्वाचा ग्रंथ लिहिला आहे.

= That King Shambhuvarman is compiling this excellent book, (titled 'Budha-Bhushan') having carefully read the works of the ancient writers and having taken his material from them.

.............................................................................

❐ टीप : 'बुध' म्हणजे 'देव' आणि 'देव' म्हणजे राजा, क्षत्रिय राजा.
'बुधभूषण' म्हणजे 'देवांचे भूषण', म्हणजेच, 'क्षत्रिय–राजांचे भूषण'.
'बुध' म्हणजे पर्जन्यदेवता इंद्र, क्षत्रियांचे आराध्य दैवत इंद्र, युद्धदेवता, चंद्र. इंद्र ! 'आदित्यात् जायते वृष्टिः।।' आदित्य म्हणजे सूर्य. आदित्य म्हणजे इंद्र ! यांच्यापासून पाऊस निर्माण होतो. यांना 'नैषधीयचरितम्' मध्ये महाकवि हर्षाने, 'बुधाः देवाः।' म्हटलेले आहे. अशा, 'तेजोमय क्षत्रिय वीर राजांचे भूषण' म्हणजे प्रस्तुतचा 'बुधभूषण' ग्रंथ होय.

.............................................................................

**१.१७ : विविच्य सन्तः कृतिमस्मदीयां गृह्णन्तु सच्चासदसच्च जन्तु**
(त्यजन्तु) ।
**क्षीराावियुक्तं परिहृत्य नारीं (नीरं) क्षीरं भजन्ते खलु राजहंसाः ।।**
: (नारी (स्त्री.) = माडाची मदिरा)

अस्मदीयां कृतिं सन्तः विविच्य सत् च गृण्हन्तु, असत् च त्यजन्तु क्षीराावियुक्तं नीरं परिहृत्य राजहंसाः खलु क्षीरं भजन्ते।

ग्रंथकर्ते छत्रपती संभाजी राजे जाणकार विद्वानांना उद्देशून म्हणतात की, आमच्या या ग्रंथाचे जाणत्या अशा त्या त्या विद्वज्जनांनी परिशीलन करावे. (आणि) त्यातील (सदंश) सत् अंश म्हणजे चांगला व उपयुक्त असा हितकारक बोध ग्रहण करावा, आणि (असदंश) असत् अंश टाकून द्यावा. **'नीर-क्षीर'** म्हणजे पाणी आणि दूध यांच्या मिश्रणांतील जे 'पाणी' ते सोडून देऊन राजहंस, फक्त 'दूध' तेवढेच ग्रहण करतात. जाणत्यांनी (इथे) 'नीर-क्षीर-विवेक' 'न्याय' नीतीचा अवलंब करावा.

= May the wise accept what is good and give up what is bad having carefully gone through our work; Rajahamsas indeed accept (only) milk, having abandoned water mixed with it.

..........................................................

❒ 'विद्वान् सर्वत्र पूज्यते।' या उक्तीनुसार विद्वान छत्रपती श्रीसंभाजी राजांच्या मनातील विद्वज्जनांविषयीचा आदरभाव आणि विश्वास आणि विनम्रता या गुणांची ओळख पटते. नीर-क्षीर न्यायाच्या दिल्या गेलेल्या दाखल्यावरून त्यांच्या संस्कृत व्यासंगाचा परिचय होतो.

..........................................................

### ❒ भवानीची स्तुती

निर्विघ्नसमाप्तये श्रीभवान्याः स्तुतिं स्वकृतामाह –

।। निर्विघ्न समाप्तीसाठी केलेली श्री भवानीची स्तुती अशी आहे.।।

**१.१८ : स्फटिकरचितपीठे श्यामलाङ्गीं भवानी-**
**मरुणचरणकान्तिं भासयन्तीं स्वरूपम् ।।**
**नखमणिगुणयुक्ता अङ्गुलीर्भासयन्तीं**

विजितसितगरुद्भिर्नूपुरैर्गुल्फयुग्मम् ॥

स्फटिकरचितपीठे अरुणचरणकान्तिं स्वरूपं भासयन्तीं श्वामलाङ्गीं, नखमणिगुणयुक्तां, विजितसितगरुद्भिः नूपुरैः अङ्गुलीः भासयन्तीं गुल्फयुग्मं भवानीम्।

: ('**बुधभूषण**' या ग्रंथाच्या निर्विघ्न परिपूर्तीसाठी आम्ही स्वतः रचना करून श्रीभवानी देवीची स्तुती करीत आहोत असे छत्रपती संभाजी महाराज म्हणतात.

स्फटिकाने बनविलेल्या चरणपीठावरचे शामलांगी भवानीमातेचे लालस चरण तिच्या पायांच्या बोटांवरील नखरूपी मणि-रत्नांच्या कांतीने शोभून दिसत आहेत. शुभ्रधवल पंख असणाऱ्या हंस पक्ष्यांनाही आपल्या मंजुळ किणकिणीने पराभूत केले आहे, अशा भवानीमातेच्या चरणांतील नूपुरांच्या तेजोमय स्पर्शसान्निध्यामुळे तिच्या पायांचे दोन्ही घोटे प्रकाशमय बनले आहेत.)

**१.१९ : पद्मरागारुणश्रीकशिरःपुष्पेण शोभिताम् ।**
**हृतशीतांशुतेजस्कमुक्ताचन्द्रोपशोभिताम् ॥**

पद्मरागारुणश्रीकशिरः पुष्पेण शोभितां,
हृतशीतांशुतेजस्कमुक्ताचन्द्रोपशोभितां (भवानीम्)।

पद्मरागमण्यांच्या (लाल रत्नांच्या) कांतीप्रमाणे अरुण रंग असलेली लालसर कोमल पुष्पे तिने आपल्या विपुल केशसंभारात खोचल्याने ती श्रीभवानी देवी अधिकच शोभून दिसत आहे. ज्या मणी-मोत्यांनी चंद्राची कांती हरण केली आहे, अशा मणिमोत्यांनी अलंकृत व श्रीशिवजींच्या मस्तकीं शोभायमान चंद्रकोरीच्या सान्निध्यात ती अधिक प्रियदर्शिनी बनली आहे. ज्यांनी चंद्राची कांती हरण केली आहे अशा मणि-मोत्यांच्या अलंकारांनी अलंकृत भवानीमातेच्या कांतीपुढे चंद्राचे (श्रीशिवजींच्या मस्तकावरील चंद्रकोरीचे) तेजही फिके पडले आहे.

**१.२० : अतीव सुकुमाराङ्गीं प्रोल्लसच्चूर्ण(स्वर्ण)कुण्डलाम् ।**
**भ्रूवल्लिभङ्गिसौन्दर्यजितकामशरासनाम् ॥**

अतीव सुकुमाराङ्गीं, प्रोल्लसच्चूर्णकुण्डलां,
भ्रूवल्लिभङ्गिसौन्दर्यजितकामशरासनाम् (भवानीम्)।

= भवानीमाता अतिशय कोमलांगी आहे. आंदोलित होणारी तिची सुवर्ण कर्णकुंडले तेजाने चमकत आहेत. सावरीच्या वेलीप्रमाणे बाकदार असणाऱ्या श्रीभवानीदेवीच्या भृकुटी-लतेच्या मोहक (भ्रूविलासांनी) हालचालींनी तिने मदनाच्या धनुष्यासही पराभूत केले आहे. (जिंकून घेतले आहे.)

.............................................................

❒ **''प्रोल्लसच्चूर्ण (स्वर्ण) कुंडलम् !''** - यामध्ये अर्थांच्या, पुढील दोन छटांच्या शक्यताही जाणवतात :-

(१) प्रोल्लसत्+चूर्ण। चूर्ण म्हणजे कापूर, चंदन इत्यादी सुगंधी द्रव्यांचा चुरा. (मेघदूत.६८)।
म्हणून - **'चूर्ण कुंडला'** म्हणजे **'सुगंधित चूर्णमज्जित (चूर्णलेपित) कुंडलधारिणी.**

(२) **'कुंडला'**चा पाठभेद **'कुंतला'** असा स्वीकारला, तर-
''**चूर्णकुंतला**'' म्हणजे **कुरल (कुरळा) केशसंभारधारिणी.**''

(३) **'चूर्णकुंतला' म्हणजे कर्पूर, चंदन आदि सुंगंधी द्रव्यांनी सुगंधित असा घन, विपुल, सुलम्ब केशकलापधारिणी' - शंभुपत्नी येसूराणी**
**(!) : 'ईशा'राणी !**

**१.२१ : मदिरामदसंघूर्णमदिराक्षीं मदालसाम् ।**
**निर्मलादर्शसंदर्शकपोलकफल(फलक)प्रभाम् ।।**

मदिरामद संघूर्णमदिराक्षीं मदालसां,
निर्मलादर्शसंदर्शकपोलकफलप्रभाम् (भवानीम्)।

= श्रीभवानी मातेच्या निर्मळ आरशाप्रमाणे असणाऱ्या मांसल (पुष्ट) गालांवर त्या मदिराक्षीचे (श्रीभवानीचे) मदिरेच्या अंमलांनी (प्रभावाने) जडावलेले

विलोल नेत्र गरगर फिरत आहेत ! मदिरामदाच्या धुंदीमुळे ती आळसावली आहे.

**१.२२ : विलसद्भालतिलकां मुक्तागुणसमन्विताम् ।**
**विभासद्रत्नसंयुक्तां कर्णभूषणशोभिताम् ॥**

विलसद्भालतिलकां मुक्तागुणसमन्वितां, विभासद्रत्नसंयुक्तां कर्णभूषणशोभिताम् (भवानीम्) ।

श्रीभवानीमातेच्या कपाळावरील रक्तिम कुंकुमतिलक शोभून दिसत आहे. तिने गळ्यात मोत्यांची माळ धारण केली आहे. चमकत्या तेजस्वी रत्नांनी तिचे शरीर अलंकृत झालेले आहे; तिच्या कर्णपाळ्या अलंकारांनी सुशोभित झालेल्या आहेत. (तिने कानांमध्ये 'कर्णभूषणे', अनेक अलंकार धारण केले आहेत.)

**१.२३ : नानालंकारसंयुक्तां नासान्यस्तमयूरिकाम् ।**
**पूर्णेन्दुहृद्यवदनां प्रवालतुलिताधराम् ॥**

नानालङ्कारसंयुक्तां नासान्यस्तमयूरिकां, पूर्णेन्दुहृद्यवदनां, प्रवालतुलिताधराम् (भवानीम्) ।

तिने (श्रीभवानीदेवीने) तऱ्हेतऱ्हेचे अनेक अलंकार धारण केले आहेत, तिच्या नाकामध्ये मयूराकृती 'मयूरिका' नथ आहे. तिचे मुखकमल पूर्ण चंद्राप्रमाणे चित्तासाठी आकर्षक व आल्हाददायक आहे. तिचे अधरद्वय (दोन्ही ओठ) प्रवाळरत्नांप्रमाणे नितळ लालसर व तेजस्वी आहेत. जणू काही ते प्रवाळ मण्यांच्या तेजोमय चंचल रंगकांतीशी विजयसिद्धीपूर्ण स्पर्धाच करणारे आहेत.

**१.२४ : सुवर्तुलस्तनद्वन्द्वमुक्ताकञ्चुकिकावृताम् ।**
**चतुर्भुजां पद्महस्तां पद्मनेत्रविराजिताम् ।।**

सुवर्तुलस्तनद्वन्द्वमुक्ताकञ्चुकिकावृतां,
चतुर्भुजां, पद्महस्तां, पद्मनेत्रविराजिताम् (भवानीम्) ।

श्रीभवानीदेवीचे सु–वर्तुळाकार स्तनद्वय मोतीगुंफल्या कंचुकीने आवृत (झाकले गेलेले) आहेत; ती चार बाहूंनी युक्त आहे. तिने हातात कमल धारण केलेले आहे. तिच्या कमळांसारख्या नयनांनी ती शोभून दिसत आहे.

**१.२५ : रतिरक्तां शम्भुकान्तां निम्ननाभिं तनूदरीम् ।**
**कृशमध्यां कृशाङ्गीं च ध्यानयोगासने रताम् ।।**

रतिरक्तां शम्भुकान्तां निम्ननाभिं तनूदरीं कृशमध्यां
कृशाङ्गीं ध्यानयोगासने रताम् (भवानीम्) ।

श्रीभवानीदेवी श्रीशिवजींची (शंकर) अर्धांगिनी रतिभावयुक्ता आहे. तिचा नाभिप्रदेश खोल (गहन गहिरा) असून, उदर समतल आहे. तिचा कटिप्रदेश कृश, बारीक असून तिची देहयष्टी शिडशिडीत आहे. ती ध्यानयोगाच्या आसनात स्थिर झालेली आहे.

**१.२६ : विलस(द्र)क्तवसनां रक्तकाञ्चीपरिवृताम् ।**
**विशा(ल)जघनां रम्यां सौन्दर्यौदार्यमन्दिराम् ।।**

विलसद्रक्तवसनां, रक्तकाञ्चीपरिवृतां, विशालजघनां, रम्यां, सौन्दर्योदार्यमन्दिराम् (भवानीम्) ।

तिने (भवानीने) परिधान केलेले लाल वस्त्र तिला शोभून दिसत आहे. तिने कमरेला रक्तवर्णी मेखला धारण केली आहे, तिची नाभितलअधोकटिसंलग्न जघनांगे कमनीय आहेत. ती (जणू काही) सौंदर्याचे व तनमनरमणानंदकारी औदार्याचे अप्रतिम असे सुरम्य मंदिरच आहे.

**१.२७ : सुवर्णरम्भां दम्भारि(?)म(मृ)दुलोरुविराज(जि)ताम् ।**
**कामेषुधिसुहृज्जङ्घां जानुयुग्मोपशोभिताम् ॥**

सुवर्णरम्भां, दम्भारिमृदुलोरुविराजितां, कामेषुधिसुहृज्जङ्घां, जानुयुग्मोपशोभिताम् (भवानीम्) ।

श्रीभवानीदेवी ही 'सुवर्णरंभा' अर्थात 'सोनकेळी'च्या सरळ नितळ उन्नत बुंध्याजशी आहे. दम्भारी म्हणजे दंभ हरण करणारी श्रीभवानीदेवी आपल्या कोमल परंतु इंद्रवज्रालाही पराभूत करणाऱ्या अशा मांड्यांच्या आधारावर डंवरलेल्या सोनकेळीच्या नितळ बुंध्याप्रमाणे शोभून दिसत आहे. मदनाच्या बाणांच्या भात्याशी स्नेहस्निग्ध स्पर्धा करणाऱ्या तिच्या मांड्या आणि पोटऱ्या सुशोभना आहेत. तिची देहशोभा वर्धिष्णू करण्यामध्ये तिच्या दोन्ही जानूंनी (गुडघ्यांनी) मोठा सहयोग दिलेला आहे.

**१.२८ : इति चन्द्रचूडरमणीस्तुतिमेणा (नां)**
**धरणीशशम्भुरचितामतिभक्त्या ॥**
**मनुजः पठेदनुदिनं स किलोच्चै-**
**र्भुवि भारतीजलधिजानिलयं स्या(त्) ॥**

इति धरणीशशम्भुरचितां चन्द्रचूडरमणीस्तुतिम् एनां (भवानीं) अतिभक्त्या मनुजः पठेत् । सः अनुदिनं उच्चैः भुवि**भारती-जलधिजानिलयं**स्यात् किल ।

अशा या श्रीशिवजींच्या रमणीचे म्हणजे श्रीभवानीदेवीचे स्तोत्र (भूमिपाल) नृपती शंभू राजे यांनी पराकाष्ठेच्या भक्तीने लिहिले आहे. जो मनुष्य हे **श्रीभवानी स्तोत्र** (१.१८ ते १.२८ = ११ एकूण) दररोज पठण करील, त्याला **समुद्रकन्या**

**(जलधि-जा) लक्ष्मीरूपी (श्रीभवानी) भारती** सरस्वतीच्या मंदिरीं म्हणजेच ज्ञान, विज्ञान, विद्या, प्रतिष्ठा, वैभव, कीर्ती अशा क्षेत्रांमध्ये उच्च स्थान प्राप्त करून देईल.

❒ ।। अथ प्राचीन नमस्कृति ।।

आता यापुढे, 'प्राचीन नमस्कृतीं'चा विचार

❒ **।। श्रीगणेश-वंदना ।।**

१.२९ : **चलत्कर्णानिलोद्धूतसिन्दूरारुणिताम्बर: ।**
**जय(त्य)काले विसृजन्सन्ध्यामिव गजानन: ।।**
: (... कालेपि/कालेऽपि सृजन्... ।)

सन्ध्यां विसृजन् इव चलत्कर्णानिलोद्धूतसिन्दूरारुणिताम्बर: गजानन: काले जयति ।

ज्याच्या कानांच्या फडफडण्याकारणाने उत्पन्न होणाऱ्या वाऱ्याच्या झोतांमुळे वर उधळल्या उसळल्या जाणाऱ्या शेंदुरामुळे आकाशदेखील लालेलाल होऊन राहते, आणि अशा रीतीने तो अवेळीच संध्यासमय (सांध्यकाल) निर्माण करतो, त्या गणपतीचा (गजाननाचा) विजय असो ! जयजयकार असो !

१.३० : **हरकण्ठग्रहानन्दमीलिताक्षीं नमाम्युमाम् ।**
**कालकूटविषस्पर्शजातमूर्च्छागता(मा)मिव ।।**
: (...मूर्च्छागमामिव/मूर्च्छागतामिव ।)

कालकूटविषस्पर्शजातमूर्च्छागतां इव हरकण्ठग्रहानन्दमीलिताक्षीं उमां नमामि ।

❒ **श्रीउमा-वंदना**

श्रीशिवांस (कंठाशी) आलिंगन दिल्यामुळे झालेल्या आनंदातिशयाने जिने आपले डोळे किंचित मिटले आहेत, आणि त्यामुळे (शिवाच्या कंठात असलेल्या)

कालकूट विषाच्या संपर्कामुळे तिला जणू काही मूर्च्छा आली आहे; अशा त्या उमेला मी नमस्कार करतो.

**१.३१ : चन्द्राननार्धदेहाय चन्द्रांशुसितकीर्तये ।** : (...सितमूर्तये..)
**चन्द्रार्कानलनेत्राय चन्द्रार्धशिरसे नमः ।।**

चन्द्राननार्धदेहाय चन्द्रांशुसितकीर्तये चन्द्रार्कानलनेत्राय चन्द्रार्धशिरसे (शंकराय) नमः ।

**❐ श्रीशंकर-वंदना :**

ज्यांचे अर्धेशरीर चंद्रमुखी श्रीपार्वतीदेवीने व्यापलेले आहे; ज्यांची कीर्ती चंद्राप्रमाणे शुभ्रधवल आहे; सूर्य, चंद्र व अग्नी हेच ज्यांचे तीन नेत्र आहेत; त्या, अर्धचंद्रकोर स्वमस्तकावर धारण करणाऱ्या श्रीशंकरांस माझा नमस्कार असो !

**१.३२ : तारानायकशेखराय जगदाधाराय धाराधर-**
**च्छायाधारककन्धराय गिरिजासङ्गैकशृङ्गारिणे ।।** : (..भृंगारिणे..। नतिः ।)
**नद्या शेखरिणे दृशा तिलकिने नारायणेनास्त्रिणे**
**नागैः कंकणिने नगेन गृहिणे नाथाय नित्यं नमः ।।**

नद्या शेखरिणे, दृशा तिलकिने, अस्त्रिणे नारायणेन, नागैः कङ्कणिने, नगेनगृहिणे, तारानायकशेखराय, जगदाधाराय, धाराधरच्छायाधारककन्धराय गिरिजासङ्गैकशृङ्गारिणे (तस्मै) **नाथाय** नित्यं नमः ।

तारकांचा नायक जो चंद्र त्यास ज्यांनी निजमस्तकावर धारण केले आहे, जे सर्व जगताचा आधार आहेत, ज्यांचा कंठ (मान) मेघांप्रमाणे कृष्ण रंगाचा (निळा) आहे, श्रीपार्वतीचा शृंगारसहवास हाच ज्यांचा एकमेव शृंगारविलास आहे, ज्यांच्या शिरीं गंगानदी (वास्तव्यास) आहे, ज्यांनी सुंदर तिलकलेपन केलेले आहे, ज्यांच्याजवळ नारायणअस्त्र आहे, ज्यांनी नागाचे वेटोळेच कंकणरूपात धारण केले आहे आणि ज्यांचा हिमालय पर्वताशी संबंध आल्याने (हिमालयकन्या

पार्वती अर्धांगिनी बनल्याने) जे गृहस्थ बनले आहेत. असे माझे नाथ श्रीशिवजी यांना मी नित्य वंदन करतो.

**१.३३ : नमस्तुंगशिरश्चुम्बिचन्द्रचामरचारवे ।**
**त्रैलोक्यनगरारम्भमूलस्तम्भाय शम्भवे ।।**

तुङ्गशिरश्चुम्बिचन्द्रचामरचारवे त्रैलोक्यनगरारम्भमूलस्तम्भाय शम्भवे नमः ।

उंच मस्तकचुंबी चंद्ररूपी चामरामुळे जे सुंदर दिसतात, जे त्रैलोक्यरूपी नगरप्रासाद रचनेचा आरंभाचा मूलस्तंभ आहेत. अशा त्या श्रीशिवजींस मी (आम्ही छत्रपती संभाजी) नित्य वंदन करतो.

**१.३४ : वामाङ्गीकृतवामाङ्गी कुण्डलीकृतकुण्डली ।** :(.. ङ्गि/..कुण्डली ।)
**आविरस्तु पुरो वस्तु भूतिभूत्यम्बराम्बरम् ।।३४।।**
: (.. वामांगि../..कुंडलि ।) : (.. दिगंबरम् ।)

वामाङ्गीकृतवामाङ्गी, कुण्डलीकृतकुण्डली, भूतिभूती, अम्बराम्बरमवस्तु, मे पुरः अविरस्तु ।

ज्यांच्या (श्रीशिवजींच्या) वाम अंगीं म्हणजे डाव्या बाजूला चारुगात्री (वामा) पार्वती बसलेली आहे, ज्यांच्या शरीरावर सर्प वेटोळी करून कुंडली मारून राहतात म्हणून ते 'कुंडली' किंवा 'कुंडलिन्' आहेत, ज्यांची विभूती, भस्मचूर्ण हीच भूती आहे, वैभव आहे; आणि अंबर (आकाश) हेच ज्यांचे (अंबर) वस्त्र आहे; अशी विचित्र (परम पुरातन) वस्तू (व्यक्ती) माझ्यासमोर प्रकट होवो ! मला दर्शन देवो!

..............................................................

❒ टीप : 'कुंडलिन्' = कुंडली = १. साप, २. शंकर,
: वस्तु = १. सत्य पदार्थ, २. सत्य गोष्ट.

..............................................................

**१.३५ : पिनाकपाणिबालेन्दुभस्ममन्दाकिनीयुता ।** : **(..फणिभाले..)**
: (..फणिबालेंदु../फणिभालेन्दु ।)

**तथापि भव ते मूर्तिरपवर्गानुसारिणी ।।**

: (पवर्गरचिता.. पवर्गप्रदास्तु वः ।)

पिनाकफणिबालेन्दुभस्ममन्दाकिनीयुता तथापि ते मूर्तिः अपवर्गानुसारिणी भव ।

हातामध्ये पिनाक नामक धनुष्य, गळ्यामध्ये सर्प, मस्तकावर बालचंद्र (चंद्रकोर), अंगाला भस्मविलेपन, मस्तकावर स्वर्गंगा मंदाकिनी यांनी युक्त अशी तुमची (श्रीशिवजींची) तनू सुशोभित झाली आहे; ती अपवर्गानुसारिणी मूर्ती, म्हणजेच 'मोक्षदायिनी' आहे. (शंकराजवळ कायम असणाऱ्या पांच वस्तूंची नावे 'प' वर्गातील अक्षरांनी सुरू होणारी आहेत. तथापि तो 'अ'–प वर्ग (= मोक्ष) देतो.

❑ **श्रीकृष्ण–वंदना :**

**१.३६ : पुञ्जीभूतं प्रेम गोपांगनानां**
**मूर्ति(र्ती) भूतं भागधेयं यदूनाम् ।।**
**एकीभूतं गुप्तचित्रं श्रुतीनां** : (..गुप्तवित्तं...)
**श्यामीभूतं ब्रह्म मे सन्निधत्ताम् ।।**: (...संनिध...)

गोपाङ्गानानां पुञ्जीभूतं प्रेम, यदूनां मूर्तीभूं भागधेयं, श्रुतीनाम् एकीभूतं गुप्तचित्रं, श्यामीभूतं (तद्) ब्रह्म मे सन्निधत्ताम् ।

गोपिकांचे संचित प्रेम; यादव कुलाचे शरीररूप धारण करणारे सौभाग्य, वेदांचे एकात्म गुप्तचित्र (रहस्यकथन) असे श्यामल वर्णाचे सावळे रूप धारण करणारे ब्रह्म साक्षात् श्रीकृष्णजी नित्य माझ्या सन्निध राहोत.

**१.३७ : नवनीलमेघरुचिरः पुरः (परः) पुमान्**
**अवनीमवाप्य धृतगोपविग्रहः ।।** : (पृथ्वीम् / विग्रहः / =देहः । गोपदेहः ।)
**नवनीतकीर्तिरमरैरपि स्वयं**
**नवनीतभिक्षुरधुना स चिन्त्यते ।।**

पुमान् पुरः, नवनीलमेघरुचिरः अवनिम् अवाप्य स्वयं धृतगोपविग्रहः, नवनीतकीर्तिः नवनीतभिक्षुः अधुना अमरैः सः चिन्त्यते।

ते (श्रीकृष्ण) सर्वश्रेष्ठ पुरुष, नवनील मेघाप्रमाणे शोभून दिसतात. त्यांनी पृथ्वीवर येऊन गोपालाचे (पृथ्वीपालकाचे, भूमिरक्षकाचे) शरीर धारण केले आहे; त्यांची कीर्ती पर्यायी अर्थाने ताज्या लोण्या(नवनीत)सदृश (स्निग्ध, स्वच्छ, धवलवर्णमयी) सर्वत्र, चिरंतनस्वरूपामध्ये पसरली आहे. स्वतः देव ('अमर') देखील, त्या नवनीत (लोणी) खाणाऱ्याचे चिंतन करतात.

१.३८ : **अतिविपुलं कुचयुगलं** : (कुंजयुगलं..)/(..कुजयुगलं..)
**रहसि करैरामृशन्मुहुर्लक्ष्म्याः।**
**तदपि हृतं निजहृदयं** : (तदपहृतं..)
**जयति हरिर्मृगयमाण इव ।।**

हृतं निजहृदयं मृगयमाण इव लक्ष्म्याः अति विपुलं
कुचयुगलं रहसि करैः मुहुः आमृशन् हरिः जयति।

**❒ श्रीविष्णू**

आपले स्वतःचे हृदयच जणू काही चोरीला गेलेले आहे, आणि आपण ते इथे तिथे जणू शोधीत आहोत, अशा बहाण्याने, वस्तुतः श्रीलक्ष्मीनेच ते चोरले आहे असे मानून श्रीलक्ष्मीदेवीच्या स्तनयुगलाच्या ठायीं आपल्या अपहृत हृदयाचा शोध घेणाऱ्या त्या श्रीहरी (श्रीविष्णू)चा जयजयकार असो ! ते नित्य विजयी आहेत !

❒ (मुहुः = वारंवार).

१.३९ : **मकरीविरचनभङ्ग्या राधाकुचकलशपीडनव्यसनी ।**
**ऋजुमपि लेखां लुम्पन्नटवरवेषो हरिर्जयति ।।**
: (.. रेखां लुम्पन्बल्लववेषो)

मकरीविरचनभङ्ग्या राधाकुचकलशपीडनव्यसनी, ऋजुम् लेखाम् अपि लुम्पन्, नटवरवेषः हरिः जयति।

(१) मकराकार रचना करण्याच्या मिषाने राधेच्या सुडौल, कलशाप्रमाणे

असणाऱ्या पुष्ट स्तनांचे श्रीकृष्णजी मर्दन करतात, त्यावेळी संलग्न स्तनद्वयामुळे (मधली) सरळ रेषादेखील नाहिशी करतात, असे ते धूर्तपणे (राधेला हवीहवीशी) पीडा देणारे हरी **(श्रीकृष्णजी)** विजयी आहेत.

(२) मकरीचे चिन्ह रेखाटण्यात बाधा निर्माण करीत असलेल्या राधेच्या स्तनयुगुलास मर्दन संवाहनाने पीडा देण्यात रस असलेल्या (आणि तशीच राधेचीही इच्छा असलेल्या)श्रेष्ठ नाटकी हरीचा जयजयकार असो !

**१.४० : खिन्नोसि मुञ्च शैलं बिभृमो** : (खिन्नोऽसि..) : (बिभृमो/धारयाम: ।)

**वयमिति वदश्सु(त्सु) शिथिलभुज:।**

**गिरिवरभुग्नविततबाहुसु गोपेषु हसन्हरिर्जयति ।।**

: (गिरिभरभुग्नविनत..)

खिन्न: असि। शैलं मुञ्च, वयं बिभृम:। इति वदत्सु गिरिवरभुग्नविततबाहुसु गोपेषु हसन् शिथिलभुज: हरि: जयति।

(१) ''हे श्रीकृष्ण ! आपण आता दमलेले आहात, आपण आपल्या करंगळीवर तोलून धरलेला गोवर्धन पर्वत आता आम्ही पेलून धरू, (आपण करंगळी काढून घ्यावी), पर्वत सोडून द्यावा.'' अशी सर्व गोपांनी विनंती केल्यानंतर श्रीकृष्णांनी पर्वताखालची आपली हाताची करंगळी (किंचित) ढिली केली. त्यावेळी गोपजनांनी लाखो हातांनी तो गोवर्धन तोलून धरला. त्यावेळी त्यांच्या संघटनकौशल्यांकडे गौरवपूर्ण नजरेने पाहून कौतुकाने हसत असलेले श्रीहरी (श्रीकृष्ण) विजयी होवोत !

((२) ''...श्रीकृष्णांनी किंचित हात (करंगळी) सैल सोडताच श्रेष्ठ गोवर्धन पर्वताच्या प्रचंड भाराने ज्यांचे हात डळमळीत झालेत अशा गोपजनांना पाहून मिश्किलपणे हसणाऱ्या त्या श्रीकृष्णांचा जयजयकार असो.!''

**१.४१ : वेदानुद्धरते जगन्निवहते भूगोलमुद्बिभ्रते** : (..मुद्बिभ्रते।)

**दैत्यं दारयते बलिं छलयते क्षत्रक्षयं कुर्वते ।।** : (..क्षत्त्रक्षयं..)

: (दैत्यान्...)

**पौलस्त्यं जयते हलं कलयते कारुण्यमातन्वते**

: (लाङ्गं कलयते/ लांगलं धारयते..)

**म्लेच्छान्मूर्च्छयते दशाकृतिकृते कृष्णाय तुभ्यं नम: ।।** : (म्लेंछान्..)

वेदान् उद्धरते, जगत् निवहते, भूगोलम् उद्विभ्रमते, दैत्यं दारयते, बलिं छलयते, क्षत्रक्षयं कुर्वते, पौलस्त्यं जयते, हलं कलयते, कारुण्यम् आतन्वते, म्लेच्छान् मूर्च्छयते, दशाकृतिकृते कृष्णाय तुभ्यं नमः।

(१) 'वेदानुद्धरते' :– वेदांचा उद्धार करणारा.
(२) 'जगन्निवहते' :– जगताचे धारण करणारे.
(३) 'भूगोलमुद्विभ्रते' :– सर्व पृथ्वीचा गोल (भू,भूमी) समुद्रातून वर काढणारे.
(४) दैत्यं दारयते :– स्वदेश, भूमी, राष्ट्र, इतिहास, धर्म, प्रजा, संस्कृती यांचा विध्वंस करणाऱ्या दैत्यांचे दमन करणारे, राक्षसाचे पोट फोडणारे, पोट विदीर्ण करणारे, बोटे तोडणारे.
(५) बलिं छलयते : उन्मत्त बलवानांचा उच्छेद करून त्यांस अद्दल घडविणारे कठोर प्रशासक व मुत्सद्दी : मध्यम देहयष्टिधारक.
(६) क्षत्र–क्षयं कुर्वते : (१) क्षत्रियांच्या क्षेत्रांचा, राज्यसीमांचा सत्ताक्षय, क्षेत्रक्षय करणारा व स्वतः सम्राट बनणारा.
(७) पौलस्त्यं जयते : पौलस्त्यांवर विजय मिळविणारे.
(८) हलं कलयते :– नांगर हे चिन्ह जवळ बाळगणारे, नांगर आपल्या हाती धारण करणारे.
(९) कारुण्यमातन्वते। :– करुणतेचा अर्थातच अहिंसेचा प्रचार– प्रसार करणारे.
(१०) म्लेच्छान्मूर्च्छयते : म्लेच्छांना (भविष्यात) मूर्च्छित करणारा : असे हे श्रीकृष्ण तुम्हांला नमस्कार असो.
(ही सर्व युगकार्ये भोसलेवंशीयांनी केली आहेत.)

❑ टीप : १) क्षत्रं–क्षत्र : हिंसेचा क्षय करणारा, युद्धे व हिंसा न होऊ देणारा.
२) पुलस्ती : हा ब्रह्म्याचा एक मानसपुत्र. या पुलस्त्यांचे वंशज, अनुयायी ते रावणपुत्र पौलस्त्य. अशा बौद्धिक छल–कापट्यधारींवर व रावणप्रवृत्तींच्या पौलस्त्यांवर विजय मिळविणारे श्रीराम.

३) हल चा (१) एक अर्थ 'नांगर' असा आहे. (२) दुसरा अर्थ 'कुरूपता' असा आहे. हलधारी बलराम व श्रीकृष्ण म्हणजे शेतीसंस्कृतीचे उन्नयन करणारे कृषितज्ज्ञ, 'हलं कलयते' म्हणजे 'त्रिवक्रा' कुबडधारी कुब्जेचा उद्धार करणारे श्रीकृष्ण.

(१) 'राधामाधव विलास चंपू' – या ग्रंथात कविश्री जयराम पिंड्ये यांनी, 'श्रीशाहाजी महाराज' हे 'माधव' (श्रीकृष्ण) आहेत, असे मानूनच त्यांचे चरित्र वर्णिले आहे.

(२) 'सूर्यवंश' – या ग्रंथात कवीन्द्र परमानंद यांनी श्रीशिवाजी महाराज हे 'विष्णू' (श्रीकृष्णां जसे कुशल यशस्वी सर्वश्रेष्ठ राजनीतिज्ञ स्वराष्ट्र संस्थापक व यशस्वी राष्ट्र–जनसंरक्षक) आहेत, असेच वर्णन केले आहे.

: (अध्याय ५ वा/श्लोक ४९ ते ६०).

म्हणून श्रीशाहाजी, श्रीशिवाजी तथा श्रीसंभाजी महाराज हेही 'दशाकृती' होत, असेच सूचन प्रस्तुत वर्णनात निहित आहे.

**१.४२ : तं वन्दे पद्मसद्मानमुपवीतच्छटाछलात् ।**
**गंगा स्रोतस्त्रयेणै(णे)व यं सदैव निषेवते ।।**

पद्मसद्मानमुपवीतच्छटाछलात् स्रोतस्त्रयेणा इव गङ्गा यं सदैव निषेवते तं वन्दे ।

**❒ ब्रह्मदेव**

यज्ञोपवीताच्या (जानव्याच्या) तीन तंतूंच्या तीन छटांच्या मिषाने (रूपाने) (त्रिपथगा) गंगा नदी ज्यांचा तीन प्रवाहांनी आश्रय करते; ज्यांची नित्य सेवा करते, त्या पद्मरूपी गृहात निवास करणाऱ्या; **ब्रह्मदेवांस** मी अभिवंदन करीत आहे.

**❒ टीप : (१) गंगेचे ३ प्रवाह :**

गंगा– 'त्रिपथगा' ,'त्रिपथगामिनी' आहे.

१. स्वर्गलोक : आकाशगंगा, २. मृत्युलोक : पृथ्वीवरील गंगा,

३. पाताळलोक : पाताळगंगा.

## ❐ सूर्य-वंदना

**१.४३ : शुकतुण्डच्छविसवितुश्चण्डरुचे: पुण्डरीकवनबन्धो: ।**
**मण्डलमुदितं वन्दे कुण्डलमाखण्डलाशाया: ।।**

पुण्डरीकवनबन्धो: कुण्डलमाखण्डलाशाया: चण्डरुचे:
शुकतुण्डच्छविसवितु: उदितं मण्डलं वन्दे ।

ज्याचा वर्ण पोपटाच्या चोचीप्रमाणे रक्तवर्ण आहे; ज्याचे तेज उग्र आहे, जो कमलपुष्पांच्या ताटव्यांचा जणू 'मित्र'च आहे, (ज्याच्यामुळेच कमळे विकसित होतात) आणि जो इंद्राच्या दिशेचा म्हणजे पूर्व दिशेचा कर्णालंकार आहे, अशा सूर्याच्या उदय पावलेल्या आल्हादक, गोलाकार तेजोमंडलास मी (छत्रपती संभाजी महाराज) नमस्कार करीत आहे.

## ❐ (५) अथ आशिष

**१.४४ : सानन्दं नन्द(न्दि)हस्ताहतमुरजरवाहूतकौमारबर्हि- :**
(..नन्दिहस्ता..)

**त्रासान्नासाग्ररन्ध्रं विशति फणिपतौ भोगसंकोचभाजि ।**
**गण्डोड्डीनालिमालामुखरितककुभस्ताण्डवे शूलपाणे-**
**वैंनायक्यश्चिरं वो वदनविधुतय: पान्तु चीत्कारवत्य: ।।**

**शूलपाणे:ताण्डवे नन्दिहस्ताहत मुरजरवाहूत**
**कौमारबर्हि त्रासात् भोगसंकोच भाजि**
**फणिपतौ नासाग्ररन्ध्रं विशति (सति),**
**गण्डोड्डीनालिमाला मुखरित ककुभ:**
**वैनायक्य: चीत्कारवत्य: वदनविधुतय: व: चिरं पान्तु ।**

त्रिशूलधारी श्रीशिवजी जेव्हा तांडवनृत्य करतात, त्यावेळी नंदी मोठ्या आनंदभराने आपल्या हातांनी मृदंग वाजवितो; जणू काही तो कार्तिकेयांच्या मोरालाच बोलावितो. मृदंगाच्या मेघगर्जनेसारख्या आवाजामुळे मोर आनंदाने नाचू लागतात. पण, त्या मोराला भिऊन श्रीगणेशांच्या अंगावरील सर्प आपला फणा मिटून घेऊन श्रीगणेशाच्या सोंडेच्या छिद्रात सुरक्षित स्थळीं पळून जाऊन लपून बसतात.

आपल्या नाकात नाग शिरल्याने विनायक चित्कार करतात आणि गदागदा सोंड झिंझाडतात. त्याच वेळीं गजमुख श्रीगणेशांच्या गंडस्थळावर मदस्रावाचे सेवन करण्यासाठी बसलेले भुंग्यांचे थवेच्या थवे एकदम उसळून उठतात. त्यांच्या त्या गुंजारवाने सर्वदिशा निनादून उठतात. गणपतींच्या त्या हालचालींत त्यांच्या सोंडेतून जे चीत्कार बाहेर पडतात; ते नेहमी आपले (छत्रपती संभाजी राजे व भूलोकवासी यांचे) रक्षण करोत.

..............................................................................

❒ टीप : श्रीशिवजींचे तांडवनृत्य, नंदीचे मृदंगवादन, मेघाप्रमाणे ध्वनिनिनादाने देवसेनापती कार्तिकेयाचे वाहन असणाऱ्या मोराचे त्या ध्वनीकडे आकृष्ट होणे, मोर व सर्प यांचे जन्मजात वैर, त्यामुळे फणिबंद गणपतीच्या सोंडेत शिरणे, विनायकाने सोंड हलविणे, त्याच्या गंडस्थळावर मदस्रावसेवनासाठी जमलेल्या भुंग्यांचे थवे गुंजारव करीत उठणे, सर्व दिशांचे त्या ध्वनीने निनादित होणे व श्रीगणेशाचे चित्कारणे– असे हे एक अतिशय काव्यमय वर्णन आहे.

❒ : शूलपाणि = हातीं त्रिशूळ धारण केलेला शंकर, नन्दि–हस्त–आहत–मुरज–रव–आहूत–कौमार–बर्हि–त्रासात्, मुरज = मृदंग, आहूत = बोलावून आणलेला, साद घातलेला, कौमार = कुमार कार्तिकस्वामीचा, बर्ह = पिसारा, बर्हिन् = मयूर (मोर), ककुभ = दिशा, उड्डीन – उडालेल्या, चीत्कारवत्यः विधूतयः चे विशेषण 'चीत्कारयुक्तः', फणिपति = नागराज, नासाग्ररन्ध्र = गणेशाची सोंड, तिच्या टोकाशी असलेल्या भोकामध्ये, विशति = शिरतात.

..............................................................................

१.४५ : **गण्डस्थलीगलदमन्दमदप्रवाह-**
**माद्यद्द्विरेफमधुरस्वरदत्तकर्णः ।**
**हर्षादिवालसनिमीलितनेत्रयुग्मो**
**विघ्नच्छिदे भवतु भूतपतिर्गणेशः ॥**

'गण्डस्थलीगलदमन्दमदप्रवाहम् आद्यद् द्विरेफमधुरस्वरदत्तकर्णः, हर्षादिवालसनिमीलितनेत्रयुग्मः भूतपतिः गणेशः विघ्नच्छिदे भवतु ।

ज्या **श्रीगजाननांच्या** गंडस्थलातून जोरात निरंतर वाहणाऱ्या मदाच्या प्रवाहात त्या मदाचे आस्वादन करणारे भुंगे, त्या मदरसाने धुंद होऊन मधुर असा गुंजारव करतात, त्यावेळी श्रीगणेशजी कान देऊन तो स्वर ऐकतात, त्या श्रवणहर्षाने जडावलेले आपले दोन्ही डोळे बंद करतात, असे ते श्रीगणेशजी आपल्या सर्वांच्या विघ्नांचा नाश करोत.

- **॥ अथ भवान्याः ॥**
- **श्रीभवानीची स्तुती**

१.४६ : **अनुकृतम(र)क(त)वर्णा शोभितकर्णा कदम्बमुकुलेन ।**
**नखमुखमुखरितवीणा मध्ये क्षीणा शिवा शिवं कुर्यात् ॥**

**कदम्बमुकुलेन** शोभितकर्णा-अनुकृत-मरकतवर्णा नखमुखमुखरितवीणा, मध्ये क्षीणा, शिवा शिवं कुर्यात् ।

जिने पाचू रत्नांच्या (हिरव्या) रंगाचे (वस्त्र?) धारण केले आहे, जिचे कान **कदंबपुष्पाच्या कळ्यांमुळे** सुशोभित आहेत; आपल्या नखाग्रांच्या स्पर्श-आघातांनी जी वीणेच्या तारांतून निरंतर स्वरझंकार निनादवीत असते, जी क्षीणकटी आहे, अशी सिंहकटी ती श्रीशिवशंभुदेवांची अर्धांगिनी श्रीभवानी (शिवा) आमचे (आम्हां छत्रपती श्रीशंभुराजे यांचे) शुभ (शिव) करो !

**१.४७ : स्वेदत्ते (स्ते ?) कथमीदृश: प्रियतमे त्वन्नेत्रवन्ह्यर्चिषा ।**

: (..वङ्नेर्विभो)

कस्माद्वेपितमेतदिन्दुवदने भोगीन्द्रभीतेर्भव ।। : (..भीतेस्तव ।)

**रोमाञ्च: कथमेष देवि भग(वन्)नागाम्भसां सीकरै–**

: (रोमहर्षणम्../ ... गंगाम्भसां..)

**रित्थं भर्तरि भावगोपनपरा गौरी चिरं पातु न: ।।**

(..व: ।)

''प्रियतमे, कथम् ईदृश: स्वेद: ?'' –: 'त्वन्नेत्रवह्न्यर्चिषा ।'
– ''इन्दुवदने ! एतद् कस्मात् वेपितम् ?'' – : 'भव, भोगीन्द्रभीता'
(अहम्),
''देवि, कथम् एष: रोमाञ्च: ?'' – : ''भगवन्, नागाम्भसां सीकरै: ।''
इत्थं भर्तरि (पृष्टे) भावगोपनपरा गौरी न: चिरं पातु ।

**❒ शिव आणि पार्वती या दोहोंतील संवाद !**

**शिव–** हे प्रियतमे ! तुला इतका घाम कशाने आला ?

**पार्वती–** तुमच्या (तिसऱ्या) डोळ्यातील अग्नीच्या ज्वाळांमुळे !

**शिव–** हे चंद्रमुखी ! तुझ्या शरीराला हा कंप का बरे सुटला आहे ?

**पार्वती–** श्रीशिवजी ! मला तुमच्या गळ्यातील त्या नागराजाची भीती वाटते; त्यामुळे !

**शिव–** हे देवी ! (तुझ्या तनूवर) हे रोमांच कशामुळे उभे राहिले आहेत ?

**पार्वती–** तुमच्या मस्तकावरील गंगाजलाच्या शीत गौर तुषारांनी उत्पन्न झालेली ही शिरशिरी आहे बरे !

अशा रीतीने श्रीशिवजींच्या सान्निध्यामुळे मीलनोत्कट भाव (घाम येणे, शरीराला कंप सुटणे, अंगावर रोमांच उभे राहणे ही उत्कट मीलनोत्सुक दृश्य लक्षणे) लपविण्याचा श्रीगौरीने प्रयत्न केला. ती देवी गौरी सर्वांचे चिरकाल रक्षण करो.

.................................................................

❐ टीप : प्रियतम–मीलनातुर रमणी आपली मीलनोत्कट दृश्य लक्षणे कशी लपविण्याचा प्रयत्न करते, दुसरीच (खोटी) कारणे सांगते, यातून संकोची मर्यादशील लाजवंती स्त्रीच्या स्वभावाचे आरेखन येथे झालेले आहे.

..............................................................

१.४८ : **विद्राणे रुद्रवृन्दे सवितरि तरले वज्रिणि ध्वस्तवज्रे**
**जाताशमे शशांके विरमति मरुति त्यक्तवैरे कुबेरे ।**
**वैकुण्ठे कुण्ठितास्त्रे महिषमतिरुषा पौरुषोपघ्ननिघ्नं ।** :
(..मतिरुषं..)
**निर्विघ्नं निघ्नती वः शमयतु दुरितं भूरिभावा भवानी ।।**

रुद्रवृन्दे विद्राणे, सवितरि तरले, ध्वस्तवज्रे वज्रिणि, जाताशङ्के शशाङ्के, विरमति मरुति, कुबेरे त्यक्तवैरे, कुण्ठितास्त्रे वैकुण्ठे, उषा महिषमति, पौरुषोपघ्ननिघ्नं निर्विघ्नं निघ्नती भूरिभावा भवानी वः दुरितं शमयतु ।

(महिष असुर) महिषासुराच्या भयाने जेव्हा सर्व अकरा रुद्र इतस्ततः पांगले, पळून गेले; सूर्यदेखील निस्तेज (हलका) झाला आणि मावळतीकडे जाऊ लागला, इंद्राचे वज्रही (अस्त्रही) कुचकामी ठरले, चंद्र उगवतीकडे जात असल्याच्या आशंकेने वाराही भयभीत होऊन नीरव शांत झाला, कुबेरानेही (महिषाशी असलेले आपले) शत्रुत्व सोडून दिले, वैकुंठातील (श्रीविष्णूंची) सर्व अस्त्रे निकामी (बोथट) ठरली, अशावेळी स्वतःच्या पराक्रमाच्या जोरावर महिषासुराला (केवळ) जिने निर्विघ्नपणे ठार मारले, ती महिषासुरमर्दिनी (दुर्गा, भवानी) मोठ्या भावपूर्ण वृत्तीने आमच्या पापांचा नाश करो !

❐ टिप्पणी : अकरा रुद्रांची नांवे वेगवेगळ्या पुराण ग्रंथांत वेगवेगळी दिलेली आढळतात ती अशी :–
: (संकेत कोश/हणमंते, श्री.शा./१९६४/पृ. २७९–२८०)

(१) रुद्रांची नांवे – : (२) रुद्राणींची नांवे

| क्र. | १.ब्रम्हांड.पु./ (४.३४.४२) | २.भाग.पु./ (३.१२.१२) | ३.हिं.पौ.को./ (पृ.४४७) | (भाग. पुराण.) (३.१२.१३) | |
|---|---|---|---|---|---|
| १. | वीरभद्र | मन्यू | नीलरुद्र | ईश्वर | १. धृ |
| २. | शंभू | मनू | त्र्यंबक | त्र्यंबक | २. वृत्ती |
| ३. | गिरीश | महिनस् | मृत्युंजय | अज | ३. उशना |
| ४. | अजैकपाद | महान | कामेश | एकपाद | ४. उमा |
| ५. | अहिर्बध्न्य | ऋतुध्वज | योगेश | अहिर्बुध्न्य | ५. नियुत्सर्पी |
| ६. | पिनाकी | धृतव्रत | शंकर | पिनाकी | ६. इला |
| ७. | अपराजित | उग्ररेता | वृजवाहन | अपराजित | ७. अंबिका |
| ८. | भुवनाधीश्वर | वामदेव | भूतेश | शंभू | ८. इरावती |
| ९. | कपाली | काल | कपाली | वृषाकपी | ९. सुधा |
| १०. | स्थाणू | शिव | महाकाल | महेश्वर | १०. दीक्षा |
| ११. | भव | भव | भैरव | हरण | ११. रुद्राणी |

### ❒ वाणी श्रीसरस्वतीची स्तुती !

**१.४९ : तव करकमलस्थां स्फाटिकीमक्षमालां ।**
: (..स्फटिकमयीम् जपमालाम्)
**नखकिरणविभिन्नां दाडिमीबीजबुद्ध्या ।** : (.. विमिश्राम् ..)
**अनुकलमनुकुर्वन्येन कीरो निरुद्धः ।**
: (प्रतिकलमनुकर्षन्../...निषिद्धः)
**स भवतु मम भूत्यै वाणि ते मन्दहासः ॥**

वाणि, तव करकमलस्थां नखकिरणविभिन्नां स्फाटिकीम् अक्षमालां दाडिमीबीजबुद्ध्या अनुकलम् अनुकुर्वन् कीरः येन निरुद्धः सः ते मन्दहासः मम भूत्यै भवतु ।

हे देवी सरस्वती ! तुझ्या कमलपुष्परूपी हातात जी शुभ्र रंगाची स्फटिक मण्यांची माळ आहे, त्या माळेतील मण्यांमध्ये तुझ्या नखांच्या लाल कोमल तेजःकिरणांचे प्रतिबिंब पडल्यामुळे त्या मण्यांना डाळिंबाचे (लाल, रसाळ, ताजे) दाणेच समजून एक पोपट त्या माळेजवळ ते दाणे खाण्यासाठी आला, त्याची ती

कृती पाहून तू मंदस्मित केलेस; त्या वैभवशाली स्मितहास्याने त्या पोपटास जागींच खिळवून ठेवलेस. असे ते मंदहास्य माझ्याही भाग्यसमृद्धीस कारणीभूत होवो !

❐ **अथ शंभो**

❐ **श्रीशंभूंची स्तुती**

१.५० : **जीर्णेप्युत्कटकालकूटकवले प्यु(प्लुष्टे)** हठान्मन्मथे

: (.. जीर्णेऽ ... कुटगरले..) (.. तथा मन्मथे।)

**नीते भास्क(स्व)रभालनेत्रतनुतां कल्पान्तदावानले** ।:(.. भासुर ..)

**यः शक्त्या समलंकृतोपि शशिनं शैलात्मजां स्वर्धुनीं** ।:(.. तो ऽ पि..)

**धत्तेकौतुकराजनीतिनिपुणः पायात्स वः शमरः ।।**

उत्कटकालकूटकवले जीर्णे, मन्मथे हठात् प्लुष्टे, कल्पान्तदावानले भास्वरभालनेत्रतनुतां नीते, यः शक्त्या समलंकृतः अपि शशिनं, शैलात्मजां, स्वर्धुनीं धत्ते। स कौतुकराजनीतिनिपुणः शङ्करः वः पायात्।

ज्यांनी अत्यंत जहाल (कालकूट) विष प्राशन करून पचवून टाकले (समाधिभंग करणाऱ्या) मदनाला क्रोधाने भस्म करून टाकले; युगाचा अंत करणाऱ्या प्रलयकाळच्या दावानलाला (दावानल = प्रखर अग्नी) गिळून टाकले, ज्यामुळे स्वतःच्या तृतीय नेत्रस्थानीं असणाऱ्या अग्निरूप सूर्यालादेखील निस्तेज बनविले, स्वतः 'शक्ती'ने अलंकृत असूनही जे स्वतःच्या मस्तकावर चंद्र (कोर), (शैलात्मजा) गंगा यांना कौतुकाने (आनंदाने) धारण करतात, जे राजनीतिप्राज्ञ आहेत, असे श्रीशंकरजी आमचे (छत्रपती संभाजी राजे यांचे व) तुमचे(ही) रक्षण करोत !

.....................................................

❐ टीप : **राजनीती** = राजन् (=राजा) = १. क्षत्रिय, २. इंद्र, ३. स्वामी, (मालक), ४. चंद्र, ५. यक्ष, ६. सोम, ७. श्रेष्ठ, ८. देव, ९. परमात्मा, १०. वृष्टि (पर्जन्य)देवता). (=शल, ब्रह्म, ईश्वर) :- हे 'राजा' या शब्दाचे पर्यायी समानार्थी शब्द, संज्ञा आहेत.

.....................................................

**१.५१ : केयूरीकृतकमणीकृतजटाजूटावतंसीकृत-**
**ज्यावल्लीकृतकुण्डलीकृतकटीसूत्रीकृताहीश्वरः ।**
**पायाद्वस्तिलकीकृतप्रियतमादर्शीकृताक्षीकृत-**
**द्यूतारम्भपणीकृतेन्दुशकलः कात्यायनीकामुकः ।।**

केयूरीकृत-कङ्कणीकृत-जटाजूटावतंसीकृत - ज्यावल्लीकृत - कुण्डलीकृत - कटीसूत्रीकृत - अही, तिलकीकृत - प्रियतमादर्शीकृत - द्यूतारम्भपणीकृत - इन्दुशकलः, कात्यायनीकामुकः ईश्वरः वः वायात् ।

ज्या (श्रीशंकरांनी) सर्पराजाला आपले बाहुभूषण बनविले, त्यालाच हातातील कंकण म्हणून धारण केले, जटासंभारातही त्याला अलंकार म्हणून धारण केले, धनुष्याच्या (मूर्वालता) प्रत्यंचेच्या स्वरूपात त्यालाच आपल्या धनुष्याची प्रत्यंचा बनविले, त्यालाच गोल कुंडलाचा आकार देऊन धनुष्याच्या दोन्ही टोकांवर गाठ घातली, त्यालाच आपले कटिसूत्र (कडदोरा) बनविले. त्याचप्रमाणे (ज्या श्रीशंकरांनी) ज्यांनी चंद्रकलेस आपल्या भालप्रदेशीं तिलकरूपात धारण केले आणि आपल्या प्रियतमेसाठी (पार्वतीसाठी) त्या चंद्रकोरीचा आरसा बनविला, आपल्या एका नेत्ररूपात स्थान दिले आणि द्यूतारंभाच्या वेळी त्यास पणासही लावले अशा कात्यायनीचा (श्रीभवानीचा) प्रियकर श्री शिव आपले (माझे छत्रपती शंभू राजांचे, आणि तुमचे) रक्षण करोत !

❒ टीप : **मूर्वालता** : (१) मूर्वा, मूर्वी म्हणजे अतिशय चिवट, न तुटणारी वेल, तिचा धनुष्याची प्रत्यंचा म्हणून वापर केला जाई. प्रत्यंचा म्हणजे 'मूर्वा'लता होय. **क्षत्रियांच्या** उपनयनाच्या वेळी; मूर्वालतेचाच करगोटा कंबरेस बांधण्यात येतो. चंद्रगुप्त 'मौर्व्य' जो होता, त्याची नावाची उपाधी 'मौर्व्य', ही (क्षत्रियवंशत्व निर्णायक होती, कुलनाम नव्हे. तो शिशुनाक (नाक = नंद, आनंद, स्वर्ग) वंशीयच होता. महापद्मनंद वंशीयच होता.

**१.५२ : पातु वो नीलकण्ठस्य कण्ठः श्यामाम्बुदोपमः ।**
**गौ(री)भुजलता यत्र विद्युल्लेखेव राजते ।।**

यत्र गौरीभुजलता विद्युल्लेखा इव राजते (सः)
श्वामाम्बुदोपमः नीलकण्ठस्य कण्ठः वः पातु ।

(१) ज्या श्रीशिवांचा कंठ निळा आहे, म्हणून ते नीलकंठ संबोधले जातात, त्या त्यांच्या, मेघासमान श्यामलनील कंठावर श्रीगौरीची तेजोकांतिपूर्ण चंचल गौर बाहु–लता विद्युल्लतेप्रमाणे सळसळून चमकते; अशा त्या श्रीशिवांचा निळा कंठ, तुमचे रक्षण करो !
(२) ''श्रीपार्वतीदेवीचा विमलधवलमृदुल कोमल, लताचंचल वसंतपल्लव हात जेथे चंद्रकोरी प्रमाणे शोभतो असा तो श्यामल मेघाप्रमाणे अतिशय सुंदर असा श्रीशंकरांचा निळा कंठ तुमचे रक्षण करो !''

**१.५३ : स धूर्जटिजटाजूटो जायतां विजयाय वः ।**
**यत्रैकापि लताभ्रान्तिं करोत्यद्यापि जाह्नवी ।।**
**:(यत्रैकपलित...)**

यत्र जाह्नवी एका अपि अद्यापि लताभ्रान्तिं करोति,
सः धूर्जटिजटाजूटः वः विजयाय जायताम् ।

आजदेखील श्रीशंकराच्या मस्तकावर एकमेव जान्हवी (गंगा) विराजमान असून आज अजूनही ती लताविभ्रमाची निरंतर वर्धिष्णू गतिशीलतेची भ्रांती निर्माण करते, असा तो श्रीशंकरांचा जटासंभार सदैव तुमच्या व आमच्या (छत्रपती संभाजी राजे यांच्या) विजयास कारणीभूत होवो !

❒ **।। अथ विष्णो ।।**

❒ **श्रीविष्णूंची स्तुती !**

**१.५४ : कृष्ण त्वं नवयौवनोसि चपला प्रायेण गोपाङ्गना ।**
: (.. यौवनोऽसि..) .. चपलाः.. । गोपांगनाः
**कंसो भूपतिरब्जनालमृदुलग्रीवा वयं गोदुहः ।**
**तद्याचेऽञ्जलिना भवन्तमधुना वृन्दावनं मद्गिना ।** : (.. मद्गिना ।)

**मा यासीरिति नन्दगोपवचसा नम्रो हरिः पातु वः ।।**

कृष्ण, त्वं नवयौवनः असि, प्रायेण अब्जनालग्रीवा गोपाङ्गना चपला, कंसः भूपतिः, वयं गोदुहः । तद् अञ्जलिना भवन्तं याचे – अधुना वृन्दावनं मा यासीः । इति नरेन्द्रगोपवचसा नम्रः हरिः वः पातु ।

हे श्रीकृष्णा ! तू तर नवयौवनाच्या भरात आहेस. गोपांगना सामान्यतः विद्युल्लतेप्रमाणे चंचल, गौर आणि कमलनालाप्रमाणे (कमळाच्या देठाप्रमाणे) मृदुल ग्रीवा–(गळा/मान) असणाऱ्या रमणी आहेत. आम्ही तर सामान्य गोपाल आहोत. कंस बलशाली कपटी राजा आहे. तेव्हा आता मी हात जोडून तुला विनंती करतो की, आता तू वृंदावनाकडे जाऊच नकोस. याप्रमाणे नंद गोप बोलल्यानंतर मित्रप्रेमापुढे नम्र झालेले ते श्रीहरी (श्रीकृष्ण) तुमचे रक्षण करोत.

**१.५५ : भ्राम्यन्मन्दरकन्दरोदरदरी व्यावर्तिभिर्वारिधेः**
**कल्लोलैरलमाकुलं कलयतो लक्ष्म्या मुखाम्भोरुहम् ।**
(..कुलंपश्यतः ..)
**औत्सुक्यात्तरलाः स्मराद्विकसिता भीत्या समाकुञ्चिताः ।**
**(+ क्रोधेन ज्वलिता मुदा मुकुलिताः शौरेर्दृशः पातु(न्तु) वः ।।**
+ : (.. अदत्तपरपुत्रिकाप्रानर्धत्वेन ।)

मन्दरकन्दरोदरदरी भ्राम्यन् वारिधेः व्यावर्तिभिः
कल्लोलैः आकुलं लक्ष्याः मुखाम्भोरुहं कलयतः,
औत्सुक्यात् तरलाः, स्मरात् विकसिताः, भीत्या
समाकुञ्चिताः, क्रोधेन ज्वलिताः, मुदा मुकुलिताः शौरेः दृशः वः पातु ।

अमृताच्या प्राप्तीसाठी देव व दानव यांनी क्षीरसमुद्राचे मंथन केले. त्यावेळी कूर्म (कच्छ) रूप श्रीविष्णूंच्या पाठीवर मंदर पर्वत रवी म्हणून उभा करून त्याला दही घुसळण्याच्या रवीच्या दोरीप्रमाणे सर्पराज वासुकीचे वेढे घातले. आणि मंथनास सुरुवात केली. त्यावेळी गरगर फिरणाऱ्या मंदर पर्वतात असलेल्या गुहांमधून, क्षीरसमुद्राच्या लाटा उसळू लागल्या. त्या मंथनातून इतर १३

रत्नांबरोबर १४ वे रत्न म्हणून वर आलेल्या, श्रीलक्ष्मीदेवीचे मुख कमलपुष्पासारखे अतिशय भयार्त झाले; हे पाहताच श्रीविष्णूंनी तिच्याकडे जे दृष्टिक्षेप टाकले, त्यामुळे ती लक्ष्मी प्रेमाने पुलकित होऊन उंच लहरींच्या रूपाने निळ्या हिऱ्याप्रमाणे शोभून दिसत होती. स्नेहस्निग्धता, भयव्याकुलता, क्रोध या भावनांपेक्षा आनंदाने मिटलेले श्रीविष्णूंचे नेत्रकटाक्ष तुमचे रक्षण करोत !

१.५६ : **अर्धोन्मीलितलोचनस्य पिबत: पर्याप्तमेकं स्तनं**
(..लालितस्य पिबत: ..)
**सद्य: प्रस्नुतदुग्धदिग्धमपरं हस्तेन संमार्जता (त:/ ?) ।**
**मात्रा चाङ्गुलिचालितस्य चिबुकस्मेरायमाने मुखे**
: (.. चिबुकेस्मेरायमाणे.. चाङ्गुलि लालितस्य..)
२.चिबुके ।३. स्मेरायमाणे ।)
**विष्णो: क्षीरकणाम्बुधामधवला दन्तद्युति: पातु व: ।।**

एकं स्तनं पर्याप्तं पिबत:, सद्य: प्रस्नुतदुग्धदिग्धम् अपरं हस्तेन संमार्जत:, अर्धोन्मीलितलोचनस्य, मात्रा चिबुक: अङ्गुलिचालितस्य, विष्णो: स्मेरायमाने मुखे क्षीरकणाम्बुधां धवला दन्तद्युति: व: पातु ।

बाल श्रीकृष्ण आपले डोळे अर्धवट उघडे ठेवून मातेच्या एकाच स्तनातून दुग्धपान करीत तृप्त झाला होता; तेव्हा पान्हा फुटलेल्या दुसऱ्या स्तनातून दूध वाहू लागले. त्यावेळी मातेने ते आपल्या हाताने अडवून पुसून घेतले आणि तृप्त स्मितयुक्त अशा श्रीकृष्णाच्या दूध सांडणाऱ्या हनुवटीवरून बोटे फिरविली; त्याक्षणीं त्या दुधाच्या फेसामुळे बालकृष्णाच्या दातांची कांती अधिकच पांढरी शुभ्र झाली, ती स्मितमय दंत–कांती तुमचे (आमचे, छ. संभाजींचे) रक्षण करो.

१.५७ : **गच्छाम्यच्युत दर्शनेन भवत: किं तृप्तिरुत्पद्यते**
**किन्त्वेवं विजनस्थयोर्हतजना: संभावयत्यन्यथा ।**
(किं त्वेवं../ ..र्हतजन:..)

**इत्यामन्त्रणभङ्गिसूचिततवृथावस्थानखेदालसा-**
**माश्लिष्यन्पुलकोत्कराञ्चितनुर्गोपीं हरिः पातु वः ।।**

अच्युत ! भवतः दर्शनेन तृप्तिः उत्पद्यते किम् ? किन्तु एवं विजनस्थयोः (आवयोः) हतजनाः अन्यथा संभावयन्ति, गच्छामि । इति आमन्त्रणभङ्गि सूचित वृथावस्थानखेदालसां गोपीम् आश्लिष्यन् पुलकोत्कराञ्चितनुः हरिः वः पातु ।

''हे अच्युता ! सर्वशक्तिमान प्रभू, जाते मी आता ! तुला असे कितीही पाहत राहिले तरी समाधान का होणार आहे ? पण, या निर्जन स्थलीं जर आपण असेच (दोघेच) राहिलो, तर लोक त्याचा भलताच अर्थ काढतील !'' असे म्हणत, निरोप घेण्याचा आव आणूनही ती तेथेच घुटमळत राहिली. गोपीचे परत जाण्याचे खोटेखोटेच बोलणे श्रीहरीने ताडले होते. म्हणून तत्क्षणीच त्याने तिला आलिंगनबद्ध केले आणि तिच्या गात्रां-गात्रांवर रोमांचांचा वर्षावच केला. असा तो श्रीहरी तुमचे (व आमचे) रक्षण करो !

**१.५८ : दृप्यद्दैत्यकुटुम्बिनीजनमनःसन्तोषसमोचनः ।** : (..द्वैत्यनितम्बिनी..)
**कुर्याद्विश्वम(न)श्वरं स भगव(वा)न्कोलावतारो हरिः ।**
: (.. कोडावतारो ..)
**यद्दंष्ट्राङ्कुरकोटिकोटरकुटीकोणान्तरस्थेयसी**
**पृथ्वी भात्यवदातकेतकदले लीनेव भृङ्गाङ्गना ।।**
: (.. दलालीनेव ..)

यद् दंष्ट्राङ्कुरकोटिकोटरकुटीकोणान्तरस्थेयसी पृथ्वी अवदातकेतकदले लीना भृङ्गाङ्गना इव भाति, स दृप्यद्दैत्यकुटुम्बिनीजनमनः सन्तोषसङ्कोचनः कोलावतारः भगवान् हरिः विश्वम् अनश्वरं कुर्यात् ।

गर्विष्ठ अशा दैत्यस्त्रिया व परिजन यांच्या आनंदावर विरजण घालणारा, विकृत आनंदोत्सवाला लगाम लावणारा असा तो धवल-वर्ण वराह-अवतार धारण करणारा भगवान श्रीविष्णू सर्व जगताला सुस्थिरता व शाश्वतता देवो. त्याच्या कराल दाढांच्या टोकदार कुटीसारख्या एका पोकळीत एका कोपऱ्यात स्थिर राहणारी पृथ्वी, शुभ्र केवड्याच्या पानांमध्ये एखादी भ्रमरी असावी,

त्याप्रमाणे शोभून दिसते.

...........................................................................

❒ **टीप** : भ्रमरी – भुंगा चे स्त्रीलिंग रूप.
भ्रमरी – भ्रमण करणारी – पृथ्वी. (भौगोलिक संदर्भ)

...........................................................................

❒ **।। अथ लक्ष्म्याः ।।**

❒ **श्रीलक्ष्मीची स्तुती**

**१.५९ : उत्तिष्ठन्त्या रतान्ते भरमुरगपतौ पाणिनैकेन कृत्वा**
**धृत्वा चान्येन वासो विगलितकबरीभारमंसे वहन्त्याः ।**
**भूयस्तत्कालकान्तिद्विगुणितसुरतप्रीतिना शौरिणा वः**
**शय्यामालिङ्ग्य नीतं वपुरलसलसद्बाहुल्याः**
**(बाहु लक्ष्म्याः) पुनातु ।।** : (.. वहन्त्या ।)

रतान्ते एकेन पाणिना उरगपतौ भरं कृत्वा अन्येन च वासः धृत्वा उत्तिष्ठन्त्याः, अंसे विगलितकबरीभारं वहन्त्याः, भूयः तत्कालकान्ति-द्विगुणितसुरतप्रीतिना शौरिणा आलिङ्ग्य शय्यां नीतं अलसलसत् वपुः लक्ष्म्याः बाहुः वः पुनातु ।

श्रीलक्ष्मी विष्णूंजवळून उठून दूर उभी राहत असताना तिने एका हाताने क्षीरसमुद्रीं दोलायमान हिंदोळत्या वासुकीनागावर भार दिला; तर दुसऱ्या हाताने तिने आपले वस्त्र सावरले आणि आपला केशसंभारही सावरला. त्याक्षणीं तिचे मोहक लडखडते रूप पाहून, श्रीविष्णूंनी तिला सावरून धरले आणि मंचकीं सुस्थित केले. तिची ती समग्र चारुगात्रे तुम्हांस (आम्हांसही) पावन करोत !

❒ **टीप** : उरगपती/उरगेंद्र/उरगराज = वासुकी सर्प किंवा वासुकेय किंवा शेषनाग किंवा अनंत नाग (सर्पांचा राजा).

**१.६० : पायात्पयोधिदुहितु: कपोलामलचन्द्रमा: ।**
**यत्र संक्रान्तबिम्बेन हरिणा हरिणायते ।।**

: (.. हरिणायितम् ।)/(हरिण इवाचरितम् ।)

यत्र संक्रान्तबिम्बेन हरिणा हरिणायते (स:) पयोधिदुहितु: कपोलामलचन्द्रमा: पायात् ।

समुद्रकन्या श्रीलक्ष्मीच्या शुभ्र व स्वच्छ चंद्रबिंबाप्रमाणे असलेल्या गालांवर जेव्हा अगदी समोर असलेल्या श्रीहरींचे प्रतिबिंब उमटते, त्यावेळी हरी तिच्या गालांवर मृगलांछनवत् शोभून दिसतो. (चंद्रावरील कलंकशोभेप्रमाणे शोभायमान दिसतो.)

- ❑ **।। अथ सूर्यस्य ।।**
- ❑ **सूर्यस्तुती**

**१.६१ : सिन्दूरस्पृहया स्पृशन्ति किरणं कुम्भस्थमाधोरणा ।** : (.. करिणां ..)
**भिल्ली पल्लवशमया विचिनुते सान्द्रं द्रुमद्रा(द्रो ?)णिषु ।।**

: (.. सान्द्रद्रुमां द्रोणिषु ।)

**कान्ता: कुंकुमशमया करतले मृद्गन्ति लग्नं च यत्–**
**तत्तेज: प्रथमोद्भवं भवकरं सौरं चिरं पातु व: ।।**

आधोरणा सिन्दुरस्पृहया कुम्भस्थं किरणं स्पृशन्ति,
भिल्ली पल्लवशङ्कया द्रुमद्रोणिषु सान्द्रं विचिनुते,
कान्ता: कुङ्कुमशङ्कया करतले लग्नं यत् मृद्नन्ति,
तत् प्रथमोद्भवं भवकरं सौरं तेज: व: चिरं पातु ।

सूर्याचा शेंदूरी रंगाचा प्रथमकिरण हत्तीच्या गंडस्थलावर पडला तर लालबुंद शेंदूर मिळावा या हेतूने माहूत गंडस्थलास स्पर्श करतो; तोच किरण वनराईत पडला तर ती कोवळी पालवी आहे असे समजून भिल्लीण ती पालवी खुडून घेण्याचा प्रयत्न करते; तोच किरण सुंदरीच्या तळहातावर पडला तर ती त्याला केशर समजून आपल्या तळहातावर चुरगळून लेपन करू लागते. जगाला जागे करणारा तो प्रथम सूर्यकिरण तुमचे (आमचेही) सदैव रक्षण करो !

## ❐ अन्योक्ती विभाग :

१.६२ : **यत्पादाः शिरसा न केन विधृताः** पृथ्वीभृतामग्रजे(**भृतां मध्यतः**)
: (यत्पादाः = किरणाः / =चरणाः ।) : (..पृथ्वीभृतां / = शैलानाम् ।)
तस्मिन्भास्वति **राहुणा कवलिते** लोकत्रयीचक्षुषि ।
: (तस्मिन्सूर्ये..) : (कवलिते / ग्रस्ते)
**खद्योतैः स्फुरितं** तमोभिरुदितं ताराभिरुज्जृम्भितं
: (दिवान्धैरुत्थितमाः.. ।)
**घूकैरुत्थितमाः किमत्र करवै किं केन नो चेष्टितम् ।।**
: (केन / किंन..) : (..कैश्चितम् ।) : (कैश्चेष्टितम् ।)

पृथ्वीधृतां मध्यतः केन (अपि) यत्पादाः शिरसा न विधृताः,
तस्मिन् भास्वति, राहूणा कवलिते, लोकत्रयीचक्षुषि
खद्योतैः स्फुरितं, तमोभिः उदितं, ताराभिः उज्जृम्भितं,
घूकैः उत्थितमाः । किं केन न चेष्टितम् ? अत्र किं करवै ?

## ❐ सूर्यान्योक्ती

पृथ्वीचे पालन करणाऱ्या राजांपैकी कोणीही कधी ज्याचे प्रखर तेजोमय किरण सहन करू शकले नाहीत, अशा त्या 'तिन्ही लोकांचा (स्वर्ग, मृत्यू, पाताळ) नेत्र' असलेल्या सूर्याला जेव्हा ग्रहण लागते; राहू त्याला गिळून टाकतो, त्यावेळी (त्याचे तेज क्षीण होते आणि क्षुद्र प्रकाश देणारे) काजवे (दिमाखाने) चमकू लागतात. सर्वत्र अंधार पसरतो आणि (दिवसा) तारे चमकू लागतात. (दिवाभीत) घुबडे बाहेर येतात. अशावेळी कोण कोण काय काय करते याचे काय वर्णन करावे ?

: तेजस्वी पुरुषच जर संकटात सापडला, तर अलबते-गलबते लोक देखील (नसलेला) दिमाख दाखवत राहतात.

१.६३ : **तस्यैवाभ्युदयो भूयाद्भानोर्यस्योदये सति ।**
**विकासभाजो जायन्ते गुणिनः कमलाकराः ।।**

यस्य उदये सति, विकासभाजाः कमलाकराः गुणिनः जायन्ते,
तस्य भानोः अभ्युदयः भूयात्।

त्याच सूर्याचा पुन्हा तेथेच उदय झाला, की चांगल्या गुणांचा स्वीकार करणारे असे कमळाचे ताटवे प्रफुल्लित होतात.

**१.६४ : देवो हरिर्वहति वक्षसि कौस्तुभं वा (त-)** : (..हरिर्वहतु..)
**तन्व्येव(मन्येव) काचन पुनर्द्युमणेः प्रतिष्ठा ।** : (तन्मन्ये च..)
**यत्पादसंगतिसमर्पितसौरभाणि**
**धत्ते स एव शिरसा सरसीरुहाणि ॥**

हरिः देवः वक्षसि कौस्तुभं वहति। काचन द्युमणेः प्रतिष्ठा पुनः इव मन्ये। यत्पादसंगति समर्पित-सौरभाणि सः एव सरसीरुहाणि शिरसा धत्ते।

भगवान श्रीविष्णू आपल्या छातीवर कौस्तुभ रत्न धारण करतात, तेव्हा मला वाटते तेथे एकप्रकारे सूर्याची प्रतिष्ठापणाच झाली आहे. खरेच आहे की ज्याच्या चरणांवर सुगंधित कमळे अर्पण केली जातात. तोच त्या कमळांना आपल्या मस्तकावर धारण करतो. (त्यांना सन्मानित करतो.)

**१.६५ : करान्प्रसार्य रविणा दक्षिणाशावलम्बिना ।**
: (किरणान्/=हस्तान्..)(.. दक्षिणदिक्../.. दक्षिणाया आशा स्पृहा।)
**न केवलं मनोरा(लमनेनात्मा)दिवसोपि लघी(घू)कृतः ।**
: (मनोरा (वगळून)/न केवलमनेनात्मा..)

दक्षिणाशावलम्बिना रविणा करान् प्रसार्य अनेन न
केवलं आत्मा अपि तु दिवसः लघी(घू)कृतः।

सूर्याने आपले किरणरूपी हात दक्षिण दिशेकडे पसरविले (दक्षिण दिशेपुढे हात पसरले. उत्तरेच्या तुलनेत दक्षिण गौण) त्यामुळे त्याने स्वतःलाच लहान बनविले. (स्वतःची महानता गमावली) एवढेच नव्हे तर त्याने दिवस देखील लहान केला.

❒ टीप : सूर्याचे दक्षिणायन - या कालावधीत सूर्यतेजाची प्रखरता कमी होते. सूर्याचे आकारमान (अंतरामुळे) कमी भासते आणि दिवस लहान होतात.

१.६६ : **गते तस्मिन्भानौ त्रिभुवनसमुन्मेषविरह-**
**व्यथां चन्द्रो नेष्यत्यनुचितमितो नास्ति किमपि ।**
**इदं चेतस्तापं जनयतितरामत्र यदमी**
**प्रदीपा: संजाताति(स्ति ?)मिरहृदि रद्धोधुर( ?)शिखा: ।।**

: (.. तिमिरहतिबद्धोद्धुरशिखा: ।)

तस्मिन् भानौ गते त्रिभुवनसमुन्मेषविरहव्यथां चन्द्र: नेष्यति
इत: अनुचितं किमपि नास्ति यद् संजाततिमिरहृदि( ?)
उद्धुरशिखा: अमी प्रदीपा: ये ऽ चेत: इदं तापजनयतितराम्।

तो 'सूर्य' अस्ताला गेल्यानंतर तिन्ही लोकांना व्यापून टाकणारे सूर्यविरहाचे दु:ख (अंधार) 'चंद्र' दूर करील, या विचाराइतका दुसरा अयोग्य विचारच नाही. शिवाय ज्यांच्या हृदयांत अंधारच असतो आणि ज्यांच्यामधून अंधारच (धूरच) निघतो; ते दिवे तर फारच मनस्ताप देतात. :(जे धूरच सोडतात, ते दिवे प्रकाश देऊन सूर्याची जागा घेतील, असे कसे समजावे ? सूर्य तो सूर्यच !)

१.६७ : **पात: पूष्णो महति भवते(भवति महते) नोपतापाय यस्मात्**
**कालेनास्तं क इह न गता यन्ति यास्यन्त्ति चान्ये ।**

: (.. यान्ति/..यते..)

**एतावत्तु व्यथयति यदालोकवाह्यैस्तमोभि-**
**स्तस्मिन्नेव प्रकृतिमहति व्योम्नि लब्धोऽवकाश: ।।**

महत: पूष्ण: पात: भवति (इति) उपतापाय न भवति ।
यस्मात् कालेन क: इह अस्तं न गत: ? अन्ये (अपि) यान्ति,
यास्यन्ति च । (किन्तु) तु एतावत् व्यथयति यत् आलोकवाह्यै:
तमोभि: तस्मिन् एव प्रकृतिमहति व्योम्नि अवकाश: लब्ध: ।

सूर्याचे अस्ताला जाणे (मावळणे) ही घटना सत्य असली तरी त्यामुळे पराकाष्ठेचे दु:ख होत नाही. (दु:ख होण्याचे कारण नाही.) कालक्रमानुसार कोणाचा बरे अस्त झाला नाही ? प्रत्येकजण अस्तास जात आहे; जाणारही आहे. हा तर जगताचा नियमच आहे. ज्या आकाशातून सूर्याचा अस्त झाला त्याच नैसर्गिकरीत्या विशाल असलेल्या आकाशात प्रकाशाशी सुतराम संबंध नसणाऱ्या

अंधारांना (मुक्तपणे) पसरण्यास वाव मिळतो, ही गोष्ट मात्र मनाला लागून राहते.

❑ चंद्रान्योक्ती

**१.६८ : हरमुकुटे सुरतटिनीनिकट**
**स्थितिलोभतो द्विजेन्द्रेण ।** : (..लाभतो..)
**अपि गरलं फणिफूत्कृतिरीक्षण तीक्ष्णाशुशुक्षणिः क्षान्तः ॥**
: (..फणिफूत्कृति तृतीयनेत्रस्थितस्तीक्ष्णाग्निः यं..)

हरमुकुटे सुरतटिनीनिकटस्थितिलोभतः द्विजेन्द्रेण (=चन्द्रेण),
फणिफूत्कृतिः गरलं ईक्षणतीक्ष्णाशुशुक्षणिः अपि क्षान्तः ।

श्रीशंकरांच्या मस्तकावर, सुरनदी (देवनदी) गंगेच्या निकट राहावयास मिळावे, या आशेने, विषधारी सर्पाचे फूत्कार आणि श्रीशिवजींच्या तिसऱ्या नेत्रातील धगधगता अग्नी यासारखा त्रासही 'द्विज–श्रेष्ठ' चंद्राने सहन केला.

विशिष्ट ध्येयासाठी मनुष्य अनेक संकटांना तोंड देतो. विकाराधीन मनुष्याला अनेक संकटांना तोंड द्यावे लागते.

**१.६९ : विरम तिमिर साहसार(द)मुष्माद्यदि : ।** (..अयथा बलमारम्भात्।)
**रविरस्तमितो गतस्ततः किम् ।** : .. स्तमितः । .. स्वतस्ततः..)
**कलयसि न पुरो महोत्सवोर्मिद्युतिनिधि**
**रभ्युदिता(तो)यमं(?) शशामः ॥**
: (.. महोर्मिधारा द्युतिनिधिरभ्युदयत्ययं शशांकः ॥)

तिमिर ! अमुष्मात् साहसात् विरम । यदि रविः अस्तम्
इतः (गतः) ततः किं, न कलयसि? पुरः महोत्सवोर्मिद्युतिनिधिः अयं शशाङ्कः अभ्युदितः ।

तेव्हा, हे अंधारा ! तू हे (वेडे) धाडस सोडून दे. सूर्य अस्ताला गेला आहे, तर काय झाले? तुझ्यासमोरच मोठ्या उत्सवपूर्ण प्रकाशकल्लोळाचा निधीच, असा चंद्र उदय पावणारच आहे.

**।। अथ चंद्रस्य ।। : चंद्राची स्तुती.**

**१.७० : अहो नक्षत्रराज्ञ(ज)स्य साभिमानविचेष्टितम् ।** : (.. साभिमानं..)
**परिक्षीणस्य वक्रत्वं संपूर्णस्य च वृत्तता ।।** : (..सुवृत्तता।)

अहो ! नक्षत्रराजस्य स्वाभिमानविचेष्टितं (पश्यन्तु)।
(यत्) परिक्षीणस्य वक्रत्वं संपूर्णस्य वृत्तता च।

नक्षत्रांचा राजा जो चंद्र त्याच्याकडे पाहा, त्याचे वागणे किती स्वाभिमानी आहे ! जेव्हा तो क्षीण (कोरीच्या आकारात) अवस्थेत असतो तेव्हा तो प्रकाशितच असतो ! जेव्हा तो पूर्ण गोलाकार अवस्थेत असतो तेव्हा तो पूर्ण प्रकाशितच असतो. तो क्षीण असो (अपुऱ्या उपलब्धीचा) की पूर्ण समृद्ध असो त्याच्या प्रकाशमान असण्यामध्ये कोणताच फरक पडत नाही.

**१.७१ : आलोकवन्त: सन्त्येव भूयांसो भास्करादय: ।**
**कलावानेन तु ग्रावद्रावकर्मणि कर्मठ: ।।**

भास्करादय: आलोकयन्त: भूयांस: सन्ति।
तु ग्रावद्रावकर्मणि कलावान् एव कर्मठ:।

सूर्य इत्यादी इतर कितीतरी (पुष्कळ) जण प्रकाशवंत असतात. पण दगडाला (चंद्रकांत मण्याला) पाझर फोडण्यास फक्त कलांनी युक्त चंद्रच समर्थ असतो.

**१.७२ : शिरसा धार्यमाणोपि सोम: सौम्येन शंभुना ।**
**तथापि कृशतां धत्ते कष्ट: खलु पराश्रय: ।।**

सौम्येन शंभुना शिरसा धार्यमाण: अपि सोम: कृशतां धत्ते।
खलु पराश्रय: कष्ट:।

सौम्य (शांत) प्रकृतीच्या श्रीशंभूंनी चंद्रास स्वमस्तकीं धारण केलेले असले तरीसुद्धा चंद्र हा आपली क्षीणता सोडू शकत नाही, तो क्षीणच राहतो. खरेच आहे, दुसऱ्याच्या आश्रयाने राहणे कष्टप्रदच असते !

**१.७३ : लब्धं जन्म सह श्रिया श्रियमपि त्रैलोक्यभूषाकर–**
**स्थित्यर्थं परमेश्वरोभ्युपगतस्तेनापि मूर्ध्ना कृतः ।**
**वृद्धिं शीतकरस्तथापि न गतः क्षीणः परं प्रत्युत**
**प्रायः प्राक्तनमेव कर्म बलवत्कः कस्य कर्तुं क्षमः ।।**

श्रिया सह जन्म, त्रैलोक्यभूषाकरस्थित्यर्थं श्रियंलब्धम्,
परमेश्वरोभ्युपगतः, तेन मूर्ध्नाकृतः शीतकरः तथापि
वृद्धिं न गतः प्रत्युत क्षीणः । प्रायः प्राक्तनं कर्म एव बलवत् ।
कः कस्य कर्तुं क्षमः ?

चंद्र हा सागरातून एकाच प्रसंगीं म्हणजे सागरमंथनाचे वेळीं श्रीलक्ष्मीदेवींबरोबरच जन्मला ; ज्यास तिन्ही लोकांचे भूषण म्हणून सार्थ गौरवपूर्ण स्थिती प्राप्त झाली आहे. प्रत्यक्ष परमेश्वर श्रीशंकरच ज्याच्याकडे आले व त्यांनी त्याला मस्तकावर धारणही केले आहे, तरी पण तो शांतकिरण चंद्र काही वाढीस लागलाच नाही. वाढावयाचे (वृद्धिंगत होणे) तर दूरच राहो, उलट तो कृश अवस्थेत क्षीणच राहिला. म्हणून प्रारब्ध–कर्म हेच बलवत्तर असते. प्राक्तनकर्माचेच सामर्थ्य फार मोठे आहे. तेथे कोणी कोणाला साहाय्यकारी होत नाही. (तेथे कोण, काय करणार आणि कोणासाठी ? तसे काही करण्यास सक्षम कोण आहे ?)

**१.७४ : पीयूषं वपुषोस्य हेतुरुदयो विश्वस्य नेत्रोत्सवः**
**प्लुष्टं भानुकरैरिदं त्रिभुवनं ज्योत्स्नाभि(क)रैः स्सिञ्चति ।**
**सर्वाशाप्रतिरोधकान्धतमसो ध्वंसाय बद्धोद्यमे**
**धिग्धातारमिहापि लक्ष्म लिखितु यस्य(स्या)द्य वृत्तं मनः।।**

अस्य वपुषः पीयूषं, उदयहेतुः विश्वस्य नेत्रोत्सवः भानुकरैः
प्लुष्टम् इदं त्रिभुवनं ज्योत्स्नाभिः करैः सिञ्चति ।
सर्वाशा प्रतिरोधकान्धतमसः ध्वंसाय बद्धोद्यमे (सति) इह
(चन्द्रे) अपि लक्ष्म लिखितुं यस्य मनः वृत्तं, धिक् धातारम् ।)

या चंद्राचे शरीर म्हणजे साक्षात अमृतापासून उत्पन्न झालेले ! याचा उदय

म्हणजे त्रिलोक (स्वर्ग, मृत्यू, पाताळ) जगताच्या नेत्रोत्सवाचे कारण होय. सूर्याच्या प्रखर किरणांनी होरपळलेल्या तिन्ही लोकांवर सकल विश्वावर हा आपल्या शीतल अमृतसंजीवक, पीयूषवर्षी चांदण्यांच्या कोमल करांनी शिडकावा करतो. सर्व दिशा व्यापून टाकणाऱ्या सर्वांच्या इच्छांना प्रतिबंध करणाऱ्या घोर अंधाराचा नाश करण्याच्या उद्योगात तो नित्य रममाण असतो. पण... अशा या चंद्रावरही एक कलंक लावण्याचे ब्रह्मदेवाने मनात आणलेच. आणि तो लावलाही. धिक्कार असो त्या ब्रह्मदेवाचा !



*** (३) : हडकोळण (गोवे) येथील 'नदीवरील आंगभाडे (कर) माफ केल्याचा' एक 'शिलालेख' /छ. संभाजी राजे.**

: (शके १६१० चा पहिला दिवस/चैत्र शुद्ध १/गुरुवार/शके १६१०)

: (शके १६१० याच शकाचा अंतिम दिवस/ आणि तोच ठरला ; श्री शिवपुत्र श्रीशंभु–सूर्याचा अस्तंगत होण्याचा अंतिम दिवस–

– **''।। स्वस्ति श्रीनृपशालिवाहन शके १६१० वर्तमानविभव नाम संवत्सर, चैत्र शु. १ गुरुवासर, गोमंतक प्रांत अनंत उर्जदेश, (अंत्रुज), क्षत्रियकुलावतंस राजा शंभु छत्रपति यांचे आज्ञानुवर्ती..!''**

: (या शिळेवर – सूर्य, अष्टदल कमल, चंद्र कोरलेले आहेत.

* *

## २१. 'दंडनीती' : केशव पंडित :

### * 'राजनीति'कार छत्रपती श्रीशंभुराजांची दम(दंड) नीतीतील थोरवी :

* 'शंभुराज-कृत नीतिमंजरी'- दंडनीति-प्रकरणम्।'

: ('दंडनीती'/- केशव पंडित/ इ. स. १६८२/ (शके १६०४) :/ श्लो. १,२/प्रकरण १ ले/ आणि/ अंतिम-श्लो. ५७५ नंतरची नोंद.) : (तंजावर ग्रंथालय).

१/ **''प्रसन्नवदनं रामं निधाय हृदि केशवः।**
**'धर्मकल्पलता'सिध्यै तनुते 'नीतिमंजरीम्' ।।१ ।।**
**।। श्री गणेशायनमः ।।**

२/=**''जयत्यसौ शंभुमखी(ही)महेन्द्रः।**
**प्रख्यातकीर्तिः प्रियधर्ममूर्तिः ।।**
**दानेन यस्याखिलविप्रसार्थाः**
**शश्वत्कृताः (तास्ते) सुखिनो भवन्ति ।।'' २ ।।: (वृत्त-उपेंद्रवज्रा)**

३/ (ग्रंथाचा समारोप) :
**: '' ।। इति श्रीमन्ममहाराजाधिराजक्षत्रियकुलावतंस-**
**सिंहासनाधीश्वर श्रीशंभुराजछत्रपति-विरचिते ग्रंथे**
**'बुधभूषणे', श्रीमत्पुरोहित दामोदर भट्टात्मज-**
**केशव पंडित-विरचित, 'धर्मकल्पलता'न्तर्गत**
**'नीति-मंजर्याम्' 'दंडनीति' प्रकरणम् ।।''**
**।। (शके राजाभिषेकीये दुंदुभसंवत्सरे लिहमिदं पुस्तकम् ।।)'' ।।**

* *

=(१) ''मी केशव (केशव पंडित कवी), प्रसन्नवदन सुंदरनीलकांतिसंपन्न (राम = pleasing, pleasant, charming, lovely, beautiful, प्रिय joyous, delight.) सर्वश्रेष्ठ राजनीतिज्ञ श्रीकृष्णांस केशवरूपास

आपल्या हृदयी धारण करून 'धर्मकल्पलता' नांवाच्या ग्रंथाच्या लेखन-सिद्धीसाठी त्याचाच एक अंश म्हणून हे देहरूप धारण करून ही 'नीतिमंजरी' लिहीत आहे.' (१)

(२) ''महीमहेंद्र म्हणजे या भूमीचे जणू इंद्रच अशा या देवतास्वरूप छत्रपती श्रीसंभाजी महाराजांचा विजय असो ! शंभूराजे हे प्रख्यात कीर्तिमान असून धर्मप्रिय असे श्रेष्ठ प्रजापतिपालक आहेत. ज्यांनी (इतकी) विपुल दाने दिली आहेत की ज्यांमुळे सर्वच्या सर्व ज्ञानी जनलोक स+अर्थ (सार्थ) म्हणजे 'संपत्तिमान' बनलेले आहेत. असे जे धनवान बनविले गेल्याने निरंतर शाश्वत सुखोपभोगांचे स्वामीच बनत आहेत, अशा श्रीशंभू महाराजांचा विजय असो.: (२)

(३) ग्रंथाचा समारोप :
अशा प्रकारे श्रीमत् महाराजाधिराज, क्षत्रियकुलावतंस सिंहासनाधीश्वर श्रीशंभुराजे छत्रपती यांनी लिहिलेल्या- 'बुधभूषण' या ग्रंथांतर्गत - श्रीमत् पुरोहित दामोदर भट्ट यांचा पुत्र केशव पंडित दामोदर म्हणजे पुरोहित केशव दामोदर भट्ट याने लिहिलेल्या 'धर्मकल्पलता' अंतर्गत 'नीतिमंजरी'-मधील 'दंडनीती' हे प्रकरण येथे लिहून पूर्ण झालेले आहे.
: (शके १६०४, दुंदुभ ('दुंदुभि' नामक) संवत्सर; शिवराजाभिषेक शकवर्षी इ. सन १६८२.)



* **(शाहूंचा जन्म - शके १६०४ दुंदुभ संवत्सरे :**
वैशाख वद्य ७ गुरुवार/१८ मे १६८२, शततारका नक्षत्र, चरण ३, कुंभ रास.)/(पेशवे दप्तर).
: (पृ. १८१/श्लो. ६५ वा, यातून शाहूंच्या जन्माची तिथी व शकेची नोंद वगळली गेली आहे; पुस्तक छापताना. ते कां?
- (याचा खुलासा - संपा. गो. स. सरदेसाईंनी केल्याचे आढळले नाही.)

## २२. 'राजाराम-चरित्' : (ग्रंथ) :

### छ. संभाजी महाराजांनी 'यम-धर्म' स्वीकारल्यानंतर :

: ('राजाराम-चरित्र'/केशव पंडित)

१/ **''न्यायार्जितधनेनैव कुटुंबपरिपोषक: ।**
**शंभुवर्मणि भूपाले दिष्ठधर्ममुपेयुषि ।।'' १.७ ।।**

संभाजी महाराजांकडून ''केवळ न्यायमार्गानिच मिळविलेल्या धनावर आपल्या कुटुंबाचे परिपोषण करणारा असा ज्ञानी पंडित केशव कवी हा छत्रपती श्रीसंभाजी महाराज या भूपालांनी 'यमधर्म स्वीकारल्याचे ऐकून', ....आता यापुढे लोककल्याणाचा मार्ग कोणता म्हणून चिंता करू लागला.'')

: (१.७)

२/ (छ. संभाजींच्या मृत्यूने काय घडले?) : (१.१८ ते २४).

– **''स्वामिन् सह्याचले पूर्वं दत्वा स्वं परशुं (=शस्त्रं) शुभं ।**
**स्थापितो दुष्टशिक्षायै भक्तसंरक्षणाय च ।। १.१९ ।।**

: **एतावत्कालपर्यन्तं तवाज्ञाविहित: प्रभो ।**
**सांप्रतं कलिकंदेन सार्वभौमाभिमानिना ।। १.२० ।।**

: **उत्साहितो धर्मसेतुर्हेतु: पुण्यस्य कर्मण: ।**
**भूमि: पापभराक्रान्ता कर्तव्यं किमत: परं ।। १.२१ ।।**

: **नास्ति तन्निग्रहे शक्तिर्महेन्द्रादि सुरेष्वपि ।**
**भूमिपालेषु मुनिषु ब्राम्हणेषु महत्स्वपि ।। १.२२ ।।''**

= हे शिव स्वामी ! दुष्टांच्या निर्दालनासी आणि भक्तांच्या संरक्षणासाठी पूर्वी सह्यगिरीवर आपण स्वत:चे शुभमंगल स्वरूप दिलेले शस्त्र आपल्या आज्ञेनुसार आतापर्यंत सांप्रत कलिकंद अशा सार्वभौम अभिमानींकडून त्याचा 'धर्माचा सेतू' व पुण्यकर्माचा हेतू म्हणून भूमीला पापभारातून मुक्त करण्यासाठी छ. संभाजी महाराजांकडून वापरले गेले. आता तसे ते दुसरे कोण वापरणार? त्यांच्याप्रमाणे (छ. संभाजी महाराजांप्रमाणे) निग्रही

शक्ती अन्य राजांमध्ये, देवतांमध्ये, भूमिपालांमध्ये, मुनींमध्ये, विद्वज्जनांमध्ये अशा कोणत्याही महान व्यक्तींमध्ये कार्यप्रवण निर्णायक प्रभावी, सामर्थ्यसंपन्न राहिलेली नाही. (any kind of weapon/कोणतेही शस्त्र/a weapon in general/ A thunderbolt = वज्र, तडित्, वीज);

हे प्रभो ! शंकर ! आजकाल (सध्या/सांप्रत), सार्वभौमपदाचा अभिमान धरून आलेल्या कलिपुरुषाने उखडून टाकला आहे. पृथ्वी/भूमी पापभाराने वाकून गेली आहे. तरी आता काय करावे? – (१९.२१)

: त्याचे निवारण करण्याची शक्ती महेंद्र (इंद्र) इत्यादी देव; मोठमोठे राजे, ऋषी यांच्यांत सुद्धा राहिलेली नाही.'' (२२)

३/ **'ज्वलज्ज्वलनतेजस्' संभाजी महाराज :**

(राजारामचरितम्।' ३.५ व ६ केशवपंडित).

**–'' महाराजेन पित्रास्य घातुकेन महीभृताम्।**

**श्रीशिवछत्रपतिना सिंहासननिषेदुजा: ॥ ३.५ ॥**

: **संभाजीकेन च भ्रात्रा 'ज्वलज्ज्वलनतेजसा'।**

**विलंबितेषु सर्वेषु पौरजानपदेषु च ॥'' ३.६ ॥**

: **(पाठ/'विलुंठितेषु'।)**

= (राजाराम महाराज (छ. संभाजींच्या मृत्यूनंतर) कसे होते, याविषयी) –

: सिंहासनास प्रिय महीपालांचा (अनेक राजांचा) पाडाव करणारे त्यांचे (राजारामांचे) पिता (छ.श्रीशिवाजी महाराज) आणि

''ज्वलज्ज्वलन तेजाप्रमाणे चमकणारे त्यांचे भ्राता (भाऊ) छ. श्रीसंभाजी महाराज'' – यांच्या विरहित (यांचा वियोग झालेले छ. राजाराम महाराज.) आपल्या स्वराज्याचे रक्षण करण्याचे महान कार्य करीत आहेत.)



## २३. 'शिवराजाभिषेक-कल्पतरू' :

**- गोविंद नारायण बर्वे**

: (निश्चलपुरी/शिवराजाभिषेक-२ रा चा कर्ता./एक तांत्रिक)

: (शिवराजाभिषेक/१ ला/करताना काय-काय प्रकार घडले? :
त्यांतील काही जे शुभ होते; त्याची नोंद-

१/ **''आरोहण क्षणे जाता छिंका चाग्नेय कोणके ।**
**संभाजी-मस्तकश्चैव गतं मुक्ताफलद्वयं ।। ७७ ।।**
: **शिवराज समीपस्था क्षूद्रासिश्च विनिर्गत: ।**
**छिंकाफळं तु मध्यस्थं क्षुद्रासे शत्रुमर्दनं ।। ७८ ।।**

: (संदर्भ : 'श्रीशिवराजाभिषेकप्रयोग/गागाभट्ट,
संपा. वा. सी. बेन्द्रे/प्रका. पी. पी. एच्.
बुक स्टॉल, मुंबई-४/डिसें. १९५९/आ. १/पृ. ३६-३७.)
* (क्षुद्रा असि = लहानशि तलवार अथवा शस्त्र)

= (श्रीशिवराजाभिषेकसमयीं आग्नेय कोण मधून शिंक उमटली. त्यामुळे संभाजींच्या मस्तकावर दोन मोती गळाले.
शिवराजांच्या जवळून लहान तलवार गळून पडली. वरील शिंकेचे फलदर्शन म्हणजे लहान शस्त्राने शत्रूचे केले जाणारे मर्दन (पराभव) होय.).
: (श्लो. ७७ व ७८)

* *

**(२४) : * 'नीलकंठ मोरेश्वर' मुख्यप्रधान/ची मुद्रा'-**
**- (७ ओळी. पंचदशदली/बहुबुर्जी शिक्का).**
-'' ।। श्री शंभुनरपतिहर्षनिधान ।
**मोरेश्वर-सुत नीलकंठ मुख्यप्रधान ।।"**

## २४. परभू-प्रकरणीं युवराज संभाजी राजे :

* **'परभू-प्रकरण' : (हस्तलिखित/ २ प्रती.) : (अप्रकाशित/ ?)**

: (कायस्थ परभूंच्या विषयीच्या ग्रामण्य-प्रकरणाचा धर्म-निर्णय.) :

* हा निर्णय युवराज संभाजीराजे यांनी केला होता.

: (इ.स. १६७५/ शके १५९७) : (वय वर्षे- १९) :

* (संदर्भ/ भां. ओरि.रि.इन्स्टि.पुणे-४/ ॲनल्स-वर्ष २० वे/ पृ. २३५-२४८).

: (**विशेष**: या (संस्कृत) काव्यबद्ध वर्णनात युवराज शंभुराजे इ.स. १६७५ मध्ये वय वर्षे एकोणीस (१९ वर्षे) असताना, त्यांच्याविषयी करण्यात आलेल्या उल्लेखांत केशव पंडिताने, शंभु राजांचा ज्ञानाधिकार स्पष्ट नोंदविला आहे.

प्रस्तुत, 'प्रभू-कायस्थ-प्रकरण'- काव्याप्रमाणे, 'परभू'विषयीच्या ग्रामण्यासंदर्भात छत्रपती श्रीशिवाजी महाराज यांच्या सूचनेवरून / आज्ञेनुसार युवराज संभाजी राजे यांनी निर्णय दिला; तो केशव पंडिताने लिहून काढला.

या प्रकरणाची, 'दोन हस्तलिखिते', भांडारकर संस्थेत (पुणे). उपलब्ध आहेत. त्यांच्याविषयीचा एक अभ्यासपूर्ण लेख त्या संस्थेच्या 'ॲनल्स नं. २०' मध्ये, श्री. पी.के. गोडे यांनी लिहून प्रसिद्ध केलेला आहे. त्या लेखाचे शीर्षक व लेखही इंग्रजीतच आहे. :-

* (कंसांत पाठभेद दिले आहेत.)

: (भावानुवाद : डॉ. सौ. मीनाक्षी कोडणीकर).

(१): **''आसीद पृथिवीं शिवभूप इंद्रो : (ईड्यो)**
**विराजमान: सचिवैर्यथेन्द्र: ।**
**प्रसृत्य यस्मै भुवनस्य राज्यं**
**दत्तं हि लोकानवतुं भवान्या: '' ।। १ ।।**

* (श्रीमत् संभाजीराजांनी केलेले श्लोक पुढीलप्रमाणे.) :-

= (या पृथ्वीतलावर इंद्राप्रमाणे (छत्रपती) श्रीशिवाजी भूपती, हे आपल्या मंत्रिगणासह विराजमान आहेत. (धर्माचा) प्रसार व रक्षणार्थ, आणि लोकांचे (प्रजाजनांचे) संरक्षण करण्यासाठी श्रीभवानीदेवीने त्यांना या जगताचे राज्य दिलेले आहे.) (१)

१. भूपती श्रीशिवाजी महाराज हे भूतलीचे इंद्रच आहेत. आपल्या मंत्रिगणांसह ते येथे विराजमान आहेत. राजधर्माचा प्रसार करण्यासाठी, लोकधर्माचे रक्षण करण्यासाठी व प्रजाजनांचे रक्षण करण्यासाठी श्रीभवानी देवीने त्यांना या जगताचे राज्य प्रदान केलेले आहे.

(२) : **''तस्यात्मज: 'सकलशास्त्रविचारशील:'**
**श्रीशंभुराजनृपति: 'सुशील: ।' : (श्रीशंभुसंज्ञोनृपति: सुतरां ।)**
**आयोधने अर्जुन इवाखिलसत्प्रदाने कर्ण: ।**
**शरीरी मदनश्च मनुष्यलोके ।।'' २ ।।**

= (त्यांचे (शिवाजी महाराजांचे) पुत्र श्रीशंभुराजनृपती (युवराज संभाजी राजे), हे (सकलशास्त्रविचारशील) सर्व शास्त्रांचा सांगोपांग विचार (मीमांसा) करणारे आणि आचरणाने सुशील चारित्र्यसंपन्न आहेत. ते युद्धात अर्जुनाप्रमाणे शूर आहेत आणि सर्वस्वाचे सत्पात्री दान करण्यात कर्णाप्रमाणे दानशील आहेत. आणि मनुष्यदेहधारी मदनाप्रमाणे अतिशय रूपवान आहेत. असे हे छत्रपती शिवाजी महाराज यांचे पुत्र संभाजी महाराज या पृथ्वीतलावर शोभायमान आहेत. (२)

(३) : **''आसीत्पंचवटे रम्ये नगरे शिवनिर्मिते । : (पंचवाटपुरे)**
**बालाजी परभू: कश्चित्कायस्थो नृप-लेखक:'' ।। ३ ।।**

= श्री छ. शिवरायांनी निर्मिलेल्या (वसविलेल्या) पांचवटे म्हणजे पांचवड नावाच्या रम्य नगरीमध्ये बाळाजी परभू नावाचा कोणी एक कायस्थ (नृप-लेखक) राजदरबारचा कारकून राहत असे. (३)

(४) : **''तत्पुत्र: 'खंड'नामासीत्कर्त्तुं तस्योपनायनं ।**
**मतिं कृत्वा शिवं प्रष्टुं बालाजी परभूर्गत: ।।''४ ।।**

= त्या बालाजी परभूस 'खंड' (खंडोजी बल्लाळ) नांवाचा एक पुत्र होता.

'त्याच्या उपनयनाचा संस्कार करावा', असा विचार करून, तो (बाळाजी परभू), श्रीशिवरायांच्या पुढे जाऊन उभा राहिला. (४)

(५) : **''बद्धांजलिर्नृपस्याग्रे स्थित्वा कार्यं न्यवेदयत् ।**
**'खण्ड'नाम्नो ह्युपनय(य:)क्रियते श्वो मया प्रभो ।।''५।।**

= (तो बाळाजी परभू), दोन्ही हात बांधून (अतिनम्रपणें), श्रीशिवरायांसमोर उभा राहिला. त्याने राजांपुढे आपले निवेदन कथन केले की, ''उद्या मी माझ्या खंडोजी नामक मुलाचे उपनयन संस्कारकार्य योजिले आहे. (५)

(६) : **''दासे मयि दयां कृत्वा गंतव्यं मंत्रिभि: सह ।''**
**– इति श्रुत्वा, शिवो भूप: प्रयुवाच महामति: ।।''६।।**

= महाराज ! आपल्या या दासावर महाराजांनी दया करून आपल्या मंत्रि–गणासह या समारंभास उपस्थित राहण्याचे थोरपण अनुभवास आणून द्यावे.'' (ही आपणांस विनंती.) (६)

* (या काव्याची, 'परभू–कथा'ची हस्तलिखित एक (१) प्रत, श्री. रघुनाथ कृष्ण पाटणकर (राजापूर, जि. रत्नागिरी) यांनी दिली. ती प्रत– 'भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे–३०/सदाशिव पेठ'– च्या संग्रहीं आहे. त्या प्रतीत; 'भां.ओ.रि. इन्स्टि. पुणे–४' च्या संग्रहातील क्र. ५६८/१८८३–८४) या प्रतीतील श्लो.क्र. २२, २३, २४, २८ हे वगळले आहेत.

* (श्री. पाटणकर–प्रतीत, शेवटची नोंद पुढीलप्रमाणे आहे.) :–

(१६) **।। ''इति श्रीशंभुराजाज्ञया शिवराजसभायां विद्वज्जनसह**
**'केशव पंडित'–कृतकायस्थ परभूनिर्णय: ।। शके १५९७**
**राक्षस नाम संवत्सरे तद्दिनि रामचंद्र ज्योतिर्विदा**
**कल्याणस्थेन लिखितं ।।**
**।। इति श्रीपरभूकथा समाप्तिमगमत् ।।''**

* हा असा; श्रीशंभु राजांच्या आज्ञेने श्रीशिवराजांच्या राजसभेमध्ये विद्वज्जनांसह केशव पंडित यांनी केलेला कायस्थ परभूंच्या विषयीचा निर्णय आहे.

# २५. छ. संभाजींची कर्नाटकातील २ दानपत्रे : (मराठी व संस्कृत) :

* श्रीशाहाजी महाराज भोसले यांचे नातू, तेच–
छ. श्रीशिवाजी महाराज यांचे ज्येष्ठ पुत्र छ. संभाजी महाराज – यांची २ दानपत्रे : (१ मराठी/ आणि– १ संस्कृत.) :

/१/ **(मराठी) धर्मशासन (१) :**

**– '' (१) (स्वस्ति श्रीशकवर्ष १६०२ रौद्रि संवत्सर.**
**श्रावण शुध १५/पौर्णिमा/३१ जुलै १६८०) :**

**– या दिवशी राजश्री शंभोजी चक्रवर्ती यांनी 'कोलाल' च्या कारकुनास दिलेली आज्ञा.**

**: कात्यायनसूत्री, पार्थिव सगोत्री, यजु:शाखाध्यायी गोविंद भट याचा पौत्र, चन्नभट्टर याचा पुत्र वेंकट शास्त्री यास उत्तपूर मडवाल येथील... अष्टभोग अनुभवण्यास दिलेले धर्मशासन...)'' :**

: (Epigraphica Carnatica : Dist. Kolar, Taluk. Mulbagal, Insc. No. 117)

*** : २५ : 'कल्पद्रुमा' सम दान–सिद्धेश : छ. शंभु नरेश –**
: ('सूर्यवंश'/उत्तरार्ध/पृ. १७३/१७४. अध्याय ५ वा/श्लो. १९ ते )
**– ''महाषोडशदानानि कानिचित्परमादरात् ।**
**रचयामास राजेंद्रचंद्रो यज्ञप्रपूर्यते ।। (५–१९)**
**इत्थं दानानि निभृतं प्रददन् शंभुभूपति: ।**
**'कल्पद्रुम' इवालोकि लोकैर्लोलैर्महोत्सवे !'' (५–२०)**

* *

१६. श्रीशाहाजी महाराज भोसले, यांचे नातू, तेच -
छ. श्रीशिवाजी महाराज यांचे (ज्येष्ठ) कुमार (पुत्र) -
शंभाजी (छ. श्रीसंभाजी महाराजे) यांचे एक (संस्कृत) दानपत्र :

/२/ (संस्कृत) दानपत्र : . (Epigraphica Carnatica / Dist. Kolar, Tal. ChikaBallpur/ Inscri. No. 32.)

(२) - ''देशे कर्नाटके पूर्वपर्वतो नंदिनामक: ।
अत्युन्नतो अभेद्यश्च मार्गेणैकेन संयुत: ।
चंपकाश्वत्थनारिजतमालै: परित: श्रित: ।
अत्युच्छ्रयो महावप्रो देवालयविभूषित: ।।'' १ ।।

- राज्ये बल्लारपुरपुरस्येव दुर्गं कृत्वा महागिरिं ।
मेने शत्रुभयात्रातुं स्वयमास्ति विनिश्चितं ।।
गृहीतं दुर्गमग्राह्यं म्लेंच्छो बहुबलान्वित: ।
अगमु .... ततो जातास्ताडितोऽत्यंतविव्हल: ।। २ ।।

:- ''...शाकाब्दसहस्रद्वित्रिशत(ता)ब्दे वर्षे । (शक १६०२) रौद्रे
श्रावण शुद्ध षष्ट्यां ।
बुधे च वारे शिवछत्रपतिकुमारो
शंभोजि राङ्त्रमुदानुशास्ति ।
दुर्गाधिकारि जगदेव सुदुर्गकानि
बालाजिकृष्णोह्यनुशास्ति यत्र ।
आज्ञानुसारि रघुनाथसुपंडितस्य ।
जग्राह दुर्गोत्तमयाजमान्य इति ।।''

- वरीलप्रमाणे छ. श्रीशिवरायांचे ज्येष्ठ पुत्र श्रीसंभाजी राजे यांची दोन दानपत्रे उपलब्ध आहेत. दोन्ही शासने शालिवाहन शक १६०२ या वर्षातील आहेत.

(१) शके १६०२, रौद्र संवत्सर, श्रावण शुद्ध षष्ठी (शु. ६), बुधवार. (ता. ३१ जुलै १६८०).
(२) शके १६०२, रौद्र संवत्सर, श्रावण शु. ६, बुधवार/ता. ३१ जुलै १६८०.

– ही तिथी छ. शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर ४ महिन्यांतीलच आहे; आणि याच सुमारास संभाजींनी म्हैसूर प्रांतावर आपली सत्ता चालविली.
– शिवाजी महाराज शके १६०२, चैत्र शु. १५ (पौर्णिमा) शनिवार (ता. ३–४–१६८०) रोजीं मृत्यू पावले. ('कीर्तिशेष जाहले.'). तेलंगीत निधनाचा उल्लेख 'कीर्तिशेष झाले', असा करतात.
– तेव्हा संभाजी राजे पन्हाळा किल्ला येथे होते.
: ते स्वत: आषाढ शुद्ध २ रोजीं (शके १६०२/इ.स. १६८०) रायगड येथे गेले; व 'राजे झाले.'
: तेव्हा रायगडावर महाराष्ट्र राज्याची सत्ता हस्तगत करण्यापूर्वीच संभाजी राजांनी बेंगळूरकडचे राज्य काबीज केले होते; असे दिसून येते. याबाबतीत, प्रस्तुतच्या– त्यांच्याविषयीच्या नं. ३२ च्या दानपत्रातील उल्लेख विशेष लक्षणीय ठरतो. त्यात–

''**शिवछत्रपते: कुमारो। शंभोजी राडत्रमुदानुशास्ति**''– असे म्हटले आहे.

– यावरून, संभाजी राजांनी कदाचित सिंहगड (?/रायगड) आक्रमणाच्या पूर्वीच कर्नाटकात जाऊन, रघुनाथ पंडितास स्वाधीन करून घेऊन, नंदिदुर्गावर आपला अधिकारी नेमून, कर्नाटक सैन्य आपल्या साहाय्यास आणले; असा अंदाज वाटतो. आणि– दुसरे असे की, –

: रघुनाथ पंडित यावेळीं संभाजी राजांसच मिळालेला होता, हे –

'**आज्ञानुकारी रघुनाथ पंडितस्य**' – या चरणावरून स्पष्ट कळून येते.

छ. शिवाजींच्या मरणानंतर लवकरच रघुनाथ पंडित हा, कर्नाटकातून बरीच मोठी फौज घेऊन, व ३०–४० हजार होन बरोबर घेऊन संभाजी

